नामदार श्री. गणेश वासुदेव (दादासाहेब) मावळणकर,
भारतीय संसदेचे पहिले अध्यक्ष

यांस

कृतज्ञतापूर्वक अर्पण

—भास्कर वामन भट

# श्री शिवछत्रपतींनी दिलेला एक अपूर्व निवाडा

सातारा जिल्ह्यातील कऱ्हाडनजीकच्या खंडोबाच्या पाली गावच्या पाटीलकी वतनाच्या वादाचा निवाडा.

## खराडे विरुद्ध काळभार

शके १५९७ माघ वद्य १३

(शुक्रवार १२ फेब्रुवारी इ. स. १६७५)

## निवाडयाचा खुलासा



मागील निवाडा श्री शिवछत्रपती, अष्टप्रधान देशक, देशमुख देशपांडे वतनदार यांनी उदमी यांच्या समेनें केला. अशा सभेस राजसभा म्हणत. हा असल निवाडा मोडी लिपींत लिहिलेला असून त्यावर शिवछत्रपती व त्यांचे अष्टप्रधान यांच्या मुद्रा व सह्या आहेत. प्रस्तुत हा निवाडा काळभार घराण्याचे वंशजापाशीं आहे. हा निवाडा ९ इंच रुंद कागदाच्या अनेक तुकड्यावर लिहिला असून ते तुकडे डकवून एक लांबलचक कागद निवाड्याचा बनला आहे. निवाडा ५० फूट लांब कागदाचा बनला आहे. हा असल निवाडा काळभार घराण्याचे वंशजापाशीं असून त्याचें छायाचित्र मागें दिलें आहे. निवाडा मोडी लिपींत असल्याकारणानें व अक्षरें बारीक असल्यामुळें छायाचित्रांतील मोडी अक्षरांचा बोध वाचकास व्हावा म्हणून तो मजकूर बाळबोध लिपींत खालीं दिला आहे.

## श्री शिवछत्रपतींनीं दिलेला एक अपूर्व निवाडा

### खराडे विरुद्ध काळभार

१५९७ माघ वद्य १३

श्री मार्तंड भैरव

| |
|---|
| प्रति पच्चंद्र<br>लेखेव वर्धिष्णुर्वि<br>श्ववंदिता ॥ शाहसू<br>नोः शिवस्यैषा मुद्रा<br>भद्राय राजते |

स्वस्ति श्री नृपशालिवान शके १५९७ वर्षे राक्षस नाम संवछरे माघ मासे बहुल पक्षे सोमवारे त्रीयादस्यां तिथौ तेदिने महजर बे तेरीख छ २६ माहे जिलकाद श्री हुजूर हुजीर मज्यालसी समास्तान श्री देव मोकाम मौजे

पाली पा। कऱ्हाड

हुजरती राजमुद्रा

हरजी राजे बीन परसोजी

राजे माहाडिक

| |
|---|
| वर्धिष्णु<br>वामन ++++<br>वशोद्भवो विभु +<br>माहाडीकोप ++<br>हरेर्मुद्रा वि<br>राजते |

रघुनाथ नारादेण
मोरो त्रिमल पेशवे

निराजी राउजी
नारो नीलकंठ मजमुदार

श्री
शिवचर
णीं तत्पर त्र्यं
बकसुत मो
रेश्वर

दताजी त्रिमल वाकेनीस
नागोजी गुजर

शामजी नाईक पुंडे
आनंदराऊ

श्रीशिवसेना
धिपमुद्रा ज
यति सुभद्रा
प्रतापरायस्य

दादजी काकडे

खंडोजी वाघ

छायाचित्रांतील दुसऱ्या तुकड्यावरील मोडी मजकुराचें बालबोधींत लिप्यंतर खालीं दिलें आहे.

मौजे येलगाऊ
कााा नाणेमोळ
कारकून
केशव सीव परली हवलदार

मौजे पाहिली बुाा

राघो मदगल मजमुदार

श्रा श्री
व संभु के
शवजी सी
व प्रभु

देसक

परानजी देसाई

अतो नागोजी देसकुलकर्णी
करबार्ता मजकूर उपनाव
पैरे बीाामु

पारधी

नागोजी मामा
नाईकवाडी
(नि. कट्यार)
कसबे चाफल

गाऊगना पटेल

मौजे नाणेगाऊ बुाा
बानजी पानवल चिलोजी वाग

जनकोजी पाटील
तावट
( नांगर )
तथे तारले

सालोजी चौ-पटेल चौगला
गला कालगुडा ( नांगर )
ककेली
ता कटाजी पाटील वा बापूजी
( नागर ) पाटील
( नांगर )

देसक
समाजी विन विठोजी विन
कोनाजी देसो
काटे देसाई बालवी देसो
वि

फारसी

देसकुलकर्णी
धोंडो विस्वनाथ तिमाजी
कोंडो वा जाणो दामो
वा खंडो त्रिमलधर उप
नाव पिंगले उपनाव पिंगले
नागोजी अनत पिंगले
देसकुलकर्णी ता मा

फारसी

दाऊद नाक विन दा + + +
ना नाबाई ता मा
( नि. कल्यार )

मोकदमानी मौजे व कसबे

कसबे तारले
प्रतापजी विन हरजी
मालिक पटेल व + उ-
जी बेगाणा पटेल

महादाजी राजजी पटेल
चदो कुल-कोडोक वन-
कर्णी का मा बन्होजी दुवक
वा लिंगोजी पटेल मौजेमार
गोविंद ( नागर )

मौजे नूने
नागोजी नारायेण
कुलकर्णी वा जो-
तसी उपनाव पि-
गले

मौजे राहुडे
बहिरोजी पटेल
( नांगर )

नारो नागनाथ
कुलकर्णी मौजे
मार व जोत-
सी उपनाव पिंगले

नखोजी पटेल
सिंदे ( नांगर )

मौजे घोट
धोंडो विश्वनाथ
कुलकर्णी मौजे
मार

बाजी चौगला
मौजे कदवे सुा

कृष्णाजी पटेल
( नागर )

मौजे कोनवडे
नरसो नारायेण कुलकर्णी वा
जोतसी उपनाव पिंगले

सलोजी पटेल
रावजी गोविंद
मौजे दामवडे

# शुद्धिपत्रक

या ग्रंथांत कांहीं प्रकरणांचे क्रमांक चुकीचे पडले आहेत, एकेस्थळीं कांहीं मजकूर स्वतंत्र प्रकरण म्हणून दर्शविला आहे तो तसा नसून पूर्वीच्या प्रकरणाचा पुढील भाग आहे व कांहीं प्रकरणावर मथळे दिले गेले नाहींत तरी या चुकांची दुरुस्ती खालीलप्रमाणें नमूद केली आहे.

| पृष्ठ | | | अशुद्ध | | | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|---|
| ५ | ... | ... | २ | ... | ... | ३ |
| १८ | ... | ... | ३ | ... | ... | ४ |
| २७ | ... | ... | ४ | ... | ... | ५ |

४४ वर प्रकरण ५ असें म्हटले असून शुक्रनीतिसार त्याला मथळा दिला आहे तो चुक आहे. हे स्वतंत्र प्रकरण नसून मागील प्रकरणाचा पुढील मजकूर आहे.

| पृष्ठ | | | (प्रकरण) अशुद्ध | | | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|---|
| ८० | ... | ... | ७ | ... | ... | ८ |
| ९८ | ... | ... | ८ | ... | ... | ९ |
| १२० | ... | ... | ९ | ... | ... | १० |
| १३१ | ... | ... | १० | ... | ... | ११ |
| १३७ | ... | ... | १० | ... | ... | १२ |
| १४२ | ... | ... | ११ | ... | ... | १३ |
| १४६ | ... | ... | १२ | ... | ... | १४ |
| १५० | ... | ... | (नाहीं) | ... | ... | १५ |
| १५४ | ... | ... | १३ | ... | ... | १६ |
| १५९ | ... | ... | (नाहीं) | ... | ... | १७ |
| १७२ | ... | ... | १४ | ... | ... | १८ |
| १७४ | ... | ... | १५ | ... | ... | १९ |
| १९७ | ... | ... | (नाहीं) | . | ... | २० |

अनुक्रमणिकेंतील प्रकरण १९ समोर पान १९७ चुकून पडले आहे.

पहिल्या पानावरील छायाचित्रावर इमशी तारीख शुक्रवार १२ फेब्रुवारी १६७५ अशी छापलेली आहे ती मंगळवार ता. १ फेब्रुवारी १६७६ अशी पाहिजे.

---

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

'माझ्या वकिलीचीं चार तपें' ह्या पुस्तकाला प्रस्तावना लिहिण्याची साथ मला मिळाली ह्याचा मला मनापासून आनंद होत आहे. ह्याचें कारण अशा प्रकारचा ग्रंथ लिहिण्याची प्रथा अगदीं नवीन आहे. आजपर्यंत निर्माण झालेलें वाङ्मय म्हणजे केवळ कल्पनेचा खेळ असें म्हणावयास हरकत नाहीं. ती एक प्रकारची बुद्धीची कसरत होय. विनबुडाच्या ह्या वाङ्मयाचा हल्लीं पडता काळ आहे. सध्याचा काळ प्रयोगाचा आहे. परमेश्वराला सुद्धा प्रयोगशाळेंत खेचलें जातें. अनुभव, आकडे, प्रमाण ह्या पायावर जी वाङ्मयसृष्टि निर्मिली जाते तीच राष्ट्रोत्कर्षाला कारणीभूत होते. कल्पनेवर तरंगणारें वाङ्मय मनाची करमणूक करील इतकेंच.

ज्याचीं चार तपें वकिलीच्या धंद्यात गेलीं असे महाराष्ट्रांत किती तरी वकील असतील. परंतु मराठी भाषेंत अशा प्रकारचें पुस्तक अद्यापि झालेलें नाहीं हेंच प्रस्तुत ग्रंथाचें वैशिष्ट्य समजलें पाहिजे. वकिलांप्रमाणेंच नामांकित धन्वंतरी म्हणून ज्यांनीं लौकिक संपादन केला, त्यांपैकीं एकालाहि आपल्या अनुभवाचा फायदा पुढील पिढयांस करून देण्याची बुद्धि झाली नाहीं. ह्यावरून असें उघड म्हणावें लागतें कीं जो व्यवसाय आपण जन्मभर केला त्याच्याशीं आपण समरस होत नाहीं. नुसती वेठबिगार; त्यात आत्मीयता नाहीं. नोकरांनीं, स्वयंपाक्यांनीं आपले अनुभव लिहून काढले तर ही ग्रंथरचना किती बहुमोलाची होईल तें सांगावयास नको. इंग्रजींतील टॅक्सी ड्रायव्हर व वेटर यांची प्रसिद्ध चरित्रें या विधानास पुष्टि देतात. मालकाचा स्वभाव, त्याचें अंतरंग, त्याची घरगुती वागणूक ह्याचें चित्र जर परिचारकाना रेखाटता आलें तर आमच्यातील मोठया माणसाची लायकी कसोटीला लावता येईल. मानसशास्त्राच्या अभ्यासकाला ही सामग्री उपयुक्त होईल तें निराळेंच. किंकरांनीं अशा प्रकारचें लिहिलेलें पुस्तक वाचण्याचें भाग्य आपणास कधीं काळीं लाभेल काय? आमच्यांतील अत्यंत बुद्धिमान् जो मनदी नोकराचा वर्ग त्याच्याकडे पाहिलें तर आशेला मुळींच जागा राहात नाहीं. तथापि प्रस्तुत विद्वान् ग्रंथकारानीं घालून दिलेला पायंडा अगदींच उपेक्षिला जाईल असें म्हणण्याइतकें हताश होण्याचें कारण नाहीं.

माझी ही प्रस्तावना म्हणजे शेतात आडतास घालतात त्या स्वरूपाची होणार आहे. परंतु ती उलट ढाल आहे अशी मात्र कोणी शंका घेऊं नये. ग्रंथकार वकील आहेत. अर्थात् त्यांनीं अनेक न्यायाधीश पाहिले आहेत. उलट, माझा संबंध अनेक वकिलांशीं आला आहे. ह्यास्तव ग्रंथकाराच्या विवेचनात न्यायाधीश प्रामुख्यानें दिसला तर परिचयकाराच्या लेखनात वकील विशेषतः झळकेल. असें होणें स्वाभाविक आहे.

वकिलाची संस्था राष्ट्राला अत्यंत उपकारक आहे. कायद्याच्या अभ्यासानें बुद्धीला सूक्ष्मता येते; विचारांना वळण लागतें; साराधार विवेक बुद्धिगत होतो; कार्य-कारणभाव समजूं लागतो; एकंदरीत बुद्धि तल्लख होते. देशाची भरभराट बुद्धिमंतावर अवलंबून असते आणि ह्या बुद्धिवंतांचें प्रमाण कायदेपंडितांत विशेषतः आढळतें. पूर्व-मीमांसाकारानंतर आमच्याकडे कायद्याच्या ज्ञानाचा लोप झाला आणि देशाला अवकळा आली. अमेरिकेच्या स्वातंत्र्यावर पार्लमेंटमध्ये भाषण करताना बर्कनें तेथें कायद्याचीं पुस्तकें पुष्कळ वाचलीं जातात ह्या गोष्टीचा उल्लेख मुद्दाम केला होता. बुद्धिमान् राष्ट्राला तुम्ही फार काल पारतंत्र्यात ठेवूं शकणार नाहीं असें सांगण्याचा बर्कचा हेतु होता. आपल्याकडे क्रांतियुद्धाच्या आघाडीवर असलेले रानडे, टिळक, गांधी हे कायदेशास्त्रांत वाकबगार होते. वैचारिक क्रांतीचे जनक रानडे. टिळकांनीं शिक्षितांना जागृत केलें. गांधींनीं लोक उठविले. आज सर्व देशांत मद्रास प्रांतातील लोक पुढें सरसावले आहेत ह्याचें कारणहि कायद्याचें ज्ञान. मद्रास हायकोर्ट कायद्याच्या दृष्टीनें पहिल्या प्रतीचें आहे. आमच्या प्रांतात गुजराथपेक्षा महाराष्ट्र निःसंशय मागें आहे.

वकिलाला पाहतांच कित्येक अधिकाऱ्यांच्या (विशेषतः मजिस्ट्रेटांच्या) तसेंच कांहीं सार्वजनिक कार्यकर्त्यांच्या कपाळाला आंठ्या पडतात. हें अदूर दृष्टीचें लक्षण आहे. वकील हा न्यायाधिशाला सहाय्य करणारा असतो. तो त्याचा शत्रु नव्हे. वकिलांच्यामुळें कज्जे विघडतात, भाडणें माजतात हें खरें; पण तो दुरुपयोग आहे. वस्तूचा आपण दुरुपयोग केला तर तो आपला दोष आहे; वस्तूचा नाहीं. दुरुपयोग होतो म्हणून वस्तूच नको म्हणणें वेडेपणाचें होईल. आगगाडीखालीं पडून लोक आत्महत्या करतात म्हणून आगगाडी बंद करावी असें कोणी म्हणणार नाहीं. शिवाय आगलाव्या टारगट वकिलाचा बंदोबस्त न्यायाधिशाला करिता येत नसेल तर तो त्याचाच दोष समजला पाहिजे. वकिलावर टीका करण्यास न्यायाधीश कचरतात. वकिलाच्या दोषाचें खापर ते बिचाऱ्या पक्षकाराच्या डोक्यावर फोडतात. हा न्यादपणा होय.

माधवराव रानड्यांना असें वाटत होतें म्हणतात कीं, तालुक्यांत वकील पसरले कीं, स्थानिक अधिकाऱ्यावर त्याचा वचक बसेल व अरेरावीला व अनधिकृत कृत्यांना आळा बसेल. रानड्यांची ही आशा सफल झाली नाहीं. तालुक्यातील छोट्या अधिकाऱ्यांच्या मोंगलाईच्या आहारीं वकील सहज पडूं शकतात असा अनुभव आहे. वकिलाची भीति कोणत्याहि मॅजिस्ट्रेटला वाटत नाहीं. तसेंच वकिलांच्यामुळें कोर्टीत कायदेशीर कामें पक्षकारांची नाडणूक न होतां होतात असें नाहीं. ह्याचें कारण आपल्या व्यवसायाचें पावित्र्य आपण राखिलें पाहिजे ही जाणीव वकीलवर्गांत अद्यापि निर्माण झाली नाहीं. जनता कमालीची अजाण व निर्बुद्ध. जनतेचें अज्ञान वकीलवर्गाला भोवलें. खालच्या लोकांत उपाधगिरी करणारा ब्राह्मण विद्याहीन होतो तीच स्थिति वकिलांची होते.

समाजाचें धुरीणत्व वकिलांकडेच असणें युक्त आहे, विशेषतः राजकारणांत तें प्रतीत झालें पाहिजे. परसत्तेंत राजकारण झुंजखोरपणाचें होतें. सत्ता ही कायद्याचें रूप घेऊन प्रकट होते. तेव्हां परकी सत्ता नष्ट करावयाची म्हणजे कायद्याला लाथाडावयाचें हें ओघानेंच प्राप्त होतें. म्हणून वकिलांनीं कायदेभंग करावा कीं नाहीं हा बिकट प्रश्न ब्रिटिशांच्या अंमलात उद्‌भवला होता. आतां ही स्थिति पालटली आहे. सध्या हिंदुस्थानात लोकशाही स्थापन झाली आहे. लोकशाही ह्याचा अर्थ कायदेशाही. लोकांच्याकडे आलेल्या सत्तेच्या जोरावर लोकांनीं केलेल्या कायद्याचें राज्य हीच लोकशाही. असें कायद्याचें साम्राज्य असताना वकिलांनीं मागें राहणें हें राष्ट्रहितविघातक आहे. कायद्याच्या अंमलबजावणीकरता त्यांनीं आपलें बुद्धिसर्वस्व खर्च करणें हें त्यांचें पवित्र कर्तव्य आहे. वकिलांचा क्षेत्रोपाध्याय झालेला कोणाला पाहवेल काय! पण सध्या तरी मला महाराष्ट्रांतील वकीलवर्ग पुढारीपणातून घटत आहे असें वाटतें हें मी दुश्चिन्ह समजतों. महाराष्ट्रांत कायदेपांडित्य कधीं असलेंच तर त्यास आज ओहोट लागला ह्यात संशय नाहीं.

प्रत्यक्ष कायद्याच्या बाबतींत वकिलांकडे पुढारीपण असणें साहजिक असल्यामुळें इतर सर्वच बाबतींत तें त्यांच्याकडे असलें पाहिजे. कारण मनुष्याचें प्रत्येक कृत्य नियंत्रित असावें लागतें. ह्या नियंत्रणाचें बीज कधीं धर्मांत, कधीं कायदेकानूंत तर कधीं स्वतःच्या मनोदेवतेंत असतें. ह्या दृष्टीनें विचार करिता विशिष्ट प्रकारच्या दाव्यात वकिलांना मज्जाव करणें जरूर असेल तर तसें करताना सरकारनें फार सावधगिरी बाळगली पाहिजे ह्यात शंका नाहीं. येथें मला सरकारनें नुकत्याच केलेल्या कूळकायद्याची आठवण होते. कुळाचें कल्याण करणें हा ह्या कायद्याचा हेतु होताच पण शिवाय जमिनीसंबंधाच्या भानगडी व कलागती नष्ट करणें हाहि उद्देश कायदा करण्याच्या मागें होता. ज्या ठिकाणीं मालक स्वतःची जमिन कसीत नाहीं तेथें ती दुसरा इसम लावतो. लावणारानें मक्ता मालकाला घातला नाहीं तर जमीन कुळाला सोडावी लागते. सरकारनें मक्ते ठरवून दिले आहेत व पावती देण्याची सक्ती केली आहे पावती न दिल्यास मालकाला दंड ठेवला आहे. तेव्हां कुळकायद्याखालीं येणाऱ्या अशा दाव्यात मक्ता दिला आहे कीं नाहीं हाच एक प्रश्न निर्णयार्थ उद्‌भवतो; आणि तोहि पावती आहे किंवा नाहीं हें पाहून सहज निकालात काढता येतो. ह्यास्तव सरकारनें दिवाणी कोर्टांना ह्या कामीं बाजूला ठेवलें व वकिलांना मज्जाव केला. कायदा पसार होण्याच्या वेळेस कायदेकारी सभेंत सरकारवर दिवाणी कोर्टांना डावलल्याबद्दल कडक टीका करण्यात आली. ही टीका अज्ञानमूलक होती. कूळकायद्याचा उद्देशच कायदेपंडिताच्यासुद्धा ध्यानीं आला नाहीं. सरकारनें इतकें काम सोपें करून ठेविलें आहे कीं कायद्याच्या तक्रारी उद्भवणेंच शक्य नाहीं. असें असून मी पाहतों कीं, दिवाणी कोर्टांकडून मामलेदाराना मनाई हुकूम जातातच. कायद्याच्या कोर्टांत कायद्याची पायमल्ली केली जाते ह्याचें कारण अज्ञान. आपल्या कामात वकील व न्यायाधीश ह्यांना जिव्हाळाच वाटत नाहीं.

महाराष्ट्रांतील कोर्टांमधील फिर्यादी कैफियती निरीक्षून पाहा त्यांत दोषस्थळें आढळल्यावाचून राहणार नाहींत. एकच उदाहरण देतों. मूळचे प्रतिवादी सामील प्रतिवादी करण्याविषयीं तक्रार करीतात अशा प्रसंगीं बहुधा वादीच्या फिर्याद दुरुस्तीच्या अर्जांत प्रतिवादींची तक्रार राहू नये म्हणून अमूक अमूक इसमास सामील प्रतिवादी नवर अमूक म्हणून नांव दाखल करावें असें म्हटलेलें असतें हा अर्ज कबूल होतो, फिर्याद दुरुस्त होते, सामील प्रतिवादी हजर राहून कैफियत देतो, मुद्दे निघतात, कांहीं तरी निकाल होतो हा सर्व प्रकार सामील प्रतिवादीविरुद्ध फिर्यादीला कारण काय घडलें हें न सांगता होतो. माझ्या पक्षकाराविरुद्ध वादी दावा करण्याला कारण घडलें असें म्हणत नाहीं सबब मी कैफियत देत नाहीं व वादीचा अर्ज नामंजूर व्हावा अगर माझ्या पक्षकाराच्या पुरता दावा रद्द करावा अशी कांहीं तक्रार कोणीच करीत नाहीं हायकोर्टांतल्या वकिलांना असले दावे चालवण्याचें माहीत नसल्यामुळें त्यांच्याहि हा दोष लक्षांत येत नाहीं अशा रीतीनें बेकायदेशीर काम हायकोर्टापासून खालपर्यंत केलें जातें मला येथें आमचें कायद्याचें अज्ञान प्रामुख्यानें वाचकांच्या निदर्शनास आणावयाचें आहे हें अज्ञान आम्हांस आज सर्व बाबतींत भोंवत आहे.

मुंबईच्या वरिष्ठ न्यायालयांतील न्यायाधीशमुद्दा हा दोषापासून पात्र आहेत फिर्याद व कैफियत ह्यांच्याबरोबर पक्षकारांनीं आपआपले प्रमाणभूत दस्तऐवज हजर केले पाहिजेत असा नियम असतां हायकोर्ट नोंदलेला दस्तऐवज असला कीं, त्याच्या खरेपणाविषयीं संशय नाहीं ह्या सबबीवर ते वाटेल त्या वेळीं दाखल करून घेण्याची सवलत पक्षकाराला देतात ह्यामुळें विरुद्ध बाजूचें किती नुकसान होतें ह्याचा विचार हायकोर्ट करीत नाहीं वादीनें फिर्यादींत अथवा साक्षीच्या यादींत दस्तैवजाचा निर्देश केला असेल त्यास अनुसरून प्रतिवादीचा वकील कैफियत तयार करतो अशा वेळीं दावा चालू झाल्यावर वादीनें कागद हजर केल तर प्रतिवादीचें सर्वस्वीं नुकसान होतें दावा चालविण्याचे जे कानू आहेत त्यांत न्याय, अन्याय, खरें, खोटें ह्याचा विचार अप्रस्तुत होय ह्या एका चुकीमुळें खालच्या कोर्टांचीं कामें ढिलाईनें चालतात, आणि एका पक्षकाराला अन्याय होतो तसेंच पक्षकारांना बेशिस्त पणाचें वळण लागतें. शिवाय प्रतिवादीला चकवण्याकरतां वादी कागद जवळ असून मुद्दाम मागें ठेवतात

दुसरी एक दुरुस्ती कायद्यामध्येंच होणें अवश्य आहे हायकोर्टांत सत्यनिर्णया वर (फॅक्ट फाइंडिंग) अपील करितां येत नाहीं असा नियम करण्यांत सत्यनिर्णय हें सोपें काम आहे अशी समजूत आहे. ही समजूत सर्वस्वीं चुकीची आहे. अनेक प्रसंगीं कशाला सत्य (फॅक्ट) म्हणावयाचें हेंच सांगता येत नाहीं सत्यामध्यें अनु मानाचें मिश्रण असतेंच, आणि अनुमानें बरोबर काढणें आमच्या ह्या बाजूला तरी शिक्षितानांहि साधत नाहीं समजा, वादी ही व्यभिचारी आहे काय हा मुख्य मुद्दा आहे त्याचा निर्णय अशिलपक्षीं खालच्या कोर्टानें दिला हा सत्य निर्णय मानण्यांत

येतो. अशा वेळीं वरिष्ठ न्यायालयाकडे दाद मागता येत नाहीं. ह्या मुळें कशा अन्याय होतो ह्याचें एक उदाहरण देतों. असाच एक दाव्यात मुख्य मुद्दा असताना प्रतिवादी दीरानें वादीला गर्भवात केल्याच्या आरोपावरून सेशन कोर्टानें दंड केल्याचा दाखला हजर केला. हा पुरावा भरपूर व निर्णायक आहे अशा समजुतीनें अधिक पुरावा दिला गेला नाहीं. कोर्टानेंहि तो निर्णायक आहे असें समजून बाईला व्यभिचारी ठरविलें. परंतु हा निर्णय चुकीचा आहे ह्याची मला शंकामुद्रा वाटत नाहीं.

पुरुषानें स्त्रीवर बलात्कार करणें शक्य आहे व तसें झालें असता स्त्रीधर्माप्रमाणें ती गर्भार राहणें हेंहि शक्य आहे. अशा प्रसंगीं त्या स्त्रीला व्यभिचारी म्हणून संबोधणें अनुचित होय. व्यभिचार ही नुसती शारीरिक क्रिया असून चालत नाहीं. मन व्यभिचारी पाहिजे. तात्पर्य, एखादी स्त्री चांगल्या चालीची नाहीं असें आपण म्हणतो तेव्हा तें सत्यकथन नसतें. त्यात आपल्या अनुमानाचा भाग असतो. अनुमान ही एक विचारपद्धति आहे. हायकोर्टाचें ह्या प्रकाराकडे लक्ष गेलेलें दिसत नाहीं. फारच अन्याय आढळला तर कांहीं तरी निमित्त शोधून हायकोर्ट विचार करितें. परंतु गोष्ट व्यक्तीवर अवलंबून राहते. त्यापेक्षा नियमच रद्द करणें श्रेयस्कर होय.

वकिलानें खोटें काम घ्यावें काय हा एक नित्याचा चर्चेचा विषय आहे. हा प्रश्न बहुधा फौजदारी कज्ज्यांत विशेषतः उद्भवतो. खोटें काम घेणें पत्करणें हें दोषास्पद आहे ह्यांत संशय नाहीं. तथापि वकिलानें न्यायाधीश होऊं नये हेंहि तितकेंच खरें आहे. खरेंखोटें ठरविण्याचें काम न्यायाधिशाचें; वकिलाचें नाहीं. वकिलानें पक्षकाराचें म्हणणें संगतवार व कायद्याला अनुसरून कोर्टांत मांडावयाचें असतें. मी खून अथवा चोरी केली आहे पण मी नाकबूल करणार, पुरावा माझ्याविरुद्ध मिळण्यासारखा नाहीं असें स्पष्ट सांगणाऱ्या पक्षकाराचें वकीलपत्र घेणें हें अनैतिकच ठरणार. वकिलाला संशय आला तर तोच बरोबर आहे असें मानून पक्षकाराला मिटकारणें योग्य होणार नाहीं. पुरावा नसल्यास तूं नाकबूल कर असा पक्षकाराला सल्ला देणें अत्यंत दोषास्पद आहे. दुर्दैवाची गोष्ट ही कीं, इतका सोंवळेपणा राखणारे वकील विरळा. दिवाणी दाव्यात दस्तऐवज मुदतीच्या बाहेर गेला तर मुदतीची हरकत अवश्य घ्यावी, परंतु पैसा घेतलाच नाहीं अगर फेड केली अगर कागद लिहून दिला नाहीं ह्या त्याच्या जोडीला दुसऱ्या खोट्या तक्रारी करणें गैर आहे.

न्यायाधीश जो निर्णय देतो तें शंभर टक्के सत्य असतें अगर असलें पाहिजे अशी सामान्य समजूत असलेली आढळते. परंतु ती भ्रामक आहे. प्रत्येक न्यायाधिशानाहि मी न्याय करीत असतो असा अभिनिवेश असतो. अशी घमेंड बाळगणें म्हणजे सर्वसाक्षी परमेश्वर स्वतःला समजण्यासारखें आहे. न्याय हा कायद्याच्या वेष्टनानें घेरलेला आहे. कायद्याच्या चौकटीबाहेर पडण्याचें स्वातंत्र्य न्यायाधिशाला नसतें. आमच्याकडील व्यवहारपंडितांनीं न्यायाधिशाला कायद्याच्याहि वर ठेवला होता.

बृहस्पतीनें स्पष्ट बजावलें आहे कीं केवळ शास्त्रवचनावर विसंबून निर्णय देऊं नये. सारासार विचार करून व बुद्धीला पटेल त्याप्रमाणें निकाल करावा. धर्म आणि व्यवहार हीं दोन भिन्न आहेत. हल्लींचा न्यायाधीश कायद्याचा गुलाम आहे. न्याय देण्याचे अधिकार जेव्हां अनेकांना द्यावे लागतात तेव्हां नियमात न्यायदेवतेला अडकवल्यावाचून गत्यंतर नसतें. तसें न केल्यास अनर्थ होईल. न्याय क्वचित्, अन्याय निरंतर अशी आपत्ति ओढवल्यावाचून राहणार नाहीं.

वकिलापासून आणखी एक अपेक्षित होतें. त्यांचा संबंध खालच्या अशिक्षितांशीं येतो. तेव्हां ह्या लोकांमध्यें त्यांना कायद्याच्या ज्ञानाचा प्रसार करितां आला असता, त्यांच्या मनावर न्यायालयाचें गांभीर्य व पावित्र्य बिंबवितां आलें असतें, त्यांना बस्तखोरपणाची संवय लावतां आली असती, आणि अशा रीतीनें ह्या सर्वांचा परिणाम त्यांच्या घरगुती व्यवहारावर झाला असता. आज वस्तुस्थिति ह्याच्या अगदीं उलट आहे.

सार्वजनिक अन्यायाकडे वकील दुर्लक्ष करितात असा अनुभव आहे. कायद्याच्या बलावर सरकारवर व संस्थांवर दावे करून इष्ट सुधारणा घडवून आणणें कित्येक बाबतींत अशक्य नसतें. परंतु पक्षकार आला तरच कायदा उघडावयाचा ही वृत्ति असणारे वकील सार्वजनिक अपकृत्याबद्दल पूर्णपणें बेफिकीर असतात. वकील म्हणजे जागले होत. त्यांनीं सदैव जागृत राहून सत्तावाल्यांच्या पुढाऱ्यांला आळा घातला पाहिजे. ह्या बाबतींत धुळ्याच्या जावडेकर वकिलाचें उदाहरण प्रशंसनीय आहे. दुर्दैव हें कीं, जावडेकरांना कोणी असा कामीं वारस लाभला नाहीं

नवीनच झालेल्या वकिलानें एकदम स्वतंत्रपणें काम करूं नये. जुन्या वकिलाचा मदतनीस म्हणून एक वर्ष तरी त्यानें काम करणें इष्ट आहे. वडील वकिलांनीं मात्र मोकळेपणानें नवीनास शिकविलें पाहिजे परंतु सध्याची जी बौद्धिक व नैतिक पातळी आहे ती विचारात घेता हा प्रयोग यशस्वी होईल असें वाटत नाहीं. काम सोडलेले वकील, पेन्शनर न्यायाधीश ह्यांचा उपयोग होण्यासारखा आहे. मात्र नवीन वकिलांना ह्या मदतीचें अथवा शिक्षणाचें महत्त्व पटलें पाहिजे. फिर्याद–कैफियत लिहीत असताच दाव्याचा निकाल काय होणार याची अटकळ वकिलाला असली पाहिजे.

फिर्याद, कैफियत तयार करण्यापूर्वी वकिलानें दाव्यासंबंधीं इत्थंभूत माहिती पक्षकाराकडून काढून घेऊन तिचें टांचण करावें आणि त्यावर पक्षकाराची सही घ्यावी. अशी पद्धत ठेवणारे वकील कोणी असल्यास मला माहीत नाहीं. जमिनीच्या कबजाच्या दाव्यात जमिनीचा धारा कोण भरतो असा प्रश्न कोर्टानें विचारल्यास पक्षकाराला विचारून सांगतों असें सांगण्याची पाळी वकिलावर येणें गैर आहे. ह्यामुळें दावे विनाकारण लांबतात. अशा वेळीं वकिलांना वळण लावण्यास आपण असमर्थ आहों अशी न्यायाधिशांची चुकीची समजूत झालेली असते.

न्यायदेवता चतुर्भुज असते. पक्षकार, वकील, साक्षीदार व न्यायाधीश हे तिचे चार हस्त होत. आतां आपण न्यायाधिशाचा विचार करूं. न्यायाधीश कितीहि प्रामाणिक असो; त्यानें दिलेला निर्णय हा त्याच्या वेदनशक्तीशीं एकरूप असणार. दृष्टीसमोर असलेल्या पदार्थाचें आपणास ज्ञान होतें तें वास्तविक असतें असें नाहीं, असें तत्त्ववेत्ते म्हणतात. येथें तर पदार्थ अगर विषय काय आहे हेंच ठरवावयाचें असतें. हा निश्चित करावयाचा विषय सावयव नसतो ही आणखी मोठी अडचण. निर्णय साकार असता तर लोकांना तो पटला असता; त्याच्या खरेपणाविषयीं शंका राहिली नसती. परंतु तो अमूर्त अथवा निर्बिंड असतो. अर्थात् निर्णयविषय व निर्णय दोनहि अमूर्त. अनुमान, युक्ति, तर्क, सारासार विचार, ह्यांचेंच ह्या ठिकाणीं प्राबल्य असतें आणि त्यांचें अधिष्ठान म्हणजे पक्षकार, वकील, साक्षीदार आणि न्यायाधीश ह्यांची बुद्धि. ज्या मानानें ही बुद्धि सुसंस्कृत, विकसित व निर्दोष असेल त्या मानानें निर्णय सत्याच्या जवळजवळ येईल. परंतु मनुष्यामनुष्यामध्यें बुद्धींद्रियाचा विकास समसमान कधींच नसतो. यामुळेंच निरनिराळ्या बुद्धिमान् माणसांनी दिलेले निर्णय भिन्न असण्याचा संभव उद्भवतो. कायदा हा जरी मानवी जीवनाच्या मूलतत्त्वांवर अधिष्ठित असला तथापि व्यवहारज्ञान आणि सारासार विवेकशक्ति यावरच त्याची उपयुक्तता अवलंबून आहे. परंतु कित्येकांची ते कायदेपंडित असूनहि, सारासार विचाराशीं ताटातूट झालेली दिसते. असल्या माणसांनीं वकील अथवा न्यायाधीश यांचा व्यवसाय न करणें हितावह होईल. असा अनुभव येतो कीं, एकादा विषय कित्येक दहा मिनिटांत आकलन करूं शकतात तर दुसऱ्यांना तोच विषय समजून घेण्यास दहा तासहि पुरत नाहींत. हा स्वाभाविक फरक न्यायाधिशांचें गुणमापन करतांना विचारांत अवश्य घेतला पाहिजे. नवीन नेमलेल्या न्यायाधिशांना दोन वर्षेपर्यंत सरकार कायम करीत नाहीं हें ठीक आहे. परंतु हा नियम म्हणजे नुसता विधि होऊन बसला आहे. ह्या मुदतींत न्यायाधिशांनी दिलेले निर्णय दोनतीन तज्ज्ञांच्या समितीनें सूक्ष्मपणें निरीक्षून कायम करण्याची शिफारस करीत गेल्यास कर्तृत्वहीन न्यायाधिशांची अडगळ कमी करिता येईल.

हें झालें निर्णयाच्या गुणावगुणाबद्दल. परंतु याहीपेक्षा कोर्टाच्या कामाविषयीं सार्वजनिक तक्रार ऐकूं येते ती दाव्याचा निकाल होण्यास लागणारा विलंब. कांहीं अंशीं काम करण्याच्या पद्धतीचे जे नियम आहेत त्यामुळें विलंब होणें अपरिहार्य होतें. तथापि न्यायाधिशाची काम करण्याची स्वतःची जी तऱ्हा असेल तिच्यावर बऱ्याच अंशानें विलंबाची जबाबदारी पडते ही गोष्ट खोटी नाहीं. विलंबाचीं कारणें पाहून प्रत्येक बाबतींत सुधारणा करता येण्यासारखी आहे. समन्स वेळेवर लागून न येणें, पक्षकारांनी मुदती मागणें, वकिलाची तयारी नसणें, तसेंच नियमित काल काम न करणें इत्यादि प्रकार हरहमेश घडत असल्यामुळें दावे लांबणीवर पडतात. सदरहू कारणें दूर करितां येण्यासारखीं आहेत. हायकोर्टातील न्यायाधिशाचा नियमितपणा जर खालील न्यायाधीश पाळतील तर त्याचा कामावर अनुकूल परिणाम झाल्याशिवाय

राहण र नाहीं. त्याचप्रमाणें मुद्दे काढण्यापूर्वी कोर्टाकडून पक्षकार हमरास तपासले गेले तर पुढें पुरावा आटोक्यात येतो व दाव्याचा निकाल लवकर लागण्यास मदत होते न्यायाधिशाना अधिकार असून तो न वापरून न्यायाधीश आपलें स्वत चें व लोकाचें नुकसान करितात. अगदीं साधी व क्षुल्लक गोष्ट असते पण तिच्याकडे दुर्लक्ष झाल्यानें पक्षकार व साक्षीदार याना निष्कारण त्रास सोसावा लागतो आणि खर्च वाढतो, तसेंच दावे लाबतात साक्षीदाराच्या यादींत कोणत्या मुद्यावर साक्षीदार दिलेला आहे हें पक्षकाराना लिहून दर्शे भाग पाडल्यास वरील सर्व गैरसोई पुष्कळ अशानें नाहींशा होतील मथताचें अक्षर शाबीत करावयाचें असतें परतु कोर्टाला अगर वकिलाला वेळ नसल्यामुळें साक्षीदाराला काहीं एक विचार न करिता अनेक वेळा पुन्हा पुन्हा बोलाविलें जातें साक्षीदार कोणत्या मुद्यावर आहे हें माहित नसल्यामुळें असले प्रकार घडतात कज्जे लाबणीवर पडण्यास कोर्टाचे बेलिफ हे बऱ्याच अशानें कारणीभूत असतात कामगिरी बजावण्याच्या कामीं बलिफाना जें स्वातंत्र्य मिळतें त्याचा ते दुरुपयोग करितात यास्तव बलिफाना कोर्टानें आपल्या काबूत ठेवलें पाहिजे कामावर जाण्याचे व परत येण्याचे दिवस निश्चित करून बेलिफाच्या या फिरतीचा तक्ता कोर्टानें आपल्या टेबलावर ठेवून तदनुसार कच्च्याच्या तारखा नेमल्या तर 'समन्स येण्यावर' हें एक दावे लाबण्याचें कारण आपोआप दूर होईल त्याचप्रमाणें ज्या गावाची कामगिरी असेल त्या गावाला दिवसभर बेलिफानें राहिलेंच पाहिजे असा नियम केल्यास समन्सें न बजावता परत देण्याची भीति उरणार नाहीं. सध्या बेलीफ गावीं जातो, जरूर तो इसम भेटला नाहीं म्हणजे तो तेथून निघून दुसरा गाव गाठतो व या मूर्खपणामुळें समन्सें अगर नोटिसा पुन्हा पुन्हा पाठवाव्या लागतात.

पैसा खाणारे न्यायाधीश क्वचित् सरकारच्या सर्व खात्यात न्यायखात्याइतकें सोज्वळ व निष्कलक, त्याचप्रमाणें वाकबगार खातें दुसरें नाहीं परतु न्यायाधीश उच्चे असूनहि त्याचें नाव बद्दू करणारे शिष्ट जन समाजात ठिकठिकाणीं आहेतच तेच त्याच्या नावावर पैसे खातात काहीं लोकाचा हा एक उदरपोषणाचा धदाच होऊन बसला आहे आणि त्यात दु खाची गोष्ट ही कीं क्वचित् वकीलहि असल्या प्रकारच्या निंद्य कर्मांत कुशल असलेले ऐकू येतें ग्रथकारानीं न्यायाधिशाच्या नावावर हुच्चे लोक पैसे कसे उकळतात याचीं उदाहरणें दिलीं आहेत मीहि माझ्या जीवनवर्तृत माझी व इतराचीं अशाच मासल्याचीं उदाहरणें दिलीं आहेत अशा उदाहरणांचा अभ्यास करण्यासारखा आहे.

स्वत न्यायाधिशाला फळफळावळ अथवा डाली पोहोंचविणारे पक्षकार आढळतात ग्रथकारानीं अशा प्रकारचें एक उदाहरण ग्रथांत दिलें आहे अशा प्रसगीं प्रामाणिक न्यायाधिशाला सात्विक सतार होऊन त्याच्याकडून शिक्षा म्हणून पक्षकाराच्या विरुद्ध निकाल केला जातो या वेळीं असा प्रश्न उद्भवतो कीं निकाल कायद्याप्रमाणें पक्षकाराच्या बाजूनें व्हावयाचा असून केवळ त्याच्या गैर वागण्यानें

त्याच्या विरुद्ध न्यायाधिशानें निकाल देणें हें योग्य होईल का? माझ्या मतें हा अन्याय आहे. न्यायाचे कामीं न्यायच होणें रास्त आहे. आणि तो कायदा व पुरावा याना अनुसरूनच झाला पाहिजे. अखेर निर्णयावर आगंतुक गोष्टीचा परिणाम होता कामा नये. एवढें मात्र खरें कीं, न्यायाधिशानीं जरी डाळीचा स्वीकार केला नाहीं तरी पण निकाल डाळी देणाऱ्या पक्षकाराच्या वतीनें झाल्यास त्याच्या मनाला ती गोष्ट डवचल्याशिवाय राहणार नाहीं. या दोषी पक्षकाराच्या वतीनें निकाल देण्यात माझ्या हातून न कळत अन्याय तर झाला नाहीं ना या विचारानें त्याचें मन त्याला खाईल. न्यायाधिशानें आपलें मन खंबीर ठेवून कायदा व पुरावा याना अनुसरून निकाल करावा परंतु अमूक पक्षकारानें अमूक तऱ्हेचें गैरवर्तन केलें ही गोष्ट उभय-पक्षकाराच्या वकिलास जाहीर रीतीनें सांगावी आणि शक्यतर कोर्टाची बेअदबी करण्याचा आरोप ठेऊन त्याच्यावर काम चालवावें.

स्वतः न्यायाधीश जरी शुद्ध असले तरी कचेरींतील कारकून वगैरे मंडळी तितकी सोंवळी असतात असें म्हणणें कठीण आहे. परंतु याचा दोष वकिलाकडे आहे असें म्हणावें लागतें. कोर्टांतील कोणत्याहि इसमाला वाममार्गानें कांहींहि देऊं नये असा जर प्रत्येक कोर्टांतील वकिलानीं ठराव केला तर तेवढ्यानेंहि पुष्कळ काम होण्यासारखें आहे. परंतु जी गोष्ट स्वतः वकील करीत नाहींत ते ती गोष्ट आपल्या कारकुनामार्फत करितात ही प्रथा अत्यंत गर्हणीय समजली पाहिजे. अशा गोष्टींना आळा घालणें वकील लोकाना सहज करिता येण्याजोगें आहे असें मी समजतों.

कांहीं न्यायाधीश पूर्वग्रहानीं पछाडलेले असतात. कोणी ब्राह्मणाच्या विरुद्ध, कोणी सावकाराना पाण्यात पाहणारा; कोणी कुळाचा कैवार घेणारा तर कोणी स्त्री पाहताच अनुकंपेनें, कारुण्यानें विव्हळणारा असा असतो. त्या सर्वांचा परिणाम न्यायदानावर होतो. कोणत्याहि न्यायाधिशात हे दोष असता कामा नये.

आमच्या न्यायाधिशात एक मोठा दोष आढळतो. हायकोर्टाच्या ठरावाचा पगडा त्याच्या पुढील दाव्यावर फाजील पडतो. एका खटल्याची अगर दाव्याची हकीकत तंतोतंत दुसऱ्या दाव्याच्या हकीकतीप्रमाणें असते असें नाहीं. सामान्य तत्त्वें अथवा सिद्धांत हायकोर्टाच्या ठरावात प्रतिपादन केलेलीं असतात, त्यांचा उपयोग अवश्य करावा. परंतु त्यातील निर्णयाप्रमाणें चालू दाव्याचा निर्णय दिला पाहिजे ही समजूत चुकीची आहे. प्रत्येक दाव्याच्या हकीकतीबद्दल न्यायाधिशानें त्या दाव्यापुरतें आपलें मत बनवावें. वेळींअवेळीं प्रसिद्ध झालेले ठराव आपल्या ठरावात नमूद करणें असमंजसपणाचें आहे. ह्या बाबतीत हायकोर्टांतील न्यायाधीशसुद्धां दोषास पात्र आहेत. पुष्कळ ठराव माहीत असणें हें कांहीं विद्वत्तेचें लक्षण खास नव्हे. त्यामुळें उलट बुद्धीचें पारतंत्र्य प्रतीत होतें

ज्या पक्षकाराला व्यवहारचातुर्य नाहीं त्यानें कोर्टाची पायरी चढूं नये. मला वाटतें अशाच कांहीं कारणामुळें वकिलानीं दावे विकत घेण्याची वहिवाट अस्तित्वात आली असावी. वकिलांचें ज्ञान व आपल्या पैशानें दावा चालविणें ही किंमत वकील

देतो, आणि ही किंमत देऊन दावा जिंकल्यास दाव्याच्या मिळकतीचा भाग त्याला मिळावयाचा ह्या वहिवाटीचा उल्लेख ग्रंथकारांनीं केलाच आहे. खानदेश जिल्ह्यात ही चाल मुख्यत्वेंकरून होती. ही रूढी धंद्याच्या आत्यंतिक नीतिकल्पनाविरुद्ध आहे हें खरें, परंतु अशानी पक्षकाराच्या दृष्टीनें कांहींशी फायदेशीर आहे. सर्वच मिळकत जाणार त्यापेक्षा ह्या मार्गानें थोडी तरी राहण्याचा संभव. स्वतःचें काम असें समजून वकील दावा चालवतो हाच फायदा. दाव्याचें उगमस्थान म्हणजे पक्षकार तो जर स्वतः अर्धा वकील असेल तरच दाव्याचें काम शहाणपणानें चालण्याचा संभव असतो.

साक्षीदारांच्या जबान्यावर कज्जांचे निकाल होतात. परंतु आमच्याकडील साक्षीदार अडाणी. त्याना दिक्कालाची अटकळ बिल्कूल नसते. त्याच्या मनांत जें असतें तें उचित शब्दानीं व्यक्त करण्याचें ज्ञान नाहीं. गोष्ट सांगताना पूर्वसंबंध संभाळून बोलतां येत नाहीं. ह्याशेरीज खेडवळ माणसाची बोली न्यूनातिशयोक्तीनें स्वभावतःच–मुद्दाम नव्हे–रंजित असते. आणि ह्या सर्व दुर्घटनेचा कळस म्हणजे कोर्टांत खोटें बोलण्याचें पाप नाहीं ही मूर्खपणाची समजूत. साक्षीदाराची जबानी चालू असतां वकील व न्यायाधीश ह्यांच्यात प्रसंगीं खटके उडतात. साक्षीदार प्रश्न न समजून घेतां घाबरटपणानें उत्तर देतो. हें सोडून निघालेलें उत्तर लिहून घेण्याचा आग्रह वकील धरतो. न्यायाधिशाला साक्षीदाराचा मूर्खपणा समजतो. अशा वेळीं वकिलाचें म्हणणें झिटकारून साक्षीदाराला प्रश्न समजावून देणें हें न्यायाधिशाचें काम आहे. कदाचित् एखादा अननुभवी किंवा नाठाळ वकील न्यायाधिशाला दुरुत्तरें बोलेल, पण न्यायाधिशानें तें चिकटवीलहि.

आमच्याकडे बहुतेक साक्षीदार अप्रतिष्ठित वर्गाचे असतात त्यामुळें साक्षीदारांना वागवण्याचा दृष्टिकोनहि अशिष्टपणाचा बनला आहे. साक्षीदारांना बसण्याला न्यायालयांत जागा नसते हें साक्षीदारांविषयींच्या बेपर्वाईपणाचेंच चिन्ह आहे. उन्हातान्हांत, रस्त्यावर, झाडाखालीं तासच्या तास बिचारे बसून असतात. कोर्ट केव्हां पुकारील ह्याचा नेम नाहीं म्हणून जाग्यावरून हालतांहि येत नाहीं. त्याना प्यावयास खावयास लागेल ह्याचा विचारहि कोणी करीत नाहीं! मग त्याच्या कामाचे दिवस आपण वाया दवडवितों ह्याची जाणीव नसल्यास नवल नाहीं.

सुशिक्षित साक्षीदाराच्या जबानीला वेळ लागत नाहीं. अशिक्षित साक्षीदार कोर्टाचा फार वेळ घेतात. ह्याची प्रमुख कारणें दोन. आपणास प्रत्यक्ष जितकी माहिती आहे त्याहून अधिक असल्याचा आव साक्षीदार आणतो. दुसरें कारण म्हणजे स्वतःची माहिती व ऐकीव माहिती ह्यांची तो गल्लत करतो. ह्याकरितां वकिलांनीं आधीं साक्षीदाराची घरीं जबानी घेऊन तिचें टांचण करावें. ह्या उपायानें गाळ गळला जाऊन नेमकें साक्षीदाराला प्रत्यक्ष माहीत असेल तेवढेंच राहील, कोर्टाचा वेळ वांचेल आणि आपल्या पक्षकाराच्या साक्षीपुराव्याची यथार्थ कल्पना वकिलाना येईल. साक्षीदाराचें तोंडहि न पाहतां त्याला एकदम कोर्टापुढें आणणें हें आत्मघातक आहे.

साक्षीदाराची चर्या, त्याची बोलण्याची पद्धत ह्याचा न्यायाधिशावर परिणाम होत असतो व तो उच्चारलेल्या शब्दांपेक्षाहि अधिक अर्थसूचक असतो. वकिलानें साक्षीदाराचा जबाब घरीं घेणें म्हणजे त्यास पढविणें नव्हे हें मात्र विसरता कामा नये.

साक्षीदाराला अंशतः तरी प्रतिष्ठा आहे; पिंजऱ्यात उभा राहणाऱ्या माणसाला काहीं हक्क आहेत ह्याची अंधुकसुद्धा कल्पना कोणास नाहीं. साक्षीदाराला ' हं! हा कागद आतां वाच! पाहूं—मोठ्यानें वाचा ' अशा दिमाखानें वकील फर्मावतो. बिचारा साक्षीदार वाचूं लागतो. परंतु एखाद्या दणगट साक्षीदारानें ' मी येथें वाचनाची परीक्षा देण्याकरता आलों नाहीं; तुम्हींच वाचा. मला माहीत असेल व आठवेल तेवढें मी सांगेन ' असें सरमरीत उत्तर दिलें तर! अशा वेळीं न्यायाधिशानें साक्षीदाराच्या साहाय्यार्थ आलें पाहिजे; पण असें साहाय्य क्वचितच मिळतें.

ब्रिटिशांनीं न्यायपद्धति उचलून औद्योगिक युगातील न्यायपद्धति येथें रुजविली. आतां प्रश्न असा उद्भवतो कीं ही चालू पद्धति आपल्या राष्ट्राला उपकारक झाली आहे काय? आता ह्यापुढें आपण ती स्वीकारावी काय? माझ्या मतें उद्योगधंद्यांनीं गजबजलेल्या व गुंतागुंतीच्या व्यवहाराच्या जाळ्यात सापडलेल्या जगात पूर्वीची साधीसुधी न्यायदान पद्धति अपुरी पडेल. ह्यास्तव शहरी प्रदेशात इंग्लिश पद्धति कायम ठेवावी. परंतु ग्रामीण प्रदेशाकरतां तिचा अंगीकार करणें निःसंशय वेडेपणाचें होईल. दिवाणी व फौजदारी कामें चालविण्याचे नियम धाब्यावर बसवून ग्रामीण कोर्टें निर्माण करावीं. हीं कोर्टें विवक्षित क्षेत्रापुरतीं असावीं. सरकारनें तीन माणसें नेमावीं. त्यापैकीं प्रमुख कायद्याची परीक्षा उत्तीर्ण झालेला असावा; दुसरे दोघे व्यवहारज्ञ चतुर व निःस्पृह असे सामान्य जनांपैकीं असावे. हें कोर्ट फिरतें असून जेथील दावा असेल तेथें जाऊन चौकशीचें काम त्यानें करावें. त्या दाव्यापुरतें गावातील दोन माहीतगार इसम सल्ला देण्याकरता घ्यावे. ह्या कोर्टाच्या ठरावावर सहजासहजीं अपील होऊं नये. साराश, न्यायपद्धतीचे दोन स्वतंत्र भाग पाडावे. सध्याच्या पद्धतीनें ग्रामीण जनतेचा सत्यानाश होत आहे. प्रस्तुत ग्रंथानें इंग्लिश पद्धतीच्या गुणदोषाच्या चर्चेला चालना मिळाली तर एक चागलें कार्य होईल. मुसलमान नुसते सत्ताधीश झाले, इंग्लिशांनीं सत्तेबरोबर औद्योगिक युग निर्माण केलें, त्यामुळें त्यांना परिचित असलेली न्यायपद्धति त्यांना येथें सुरू करावी लागली, असो.

ग्रंथकारांनीं अनेक विषय चर्चिले आहेत. त्या सर्वांचा पुनरुच्चार करून वाचकांना बेजार करून सोडणें योग्य होणार नाहीं. ग्रंथकाराचा अनुभव व व्यासंग अचाट आहे. प्राचीन काळच्या तसेंच मराठी शाहींतील न्यायपद्धतीची त्यांनीं दिलेली ऐतिहासिक माहिती सामान्य वाचकाला बहुमोलाची वाटेल ह्यात संशय नाहीं. असें असूनहि एका शोचनीय प्रकाराचा उल्लेख केल्याशिवाय माझ्यानें राहवत नाहीं. हायकोर्टात अपील करताना खालच्या कोर्टाचे वकील हायकोर्ट वकीलाला देण्याकरतां म्हणून पक्षकाराकडून फी घेतात. त्यापैकीं निम्मे अधिक आपणच ठेवून

बाकीची वरच्या वकिलाच्या हातांत टाकतात व तितकीच फी पक्षकाराकडून आली असल्याचें भासवितात. ही गोष्ट अत्यंत लांछनास्पद आहे. वकीलीच्या व्यवसायांतून अशा लोकांना हायकोर्टानें मुक्त करणें योग्य होईल.

श्री. भट यांनीं नवीन घातलेला हा पायंडा पुढील पिढींतील वकिलांनाच नव्हे तर इतर व्यावसायिकांनाहि अनुकरणीय वाटेल व मराठी वाङ्मयाचें एक नवीन दालन भावि लेखक सुशोभित करतील अशी उमेद आहे. श्री. भट हे आपला आशय सुबोध भाषेत वळवूं शकतात याचें प्रत्यंतर या ग्रंथांत स्पष्ट दिसतें. त्यांच्या अनुभवांचा व व्यासंगाचा फायदा असाच यापुढें मिळत राहील असा विश्वास व्यक्त करून ही प्रस्तावना आटोपती घेतों.

—ना. गो. चापेकर

प्रकरण १ लें

# जिल्हा कोर्टांतील वकिलीचीं चार तपें

" आपल्याकडील सरस्वतीच्या राज्यातील बहुतेक एकोन एक क्षेत्रे लागवडीवांचन आज शेंकडो वर्षे रिकामी पडलेली असता, अमुक क्षेत्र नापीक व अमुक क्षेत्र सुपीक, असे आम्हीं काय म्हणून म्हणतों ? परदेशचे लोक आपापल्या देशाना लागू पडणारी जी विधाने करतात ती अक्षरशः उचलून आम्ही चोहोकडे मिरवावी हा शहाणपणा कोठला ? गोष्ट अशी आहे कीं आपल्या इकडील सरस्वती प्रदेशातील सर्व क्षेत्रे भरपूर पीक देण्याला खचून मेहनत करणाऱ्या व पाश्चात्य यंत्राचा उपयोग करणाऱ्या उद्योगी कृषीवलाची उत्सुकतेने नुसती वाट बघत आहेत हीं फार दिवसाची आशा सफल झाली तर ही क्षेत्रें जें उफाड पीक देतील तें घेऊन महाराष्ट्रातील लोक आपल्याला धन्य मानतील व पाहून पृथ्वीवरील सर्व राष्ट्रें कौतुकाने माना तुकवतील परंतु हे व्हावे कसे हाच प्रश्न आहे "

—राजवाडे-कादंबरी, पान ३१

# प्रास्ताविक निवेदन

' जिल्हा कोर्टांतील वकिलीचीं चार तपें ' हें या ग्रंथाचें नांव असल्याकारणानें न्यायाधिकारी, वकील, वकीलवर्ग, वकिलीचा धंदा इत्यादि विषयाचीं त्याचप्रमाणें दिवाणी व फौजदारी कोर्टांत निर्णयार्थ येणारे वाद, त्या कामांतील पक्षकार, सॉलिसिटर्स, वकिलीच्या धंद्यामुळें निरनिराळ्या जातींच्या लोकांचे व निरनिराळे व्यवसाय करणाऱ्या लोकांचे स्वभाव इत्यादि विषयींची वकिलीचा धंदा करणारा या नात्यानें आम्हांस जी नानाविध प्रकारची माहिती झाली तिचें दिग्दर्शन आम्हीं या ग्रंथात केलें असलें पाहिजे असें अनुमान सुज्ञ वाचक करतील आणि तें योग्य आहे. परंतु आतां दर्शविलेल्या माहितीचें दिग्दर्शन करणें एवढ्यानेंच या ग्रंथाच्या प्रतिपाद्य विषयाच्या कथनाची परिपूर्तता होणार नाहीं. या ग्रंथातील पुढील भागात जें विवेचन येणार आहे त्यावरून महाराष्ट्रांत इंग्रजी राज्याची स्थापना झाल्यानंतर इंग्रजांनीं प्रजेत उत्पन्न होणाऱ्या नानाविध व्यवहारांचा व गुन्ह्यांचा निर्णय करण्याकरितां दिवाणी व फौजदारी कोर्टांचें जें एक प्रचंड यंत्र नानाविध कायदे मंजूर करून अस्तित्वांत आणलें त्यातील वकील हा एक महत्त्वाचा घटक आहे. ही गोष्ट लक्षांत घेतां इंग्रजांनीं निर्माण केलेल्या यंत्राचें वर्णन करणें व त्याविषयींची जरूर ती माहिती या ग्रंथांत देणें अपरिहार्य आहे. महाराष्ट्रांत इंग्रजी राज्याची स्थापना

होण्यापूर्वी दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीतील अंदाधुंदीमुळें महाराष्ट्रांतील प्रजेच्या अत्यंत हालअपेष्टा झाल्या. देशांत शांतता व सुव्यवस्था यांचा पूर्ण अभाव होता. ही स्थिति इंग्रजी राज्याच्या स्थापनेमुळें नष्ट होऊन देशांतील प्रजेची होणारी लुटालूट पूर्णपणें बंद पडली; व लोकांना शांततेचा व सुखाचा लाभ होऊं लागला इंग्रजी राज्याच्या स्थापनेबरोबर पोस्ट, तार इत्यादि खातीं सुरू करण्यांत आलीं. याशिवाय तालुक्याच्या जिल्ह्याच्या ठिकाणीं प्रजेतील वादाचे निवाडे करण्याकरितां दिवाणी कोर्टें व फौजदारी गुन्ह्यांचे निवाडे करण्याकरितां मॅजिस्ट्रेट कोर्टें व सेशन कोर्टें इंग्रजांनीं सुरू केलीं. अशा कोर्टांच्या स्थापनेमुळें गरिबांवर श्रीमंतांकडून होणाऱ्या जुलूम-जबरदस्तीस आळा पडला. सन १८१८ नंतर दोन तीन पिढ्यांच्या काळांत अशा प्रकारच्या सुखाचा व शांततेचा अनुभव महाराष्ट्रांतील प्रजेस लाभल्यामुळें व स्वराष्ट्राच्या पूर्वेतिहासाचें विस्मरण झाल्याकारणानें जिकडे तिकडे इंग्रजी राज्याचीं स्तुतिस्तोत्रें गाविलीं जाऊं लागलीं आपलें स्वातंत्र्य व स्वराज्य नष्ट होऊन आपण परक्या इंग्रजांचे गुलाम बनलों आहोंत, या गोष्टीची जाणीव महाराष्ट्रांतील प्रजेंत नाहींशी झाली. याशिवाय इंग्रजांनीं स्थापन केलेल्या पाश्चात्य शिक्षणसंस्थांतून शिक्षण घेऊन बाहेर पडलेले सुशिक्षित लोक पूर्वेतिहासाच्या अज्ञानामुळें इंग्रजांनीं निर्माण केलेल्या संस्थांचे गोडवे गाऊं लागले. इंग्रज राज्यकर्त्यांनींहि स्वतःची महती वाढवून घेण्याकरितां व पूर्वीच्या राज्यापेक्षां इंग्रजी राज्यांत शांतता व सुरक्षितपणा यांचा अपूर्व लाभ महाराष्ट्रांतील प्रजेस कसा होऊं लागला आहे, हें प्रजेच्या मनावर ठसविण्याचे प्रयत्न केले. इंग्रजी सत्ता स्थापन होण्याचे सुमारास इंग्रज राज्यकर्त्यांनीं वेळोवेळीं जे जाहीरनामे प्रसिद्ध केले त्यांत सातारच्या छत्रपतींचा अंमल फिरून सुरू झाला असून जुलमी पेशव्यांच्या ऐवजीं छत्रपतींचा कारभार आम्ही पाहूं लागलों आहोंत, याशिवाय अन्य कांहींहि फेरफार झाला नाहीं, असें जाहीर केलें.

आतापावेतों केलेल्या विवेचनाच्या दृष्टीनें इंग्रजांनीं जीं न्यायालयें सुरू केलीं व त्यासंबंधीं वेळोवेळीं जे कायदे त्यांनीं मंजूर करून अंमलांत आणले त्यांचें दिग्दर्शन या ग्रंथांत करणें अवश्य आहे; त्याचप्रमाणें महाराष्ट्रांतील प्रजेचें नियंत्रण करण्याकरितां इंग्रजांनीं नवीन कायदे कोणकोणते अंमलांत आणले व पूर्वकालचे कोणकोणते कायदे रद्द केले यांचेंहि स्थूल दिग्दर्शन या ग्रंथांत करणें अप्रस्तुत होणार नाहीं.

इंग्रजी सत्ता स्थापन होण्यापूर्वी ५००।६०० वर्षें महाराष्ट्र देश कोणकोणत्या राजकीय अंमलाखालीं होता, कोणत्या कायद्यांनीं महाराष्ट्रांतील प्रजेचें नियंत्रण केलें जात असे व न्यायदान देणाऱ्या कोणत्या संस्था महाराष्ट्रांत होत्या यांचें दिग्दर्शन या ग्रंथांत करणें प्रशस्त ठरेल. इंग्रजी सत्तेपूर्वी ६०० वर्षें महाराष्ट्रांत देवगिरीच्या यादवांचें राज्य अर्थात् स्वराज्य अस्तित्वांत होतें. यादव घराण्यांतील शेवटचा राजा रामदेवराव यादव यांचेवर अल्लाउद्दीन खिलजीनें इ. स. १२९४ सालीं स्वारी करून त्याचा पराभव केला. या पराभवानंतर रामदेवराव यादव व अल्लाउद्दीन

खिलजी यांच्यामध्यें तह होऊन रामदेवरावानें अल्लाउद्दिनाचें मांडलिकत्व पत्करिलें. त्यानंतर या उभयतांचे दरम्यान तकारी उत्पन्न होऊन इ. स. १३२५ सालीं यादवाचें राज्य नष्ट झालें. नंतर महाराष्ट्रांत मुसलमानांची राजकीय सत्ता प्रस्थापित झाली. रामदेवराव यादवाचा पराभव करणाऱ्या अल्लाउद्दीन खिलजीची राजकीय सत्ता महाराष्ट्रांत फार काळ टिकली नाहीं. उत्तरेकडील भामधुमीमुळें दौलताबाद सोडून त्याला दिल्लीकडे जावें लागलें, त्याच्या पश्चात् त्यानें मागें ठेवलेल्या सैन्याचा मुसलमान सेनापति हुसेन जाफरखान (हसन गंगू बहामनी) यानें महाराष्ट्रांत स्वतंत्र राज्याची स्थापना केली. या मुसलमानी घराण्यास बहामनी घराणें असें म्हणतात. या घराण्याची सत्ता २०० वर्षे टिकली त्यानंतर बहामनी राज्यातून आदिलशाही, कुतुबशाही, निजामशाही, इमादशाही व बरीदशाही अशी पांच निरनिराळी मुसलमानी सत्तेचीं स्वतंत्र राजघराणीं अस्तित्वात येऊन त्यांची राजकीय सत्ता महाराष्ट्रांत प्रस्थापित झाली. इ. स. १५०० च्या उत्तरार्धात दिल्लीच्या मोंगल बादशहांनीं सर्व राजघराण्यांचा पराभव करून आपली सत्ता महाराष्ट्रावर बसविली. यानंतर छत्रपति शिवाजी महाराजांचा उदय होऊन महाराष्ट्रांत मराठ्यांचा राजकीय अंमल सुरू झाला व तो इ. स. १८१८ पावेतों अस्तित्वांत राहिला.

वर दर्शविल्याप्रमाणें राजकीय सत्तांचीं जी स्थित्यंतरें घडलीं तीं लक्षात घेऊन ईमज राजवटीच्या पूर्वकालाचे तीन विभाग पडतात. [ १ ] यादव राजवटीचा काळ, [ २ ] मुसलमानी राजवटीचा काळ व [ ३ ] मराठी राजवटीचा काळ.

या तिन्ही काळातील न्यायदान संस्था, देशातील प्रजेचें नियंत्रण करणारे कायदे व न्यायदानपद्धति यांचें स्थूल दिग्दर्शन या ग्रंथाच्या प्रतिपाद्य विषयाच्या विवेचनाच्या दृष्टीनें आम्हीं थोडक्यात पुढें केलें आहे. हें विवेचन करण्याचा असचा हेतु पूर्वकालीन व प्रचलित न्यायदानपद्धति यांपैकीं द्रव्य, काल व कष्ट यांच्या व्ययापव्ययाच्या दृष्टीनें प्रजेस कोणती पद्धति श्रेयस्कर व सुखकर आहे याविषयींचें निश्चित मत वाचकांना बनवितां यावें हा आहे. याप्रमाणें विवेचन केल्यावर ब्रिटिश रियासतीच्या प्रारंभापासून तों आजपावेतो मुंबई इलाख्यांतील मुंबई शहर व बाहेरील तालुके व जिल्हे या ठिकाणीं न्यायदान करण्याकरितां स्थापन करण्यांत आलेल्या संस्था व त्यांना मदत करणारे वकील यासंबंधींचा वकिलीचा धंदा गेल्या अठ्ठेचाळीस वर्षे करीत असतां जो अनुभव आम्हांस आला त्याविषयींची माहिती या ग्रंथात आम्हीं दिली आहे. मानवी समाजात कोणतीहि संस्था प्रजेचें हित साधण्याकरितां उच्च ध्येयास अनुसरून उदयास आली असली, तरी प्रत्यक्ष व्यवहारांत त्या उच्च ध्येयाशीं विसंगत असे कित्येक दोष त्या संस्थांत निर्माण होतात. ज्या उच्च ध्येयास्तव या संस्था स्थापन केल्या जातात तें पूर्णपणें सफल होण्याऐवजीं या संस्थापासून अनेक तोटे झालेले प्रत्ययास येतात. यामुळें कोणाचेंहि मनास उद्विग्नता प्राप्त झाल्यावांचून राहत नाहीं. अशा प्रकारच्या संस्थांत जे दोष निर्माण झालेले असतात,

ते चव्हाट्यावर मांडणें कितपत श्रेयस्कर आहे हा वादग्रस्त मुद्दा आहे. कित्येकांकडून या संस्थांत निर्माण झालेल्या दोषांचें आविष्करण करणें हें हीन रुचीचें (Low taste) द्योतक आहे असा आक्षेप घेण्याचा संभव आहे. तथापि जनतेचें हित साध्य करण्याकरितां स्थापन करण्यांत आलेल्या संस्थांत दोष उत्पन्न होऊन संस्था स्थापन करण्याचा हेतु योग्य प्रकारें सफल होत नाहीं असें आढळल्यास ज्या कारणामुळें हा प्रकार घडतो, त्या कारणाची जाहीर चर्चा करून त्या संस्थांतील हे दोष काढून टाकण्याचा प्रयत्न करणें हें इष्ट व जरूरीचें आहे, असें आमचें मत आहे. या आमच्या मतानुसार न्यायालयें, श्रेष्ठ प्रतीचे न्यायाधिकारी, दुय्यम अधिकारी, वकील व पक्षकार इत्यादिकांचे गुणदोष कोणत्याहि प्रकारचा आडपडदा न ठेवितां आम्हीं या ग्रंथांत नमूद केले आहेत.

पूर्वी मुंबई हायकोर्टात वकिलीचा धंदा करणारे नामांकित कायदेपंडित सर चिमणलाल सेटलवाड व सर थॉमस स्ट्रँगमन या दोघांनी बॅरिस्टरीच्या धंद्याबाबत दोन नामांकित ग्रंथ केले आहेत. सर चिमणलाल यांच्या ग्रंथाचें नांव Recollections & Reflections असें असून Around the courts of Bombay हें सर स्ट्रँगमन यांच्या ग्रंथाचें नांव आहे.

मुंबई इलाख्याशिवाय साऊथ आफ्रिकेसारख्या अन्य देशांतील सुप्रीम कोर्टांत एके काळीं कायदेपंडित या नात्यानें वकिलीचा धंदा करणारे महात्मा गांधी यांनीं लिहिलेल्या आत्मचरित्रांत त्या कोर्टांत धंदा करीत असतांना त्यांना आलेले कांहीं अनुभव त्यांनीं Reminiscences या मथळ्याखालीं ग्रथित केले आहेत. त्यांनीं वकिलीचा धंदा विशिष्ट प्रकारचें उच्च ध्येय आपल्यापुढें ठेवून केला. या ध्येयाचा उल्लेख या ग्रंथाच्या पुढील भागांत आम्हीं युक्त स्थळीं केलाच आहे.

हा ग्रंथ लिहितांना कांहीं गत व्यक्तींचा नामनिर्देश आम्हीं केला आहे. परंतु ग्रंथलेखक व अनेक व्यक्ती व स्थळें यांचा उल्लेख करण्याचें हेतुपुरस्सर टाळलें आहे. याविषयीं कित्येकांकडून आक्षेप घेण्याचा जरी संभव असला तरी या प्रकारचा ग्रंथ लिहितांना हाच मार्ग श्रेयस्कर होय असें आम्हांस वाटल्यावरून तो आम्हीं अवलंबिला आहे.

या प्रकरणाच्या शीर्षावर मराठी वाङ्मयाविषयीं कै. राजवाड्यांचा कादंबरी निबंधांतील जो अभिप्राय उद्धृत केला आहे तो चिंतनीय आहे. मराठी वाङ्मय क्षेत्रांत निरनिराळ्या विषयांवर कांहीं थोडे फार नूतन ग्रंथ रचले जाऊन प्रसिद्ध होत आहेत. असें जरी असलें तरी मनास समाधान वाटेल इतकी प्रगति गेल्या ४८ वर्षांत झालेली आढळत नाहीं. मुंबई इलाख्यांत न्यायदान करणारी कोर्टें, न्यायाधिकारी, वकील, वकीलीचा धंदा करणारा वर्ग जवळ जवळ १२५ वर्षे अस्तित्वांत आहे. परंतु याविषयींची माहिती देणारा एकहि ग्रंथ आजपावेतों महाराष्ट्रांत होऊन गेलेल्या शेंकडों वकिलांपैकीं एकानेंहि लिहून प्रसिद्ध केलेला आढळत नाहीं. या विषयासंबंधीं तरी माहिती सर्व मनन करणें उद्बोधक व हितप्रद व अगत्याचें आहे

असें आमचें मत असल्याकारणानें राजवाड्यांच्या प्रारंभीं दिलेल्या उत्तींत व्यक्त केलेल्या अभिप्रायास अनुसरून हा ग्रंथ आम्हीं लिहिला आहे व मराठी वाङ्मयरूपी अनेक ओस पडलेल्या क्षेत्रांत हा ग्रंथरूपी नूतन वृक्ष आम्हीं लावला आहे.

---

प्रकरण २ रें

## इंग्रज राजवटीपूर्वील न्यायदानसंस्था व न्यायदानपद्धति

## यादवांची राजवट

प्रास्ताविक निवेदनांत दर्शविल्याप्रमाणें इंग्रज राजवटीच्या ६०० वर्षांपूर्वीच्या कालखंडापैकीं प्रारंभींच्या यादव कालांतील न्यायालयें व न्यायपद्धति याविषयींचें स्थूल दिग्दर्शन आम्हीं ह्या भागांत केलें आहे. या काळीं न्यायालयें व न्यायपद्धति कोणत्या प्रकारची होती, याविषयींची निश्चित माहिती देणारीं इतिहाससाधनें उपलब्ध नाहींत. यादवकालीन जे शिलालेख व ताम्रपत्रें उपलब्ध झालीं आहेत, त्यांत या विषयासंबंधाची माहिती म्हणण्यासारखी कांहींच आढळत नाहीं. यादवपूर्वकालीन प्रसिद्ध झालेल्या कांहीं ताम्रपत्रांत दान देणाऱ्या राजाविषयींचा जो मजकूर असतो, त्यांत राजाचे गुण वर्णन करतांना 'मनु, याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतींत कथन केलेल्या धर्मान्वयें जो आपल्या प्रजेचें पालन करितो' असे उल्लेख आढळतात.

यावरून त्या काळीं न्याय देणाऱ्या संस्था व न्यायदान पद्धति या स्मृतिग्रंथांत सांगितलेल्या धर्मास अनुसरून अस्तित्वांत असल्या पाहिजेत, असें अनुमान करणें अयुक्त होणार नाहीं. उत्तर हिंदुस्थानांत आर्य लोकांची वसाहत भरपूरपणें झाल्यावर उत्तरेकडून दक्षिणेकडे लोक वसाहत करण्यास येऊं लागले व महाराष्ट्र प्रदेशांत ठिकठिकाणीं शेतीचा व्यवसाय करणारीं शेंकडों खेडीं उदयास आलीं. याप्रमाणें वसाहत करण्यास येणाऱ्या लोकांत जीं कांहीं ब्राह्मण कुटुंबें होतीं तीं बहुतेक यजुर्वेदी शाखेचींच होतीं. याज्ञवल्क्य स्मृति हा ग्रंथ यजुर्वेदी ब्राह्मण व त्यांचे अन्य जातींचे अनुयायी प्रमाण मानीत. याज्ञवल्क्य स्मृतिग्रंथाच्या महतीविषयींचे उद्गार अलीकडे प्रसिद्ध झालेल्या इतिहाससाधनग्रंथांतून आढळून येतात. थोर ग्रंथ विज्ञानेश्वर (याज्ञवल्क्य स्मृतीवरील टीका) असा उल्लेख एका साधनांत आढळून येतो. कांहीं हिंदुधर्मशास्त्राचा प्रश्न उपस्थित झाला असतां याज्ञवल्क्य स्मृतींत या प्रश्नासंबंधीं कोणतीं वचनें आढळतात, तें पाहून त्या प्रश्नाचा निकाल करण्याचा प्रघात त्या काळीं होता, असें प्रसिद्ध झालेल्या साधनावरून दिसून येतें. ही गोष्ट लक्षांत घेतली असतां यादवकालीन प्रजेंत उत्पन्न होणाऱ्या वादांचा निर्णय

करणाऱ्या संस्थाचें वर्णन याज्ञवल्क्य स्मृतींत ज्या प्रकारचें आढळतें तशा प्रकारच्या संस्था त्या काळीं अस्तित्वात असाव्या, असें अनुमान करण्यास हरकत नाहीं.

यादव घराण्याचा शेवटचा राजा रामदेवराव याच्याविषयीं ज्ञानेश्वरांनीं खालीं दर्शविलेले उद्गार काढले आहेत.

> "येथ इंदुवंश विलासु
> जो सकळकळा निवासु।
> न्यायातें पोपि क्षितिगु॥" —श्रीरामचंद्र

यावरून रामदेवराव यादव त्याच्या प्रजेचें पालन न्यायानें करित असे एवढेंच दिसून येतें. रामदेवराव यादवाचा प्रधान हेमाद्रि पंडित ऊर्फ हेमाडपंत हा मोठा विद्वान् असून स्मृत्यादि ग्रंथाचा त्याचा अभ्यास फार जाडा होता. धर्मशास्त्रांतर्गत अनेक विषयावर त्यानें केलेले ग्रंथ प्रस्तुत उपलब्ध झाले आहेत ही गोष्ट विचारात घेता यादव राजवटींत याज्ञवल्क्य स्मृतींत वर्णिलेल्या व्यवहारनिर्णय करणाऱ्या संस्था अस्तित्वात होत्या, असेंच अनुमान काढावें लागेल.

मनु, याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतिग्रंथात वादाचा निर्णय करून न्याय देणाऱ्या संस्थाचें दिग्दर्शन त्या ग्रंथात केलेलें आढळतें. भारत इति. सं. मंडळाच्या इ. स. १९१४ (शके १८३६) सालच्या संमेलनवृत्तात महाराष्ट्रांतील 'व्यवहारनिर्णयपद्धति' या मथळ्याखालीं प्रसिद्ध झालेल्या लेखात याविषयींची साम माहिती दिली आहे. त्यांतील महत्त्वाचा खालील भाग आम्हीं येथें नमूद करतों.

> यदा स्वयं न कुर्यात्तु नृपतिः कार्यदर्शनम्॥
> तदा नियुञ्ज्याद्विद्वांसं ब्राह्मणं कार्यदर्शने॥९॥
> सोऽस्य कार्याणि संपश्येत्सभ्यैरेव त्रिभिर्वृत.॥
> सभामेव प्रविश्याग्र्यामासीनः स्थित एव वा॥१०॥
> यस्मिन्देशे निषीदन्ति विप्रा वेदविदस्त्रय॥
> राज्ञश्चाधिकृतो विद्वान् ब्रह्मणस्तां सभां विदु॥११॥

मनु, याज्ञवल्क्य, नारद आणि बृहस्पति स्मृतींत याबद्दलचे बरेच उल्लेख आले आहेत. मनुस्मृतीचे ८ वे अध्यायाचे ९, १० व ११ ये श्लोकात न्यायदान करणाऱ्या संस्थाचें वर्णन दिलेलें आहे.

"दुसऱ्या कार्यामध्यें निमग्न झाल्यामुळें किंवा रोगादिकानें व्याकुळ झाल्यामुळें राजानें स्वतः कार्यें न पाहिल्यास त्यानें तीं पाहण्याकरिता कार्यदर्शन-कुशल ब्राह्मणास नेमावें."

"तीन धार्मिक व कार्यदर्शनसमर्थ ब्राह्मणांसह त्या (राजानें नेमलेल्या)

ब्राह्मणानें त्या श्रेष्ठ सभेंत प्रवेश करून राजाप्रमाणें बसून किंवा उभ्यानें राज्याचीं कार्यें पहावीं."

"ज्या स्थानीं ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद यांस जाणणारे तीन ब्राह्मण व राजानें ज्यास अधिकार दिला आहे असा एक विद्वान् ब्राह्मण असतो त्यासच चतुर्मुखाचे सभेसारखी सभा होय असें समजतात."

याज्ञवल्क्य स्मृतींत व्यवहारनिर्णय करणाऱ्या संस्थेसंबंधीं व्यवहार अध्यायाचे ३० व्या श्लोकात नृपेणाधिकृतः पूगः श्रेण्योऽथ कुलानि च। पूर्वं पूर्वं गुरु ज्ञेयं व्यवहारविधौ नृणा ॥ असा उल्लेख आहे. नारदस्मृतींत खालील वचन आढळतें : कुल, श्रेणी आणि गण या तीन व्यवहारनिर्णय करणाऱ्या संस्था आहेत, व त्या क्रमशः परस्पराहून श्रेष्ठ आहेत. बृहस्पतिस्मृतींतही यासंबंधाचे उल्लेख आहेत. न्याय देणाऱ्या सभा चार प्रकारच्या असतात एक स्थायी, दुसरी फिरती, तिसरी राजमुद्रा दिलेल्या अधिकाऱ्यासमवेत व्यवहारनिर्णय करणारी व चौथी खुद्द ज्या सभेंत राजा उपस्थित असतो ती.

शेतकरी, सुतार, लोहार इत्यादि कारागीर, चित्रकार, कर्जाऊ पैसे देणारे, सभाईक माझवलावर व्यापार करणारे, नृत्य करणारे, विशिष्ट धर्मपंथाचीं चिन्हें धारण करणारे आणि चोर या सर्वांनी त्यांचेमध्यें उत्पन्न होणाऱ्या व्यवहाराचा निर्णय त्याचे धंद्याचे नियमांस अनुसरून करावा.

साधु व जादुटोणे करणारे लोक यांच्यात उत्पन्न होणाऱ्या व्यवहाराचा निर्णय फक्त तीन वेद जाणणाऱ्या लोकांकडून करावा. त्यांचे कोपास कारणीभूत होण्याचा संभव असल्याकारणानें राजानें स्वतः त्यांचे व्यवहाराचा निर्णय करूं नये.

नातेवाईक, धंदेवाईक, ग्रामस्थांचा संघ आणि राजानें नेमलेला अधिकारी यांनीं साहसासारख्या भयंकर गुन्ह्याखेरीज बाकीच्या व्यवहाराचा निर्णय करावा.

नातेवाईक, धंदेवाईक व ग्रामस्थांचा संघ आणि मुख्य न्यायाधीश हे एकाहून एक श्रेष्ठ आहेत. आणि ज्या व्यवहाराचा निर्णय यांपैकीं कोणी एकानें केला असेल तेव्हां त्यानें व्यवहार करणाऱ्या संस्थेहून श्रेष्ठ असलेल्या संस्थेकडे त्या व्यवहाराची फिरून चौकशी करण्याबद्दल मागणी करावी.

जेव्हां एखाद्या व्यवहाराचा निर्णय नातेवाईकांनीं योग्य प्रकारें केला नसेल तेव्हां त्याच व्यवहाराचा निर्णय धंदेवाईक संघानें करावा. धंदेवाईक संघानें त्या व्यवहाराचा निर्णय योग्य प्रकारें न केल्यास त्याच व्यवहाराचा निर्णय ग्रामस्थांच्या संघानें योग्य प्रकारें करावा आणि ग्रामस्थांचे संघानें योग्य प्रकारें निकाल न केल्यास राजानें नेमलेल्या न्यायाधिशानें त्या व्यवहाराचा निर्णय योग्य प्रकारें करावा.

गोत, धंदेवाईक आणि ग्रामस्थ यांच्या संघाहून न्यायाधिशाचा अधिकार श्रेष्ठ आहे. मुख्य न्यायाधीश या सर्वांहून श्रेष्ठ आणि राजा या सर्वांहून श्रेष्ठ आहे.

गोत आणि देशक इत्यादि व्यवहार-निर्णय करणाऱ्या संस्थांचें स्वरूप निरीक्षण

केलेल्या कागदपत्रांवरून जें दृष्टोत्पत्तीस आलें आहे त्या स्वरूपाशीं याज्ञवल्क्य–नारद व बृहस्पति स्मृतींत वर्णन केलेल्या संस्थांचें स्वरूप बरेंच मिळतें आहे. परंतु मनुस्मृतींत वर्णिलेल्या व्यवहारनिर्णय करणाऱ्या संस्थेशीं मात्र तें जुळतें नाहीं. राजानें स्थापित केलेल्या व्यवहार निर्णय करणाऱ्या संस्थेचें वर्णन त्या ग्रंथांत केलेलें दिसतें. मनुस्मृतिकालीन समाजांत साक्षात् अस्तित्वांत असलेल्या व्यवहारनिर्णय करणाऱ्या राजानें स्थापित केलेल्या संस्थेखेरीज इतर संस्थांचा उल्लेख या ग्रंथांत केलेला दिसत नाहीं. याज्ञवल्क्य, नारद आणि बृहस्पति स्मृतींत वर्णिलेल्या संस्थांशीं गोत, देशक यांचें बरेंच साम्य आहे, तथापि त्या संस्थांच्या घटनेंत व गोत आणि देशक यांच्या घटनेंत बरीच तफावत आहे. कुलांच्या रचनेसंबंधीं मिताक्षरेमध्यें विज्ञानेश्वरानें जो खुलासा केला आहे, त्यावरून ज्ञातिबांधव म्हणजे कुल असा अर्थ उत्पन्न होतो. "कुलानि ज्ञातिसम्बन्धि बंधूनां समूहाः" गोताचे रचनेबद्दल कागदपत्राचे आधारें जें मी वर्णन केलें आहे त्यावरून गोताची व कुलाची रचना एक स्वरूपाची आहे असें म्हणतां येणार नाहीं. गोत व कुल यांचा व्युत्पत्तिदृष्ट्या अर्थ एकच आहे. मानवी प्राण्याचें रानटी स्थितींतून सुधारलेल्या स्थितींत संक्रमण होत असतां संक्रमण अवस्थेचे प्रारंभीं प्रत्येक ग्राम हें एकाच पुरुषाचे वंशजांपासून बनलें असावें असा समाजशास्त्रवेत्त्यांचा तर्क आहे. या दृष्टीनें पाहतां प्रत्येक ग्राम कधीं तरी एके काळीं एकाच पुरुषापासून उत्पन्न झालेल्या वंशजांचें बनलें असलें पाहिजे; व फार पुरातन काळीं अशा प्रकारच्या ग्रामांत उत्पन्न होणारा व्यवहार त्या ग्रामांत राहणारे एकाच मूळ पुरुषाचे वंशज म्हणजे सर्व कुल करीत असलें पाहिजे. कालांतरानें समाजाचा जसजसा विकास होत चालला तसतसा ग्रामरचनेंत फरक होत गेला. समाजाची जसजशी प्रगति होत जाते, तसतशी निरनिराळीं कार्यें करणारे निरनिराळे वर्ग त्या समाजांत उत्पन्न होतात; व एका पुरुषाचे वंशजांचा विस्तार या दृष्टीनें ग्रामास प्राप्त झालेल्या स्वरूपाचें स्थित्यंतर होत जाऊन निरनिराळे धंदे करणाऱ्या निरनिराळ्या जाती ग्रामांत उत्पन्न होतात. अशा रीतीनें ग्रामाचें मूळ स्वरूप जें एका पुरुषापासून विस्तार पावलेलें कुल तें अंतर्धान पावून त्या ठिकाणीं नवीन प्रकारची ग्रामरचना उत्पन्न होते. समाजाच्या विकासामुळें ग्रामास प्राप्त झालेल्या नूतन स्वरूपाशीं विज्ञानेश्वरानें वर्णिलेल्या पूगाचें स्वरूप तंतोतंत जुळतें. "पूगाः समूहाः भिन्न जातीनां भिन्न वृत्तीनां एकस्थाननिवासिनां यथा ग्रामनगरादयः" अर्थ — भिन्न जातीच्या भिन्नवृत्ती (व्यवहार, निर्वाह, साधन) करणाऱ्या पण एकस्थानीं निवास करणाऱ्या लोकांचा समूह; उदाहरणार्थ, ग्राम, नगर इत्यादि—यावरून असें दिसतें कीं ग्रामसमाजाचें प्राचीन मूळ स्वरूप दर्शविणारी संज्ञा कुल अगर गोत ही तशीच कायम राहून गोताचे रचनेंत स्थित्यंतर झालें व गोताचे मूळ रचनेचे ठिकाणीं पूग या संज्ञेनें दर्शविली जाणारी ग्रामरचना अस्तित्वांत आली. श्रेणीचें वर्णन मिताक्षरेमध्यें जें दिलें आहे, त्यावरून पूग आणि श्रेणी यांतील फरक दिसून येईल. नानाजातीनामेकजातीनामप्येक जातीयकर्मोपजीविनां संघाताः । यथाहेडाबुकादीनांताम्बूलिककुविन्दचर्मकारादीनांच ॥ नानाजातिषु

किंवा एकाच जातीच्याहि एकाच कर्मावर निर्वाह करणाऱ्या लोकांचा संघ जसें तांबोळी, तेली, विणकर, चांभार इत्यादि, असें श्रेणींचें वर्णन केलें आहे.

श्रेणीचे रचनेंत धंद्याचें विशेष प्राधान्य दिसतें. एक धंदा करणारे एक जातीचे अगर भिन्न जातीचे लोकांचा जो संघ तो श्रेणी. श्रेणीचा हा विशेष लक्षात घेतला असता बृहस्पति स्मृतीतील २६ वे श्लोकात वर्णन केलेल्या संस्थाशीं श्रेणीचें बरेंच साम्य दिसून येतें.

देशकाची रचना पूगाचे धर्तीवरच होत असे. परंतु गोताचे रचनेंत जसे निव्वळ ग्रामस्थ असत, तसा देशकाचे रचनेचा प्रकार नसे. परगण्यातील देशमुख, देशपांडे, मोकदम, शेटे, महाजन मिळून देशकाची रचना होत असे.

सारांश, कुल ही संस्था नष्ट होऊन तिचें कार्य पूगाकडे आलें असें दिसून येतें.

नारद स्मृतींत वर्णिलेल्या व्यवहारनिर्णय करणाऱ्या संस्था याज्ञवल्क्य स्मृतींत वर्णिलेल्या संस्थासारख्याच आहेत. फक्त पूगाचे ठिकाणीं 'गण' या शब्दाची योजना केली आहे. पूगाचे आणि गणाचे रचनेंत कांहीं तफावत असावी असें वाटत नाहीं.

आतां बृहस्पति स्मृतींत वर्णिलेल्या संस्थाबद्दल विचार करूं. बृहस्पति स्मृतीचे २ रे व ३ रे श्लोकांत वर्णिलेल्या संस्थांचें साम्य गोत, देशक, आणि राजमुद्रा या तिहींशीं बरेंच जुळतें. २६ व २७ व्या श्लोकात वर्णन केलेल्या संस्था विशिष्ट प्रकारच्या सभा असून तशा प्रकारच्या सभा त्या काळीं अस्तित्वांत असल्या पाहिजेत, व प्रस्तुतहून अधिक ऐतिहासिक साधनें मिळाल्यास अशा सभांचे अस्तित्वाबद्दल निश्चित सिद्धान्त करितां येईल. या श्लोकांत वर्णन केलेल्या संस्थाशीं श्रेणीचें बरेंच साम्य आहे. त्या काळच्या प्रसिद्ध झालेल्या साधनांच्या आधारें अशा विशिष्ट प्रकारच्या सभा अस्तित्वात होत्या असें अनुमान काढण्यास जागा आहे मुरारभट ब्रह्मे व वासुदेव भट ब्रह्मे यांचेमध्यें पुस्तकाचा "कलहो" होता. तो व्यवहार चाकण स्थळचे ब्रह्म सभेकडे गेला, व ब्रह्मसभेचे विद्यमानें त्या व्यवहाराचा निकाल लागला. असल्या विशिष्ट प्रकारच्या सभेचीं दुसरीहि उदाहरणें आढळतात. निंब येथील सदानंद गोसाव्याचे मठाचे लेखांपैकीं शके १५९३ चा एक लेख आहे. मठातील कुणबिणीनें जीव दिला, व तिचे आत्महत्येसंबंधीं दोष मठाधिपतीवर आला. या भानगडीचा निकाल दसनाम मानभाव गोसाव्यांचे सभेनें करून, "मठपति यास सोडे देऊन मोकळे केले, आता कुणबिणीनें जीव दिल्हे त्याचें कांहीं लिगाड नाहीं. दसनामानी वेऊन अन्नपाणी घ्यावें, यास पुढें कोण्ही बोलेल त्यास दसनामाचे आण" असा ठराव केला. हा कागदावरील सह्या पाहता ही सभा निव्वळ दसनाम गोसाव्यांची असोन त्यात इतर जातीचा अगर धंद्याचा कोणीहि इसम नव्हता. बृहस्पति स्मृतींतील २८ व्या श्लोकांत वर्णन केलेल्या संस्था आणि कुल, श्रेणी, पूग अथवा गण ह्या याज्ञवल्क्य आणि नारद स्मृतींत वर्णन केलेल्या संस्था एकच होत. श्लोक २९, ३० व ३१ मध्यें या संस्थांची व्यवहारनिर्णय करण्याचे अधिकाराची मर्यादा

आणि त्यांचें परस्परांचें श्रेष्ठत्व हीं दर्शविलीं आहेत. या सर्व विवेचनावरून गोत व देशक या स्वरूपाच्या व्यवहारनिर्णय करणाऱ्या संस्था आर्यभूमींत याज्ञवल्क्य, नारद आणि बृहस्पति या स्मृतींचे कालाचे पूर्वीपासून अस्तित्वांत होत्या हें स्पष्ट होत आहे. याज्ञवल्क्य आणि नारद स्मृतींचा रचनाकाल सुमारें शके ५०० ते ६०० चे दरम्यान ठरला गेला आहे. बृहस्पति स्मृतीचा रचनाकाल नारदस्मृतीनंतरचा आहे, असा विद्वानांचा समज आहे. यावरून शके ५०० पासून व्यवहारनिर्णय करणाऱ्या गोत, देशक अगर कुल, श्रेणी व पूग या स्वरूपाच्या संस्था आपले देशांत अस्तित्वांत होत्या हें निर्विवाद सिद्ध होत आहे. मनुस्मृतीचा रचनाकाल निरती शकाचे पूर्वी २०० ते १०० वर्षांच्या दरम्यान आहे असा विद्वानांचा तर्क आहे. मनुस्मृतीचे कालीं या संस्था अस्तित्वांत होत्या किंवा नव्हत्या याबद्दल मनुस्मृतींत कोठें उल्लेख नाहीं, तथापि आपल समाजांतील संस्थांचे ठिकाणीं आढळणारा प्राचीनपणा आणि अचलता हे दोन विशेष लक्षात घेतले असता मनुस्मृतीचे कालींहि याच संस्था अगर या संस्थांशीं बरेंच सादृश्य असणाऱ्या व्यवहारनिर्णय करणाऱ्या दुसऱ्या संस्था अस्तित्वांत असल्या पाहिजेत असें अनुमान करणें धाडसाचें होणार नाहीं

वर दिलेल्या उताऱ्यात ज्या न्याय देणाऱ्या संस्थांचें वर्णन केलें आहे, तशा प्रकारच्या संस्था यादव कालीं अस्तित्वात असाव्या पाहिजेत, असेंच अनुमान करावें लागतें.

× × ×

# मुसलमान राजवटीचा काळ

यादव घराण्याची सत्ता इ स १३२५ त नष्ट झाल्यानंतर मुसलमान धर्मियांची सत्ता महाराष्ट्रावर सुरू झाली, ती छत्रपतींच्या स्वराज्यस्थापनेच्या काळापावेतों टिकली. या काळांतील या विषयासंबंधाचीं इतिहाससाधनें यादव कालापेक्षा अधिक प्रमाणांत उपलब्ध झालीं आहेत या साधनांच्या आधारें मुसलमानी राज्यवटींत व्यवहारनिर्णय करणाऱ्या संस्था कोणत्या प्रकारच्या अस्तित्वात होत्या, याविषयींची निश्चित कल्पना प्रस्तुत स्थळीं आम्हीं नमूद करतों.

मुसलमान धर्मियांची राजकीय सत्ता प्रस्थापित झाल्यावर मुसलमानी कायद्यान्वयें प्रजेंत उत्पन्न होणाऱ्या वादांचा निवाडा करण्याकरितां काजी या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या अधिकाऱ्यांची नेमणूक करण्याचा प्रघात स्थानीं सुरू केला याप्रमाणें मुसलमानी राज्यकर्त्यांनीं ठिकठिकाणीं नेमलेल्या काजी लोकांस दिलेल्या सनदा उपलब्ध झाल्या आहेत. त्यांतील मजकुरावरून काजींकडे न्यायनिवाडा करण्याचें काम असे,

असें दिसून येतें. काजीस दिलेल्या एका सनदेंतील खालीं दिलेल्या उताऱ्यावरून ही गोष्ट दिसून येते !

" पन्हा महमद हैदरकाजी मिरासदार याचे नांवें या परवान्याचे पाठीवरील येरा लिहिलेप्रमाणें मुकरर व कायम केले असे कीं, सदरहू कामाचे सर्व प्रकारें पाहिजे तसें करीत जाऊन, कज्जे व तंटे फैसल करणें, फटके मारणे व शिक्षा देणें व शुक्रवारचे दिवशीं निमाज व जमात करणें व लोकास निमाज वगैरेकरितां बोलावणें करणें व ज्या स्त्रीचा वारस नसेल तिचा मेहेतर लावणें व गेलेले माणसाची मर्जी जिनगी अस ल्यास त्याची धर्मप्रमाणें वाटणी करणें व गुप्त माल असल्यास त्याचे व आईबाप, मेलेल्या मुली व मुलाचे मालाचें संरक्षण करणें व ज्या माणसानीं मृत्यु होण्या-समयीं कांहीं सांगितलें असेल त्याप्रमाणें करणें व सर्व जातीचा बंदोबस्त ठेवणें येणें-प्रमाणें सर्व काम करीत जाणें यासतव भराराजिल्हे व स तेथील काजी व खतीब मजबूद समजून सदरहु चाकरीचे कामात त्याचा सर्वात श्रेष्ठ समजावा "

(सनदा आणि पत्रें)

मुसलमानी राजसत्ता हिंदुस्थानात प्रस्थापित झाल्यावर मुसलमानधर्मी लोक वायव्य सरहद्दीपलीकडील इराण अरबस्तान इत्यादि प्रांतातून हिंदुस्थानांत येण्यास सुरवात झाली. कालांतरानें यापैकीं कित्येक लोक येथें स्थायिक झाले या प्रकारच्या मुसलमानी प्रजेत वाद उपस्थित झाल्यास त्यांचा निवाडा करण्याचें काम काजीकडे-च असे. हिंदुस्थानातील एतद्देशीय हिंदु लोकांपैकीं कित्येकास बाटवून मुसलमानी धर्माची दीक्षा दिली. अशा प्रकारच्या लोकात कांहीं वाद उपस्थित झाल्यास त्यांचा निवाडा काजीनेंच करावयाचा, असा निर्बंध अस्तित्वात होता. परंतु मुसलमान धर्मीयांखेरीज महाराष्ट्रातील हिंदु व अन्य धर्मीय प्रजेत उत्पन्न होणाऱ्या वादाचा निवाडा काजीनें करावा असा निर्बंध मुसलमान राज्यकर्त्यांनीं केला नाहीं महाराष्ट्र देशात मागें स्मृतिग्रंथांत सांगितलेल्या ज्या संस्था अस्तित्वात होत्या, त्याच संस्था या वादाचा निवाडा करीत. निवाडा ज्या सभेपुढें केला जाई, त्यातील सभासदांपैकीं काजी हा एक सभासद म्हणून हजर रहात असे, असें त्या काळच्या प्रसिद्ध झालेल्या इतिहास-साधनांवरून दिसून येतें. मुसलमानांना संस्कृत भाषेचें ज्ञान नसे व हिंदुधर्मी प्रजेच्या चालीरीति, वहिवाटी, जातिरिवाज इत्यादींची माहिती त्यांना नसे, यामुळें मुसलमान राज्यकर्त्यांनीं सूज्ञपणें व्यवहारनिर्णय करणाऱ्या महाराष्ट्र देशात अस्तित्वात असणाऱ्या संस्थांना स्पर्श न करितां त्या जशाच्या तशा कायम ठेविल्या व पूर्वापार पद्धतीप्रमाणें या संस्थांकडून होणाऱ्या व्यवहारनिर्णयाचें काम अबाधितपणें त्यांचेकडे राहूं दिलें.

उपलब्ध झालेल्या तत्कालीन साधनांवरून मुसलमान राजवटींत अस्तित्वात असलेल्या व्यवहारनिर्णय करणाऱ्या सरपाचें वर्णन संशोधक त्रैमासिक वर्ष ४ थें अंक ३ मध्यें केलें आहे तें येथें उद्धृत करितों :

स्वराज्यांत प्रत्येक गांवांत ज्या कोणा गावकऱ्यामध्यें कांहीं व्यवहार उत्पन्न

होत असे त्याचा निवाडा त्या गावची गोतसभा करीत असे. हल्लीं पंचायत हा शब्द आपल्या सर्वत्रास परिचित आहे त्या वेळीं व्यवहारनिर्णय करणाऱ्या ह्या गांवांतील लोकांच्या सभेस गोतसभा हें नांव होतें गांवच्या गोतसभेस मायस्थळहि म्हणत असत. दोन गावकऱ्यांमध्यें व्यवहार उत्पन्न होऊन त्या व्यवहाराचा निवाडा त्या गांवच्या गोतसभेनें न करितां दुसऱ्या गावच्या गोत सभेनें करावा असें एखाद्यास वाटलें तर त्या व्यवहाराचा निर्णय ज्या गांवच्या गोतसभेनें करावा असें त्यास वाटत असेल त्या गावच्या गोतसभेकडे तो व्यवहार निर्णय करण्याकरितां पाठवीत असत. अशा प्रकारच्या दुसऱ्या गावच्या गोतसभेस दूरस्थळ असें म्हणत. गोतसभा जो निवाडा करीत असे त्या निवाड्यास गोतनिवाडा असें म्हणत व त्या व्यवहाराचा निर्णय ज्या कागदावर लिहीत त्यास गोतमहजर अगर यळपत्र असें म्हणत. निरनिराळ्या गावीं गावकरी लोकांत उत्पन्न होणाऱ्या व्यवहाराचा निर्णय करणाऱ्या या प्रकारच्या संस्था त्या काळीं प्रत्येक गावात होत्या. या गोतसभात व्यवहाराचा निर्णय करण्याकरितां गांवचा पाटील, कुळकर्णी, बलुतेदार, त्या गावातील जमिनीचे मालक व उदमी वाणी हे सर्व बसत असत व व्यवहाराचा निर्णय करीत असत.

प्रत्येक गावोगावीं असणाऱ्या या गोतसभांपेक्षा श्रेष्ठ दर्जाच्या व्यवहारनिर्णय करणाऱ्या संस्था म्हटल्या म्हणजे देशक सभा या होत. गोतसभेकडून कोणत्याहि व्यवहाराचा निर्णय न झाल्यास त्या व्यवहाराचा निर्णय देशक सभेकडून करून घेता येत असे. देशक सभा म्हणजे देशमुख, देशपांडे, इत्यादि परगण्यांतील वतनदार शिवाय परगण्यांतील निरनिराळ्या गावचे पाटील मिळून देशक सभा होत असे.

देशक सभेपेक्षा श्रेष्ठ अशी व्यवहारनिर्णय करणारी संस्था म्हटली म्हणजे राजमुद्रा धारण करणारा, राजानें व्यवहारनिर्णय करण्याकरता, नेमण्यात आलेला न्यायाधीश होय. देशक सभेकडून व्यवहाराचा निर्णय न झाल्यास त्या व्यवहाराचा निर्णय न्यायाधिशाकडून करून घेता येत असे.

राजानें नेमलेल्या न्यायाधिशापेक्षा श्रेष्ठ दर्जाची व्यवहारनिर्णय करणारी संस्था म्हटली म्हणजे राजा. राजा हा स्वत. कोणत्याहि व्यवहाराचा निर्णय करीत असे अगर अष्टप्रधान, परगण्यातील देशमुख, देशपांडे इत्यादि देशाधिकारी व परगण्यांतील गावचे पाटील यांची सभा भरवून व्यवहाराचा निकाल करीत असे.

वर वर्णन केलेल्या व्यवहारनिर्णय करणाऱ्या संस्थांशिवाय महाराष्ट्रांतील वाई, कऱ्हाड, नाशिक, पैठण, करवीर इत्यादि क्षेत्रांत स्मृतिशास्त्रांत निपुण असे अनेक ब्राह्मण असत. या क्षेत्रांतील या विद्वान् ब्राह्मणांच्या सभांकडे कोणत्याहि वादाचा निवाडा करण्याचें काम ज्या दोघांत वाद उत्पन्न झाला असेल, ते स्वत· सोपवीत असत. अथवा अशा दोघा वादींनीं त्यांच्या वादाचा निवाडा करण्यांत यावा, असें सरकारी अधिकाऱ्याकडे कळविलें तर तो अधिकारी त्या वादाचा निवाडा करण्याचें काम

वरील प्रकारच्या ब्राह्मण सभांकडे सोंपवीत असे. याशिवाय त्या काळीं न्यायनिवाडा करण्याचे कामीं कुशल म्हणून प्रख्यात असलेले प्रतिष्ठित लोक असत त्यांच्याकडेहि ज्याबद्दल वाद उपस्थित झाला असेल ते लोक स्वतः त्या वादाचा निर्णय करण्याचें काम सोंपवीत. सरकारी अधिकारीहि वादाचा निवाडा करण्याचें काम अशा लोकांकडेहि सोंपवीत असत. छत्रपति शिवाजी महाराजांच्या लोमातील नेताजी पालकर याची वादाचे निवाडे करण्यात कुशल म्हणून ख्याति असल्याचा तत्कालीन इतिहाससाधनांत उल्लेख आढळतो. वादाचा निवाडा करण्याचे कामीं कांहीं शंका आल्यावरून विज्ञानेश्वर ग्रंथ शंकानिवृत्तीस्तव मागविल्याचें याच साधनात नमूद केलेलें आढळतें.

मोठमोठ्या व्यापारी पेठांत व्यापाऱ्याव्यापाऱ्यात वाद उपस्थित झाल्यास त्याचा निवाडा शेटे–महाजन सभा करीत असत. व्यापारी पेठेंत शेटेपणा व महाजनकी अशा दोन वृत्ती असत व या वृत्तींवर त्या पेठांतील प्रतिष्ठित व्यापारी अगर अन्य गृहस्थाची नेमणूक केली जात असे. शेटे–महाजन सभेचे पेठेंतील प्रतिष्ठित व्यापारी सभासद असत. अशा या सभेकडून व्यापाऱ्यांच्या वादाचे निकाल केले गेल्याचीं उदाहरणें इतिहाससाधनांत उपलब्ध झालीं आहेत. महाराष्ट्रांतील संकेश्वर व करवीर पीठाचे शंकराचार्य यांच्याकडेहि सरकारी अधिकाऱ्यांनीं कांहीं महत्त्वाच्या वादांचा निवाडा करण्याचें काम सोंपविल्याचें इतिहाससाधनात आढळून येतें. हिंदुहिंदूंतील वादाचा निवाडा एखाद्या काजीनें केल्याचें उदाहरण अद्यापि उपलब्ध झालें नाहीं. मुसलमानी राजवटींत प्रत्येक परगण्याचे दोन मोठे अधिकारी असत. एक दिवाण व दुसरा फौजदार. दिवाणाकडे कर–वसुली, प्रजेंतील वादाचा निवाडा करणें व अन्य मुलकी कामें असत. फौजदाराकडे परगण्यात होणाऱ्या गुन्ह्याची चौकशी करणें व गुन्हेगारास शासन करून शांतता राखणें हीं कामें असत. शके १५२६ (इ. स. १६०४) तील एका वादाचा अस्सल निवाडा उपलब्ध झाला आहे. या वादांत कन्हाडनजीक मसूर गांवच्या जगदाळे या नावाचा एक हिंदु वादी होता व त्याचा प्रतिपक्षी बापाजी हा मुसलमान होता. या उभयतांतील वादाचा निवाडा करावा म्हणून जगदाळे यानें दिवाणाकडे फिर्याद केली. दिवाणानें या वादाचा निवाडा न करिता तें काम पैठणच्या एका विद्वान् ब्राह्मणाकडे सोंपविलें व त्यानें या वादाचा निवाडा जगदाळ्यातर्फे केला. या वादात प्रतिपक्षी मुसलमान असूनहि निवाड्याचें काम काजीकडे न सोंपवितां पैठणक्षेत्रांतील ब्राह्मणाकडे सोंपविण्यात आलें. येथपावेतों केलेल्या विवेचनावरून मुसलमानी राजवटींत, महाराष्ट्र देशात पूर्वकालापासून वादनिर्णयार्थ ज्या संस्था परंपरेनें अस्तित्वात होत्या, त्या तशाच कायम राहिल्या होत्या. त्यांच्या अधिकारांत मुसलमान राज्यकर्त्यांनीं कोणत्याहि प्रकारची ढवळाढवळ केली नाहीं.

### मराठी राजवटीचा काळ

छत्रपति शिवाजी महाराजांनीं स्वराज्याची स्थापना करण्यापूर्वी पुणें, सुपें इत्यादि

शहाजीच्या जहागिरीतील परगण्याची व्यवस्था व कारभार दादोजी कोंडदेव हे पहात असत. या प्रदेशांतील मावळच्या प्रजेंत उत्पन्न होणाऱ्या वादांचे निवाडे, दादोजी कोंडदेव व गोतसभा यांनी केलेले उपलब्ध झाले आहेत. या निवाड्यांवरून दादोजी कोंडदेवाचा स्मृतिग्रंथांचा व्यासंग कोणत्या प्रकारचा असावा असें त्यांनी निवाडा-पत्रांत कांहीं मुद्यांच्या समर्थनार्थ दिलेल्या स्मृतिवचनांवरून दिसून येतें. मुसलमानी रियासतींतील न्यायदान करणाऱ्या संस्थासंबंधानें पूर्वी जें तपशिलवार विवेचन केलें आहे, त्याच्या शेवटीं महाराष्ट्र देशांतील, पूर्वापार चालत आलेल्या न्यायदानसंस्था कायम टेविल्या, असें जें मत प्रदर्शित केलें आहे, त्यावरून शिवछत्रपतींच्या काळीं तशाच संस्था सर्व देशभर अस्तित्वांत होत्या, हें उघड होत आहे. ही गोष्ट लक्षांत घेतां या संस्थासंबंधींच्या वर्णनाची पुनरुक्ति करण्याचें कारण नाहीं. मराठी रियासतीं-तील या विषयासंबंधाचीं शेंकडों इतिहाससाधनें उपलब्ध झालीं आहेत. त्यांपैकीं कित्येक छापून प्रसिद्ध झालीं आहेत. महाराष्ट्रांतील इतिहास-संशोधन करणाऱ्या ज्या कांहीं चार दोन संस्था आहेत, त्यांच्या संग्रहीं या प्रकारचीं पुष्कळ साधनें अप्रकाशित आहेत.

प्रसिद्ध झालेल्या साधनांच्या आधारें या संस्थासंबंधाची जी माहिती मागें नमूद केली आहे, ती विश्वसनीय मानण्यास कोणत्याहि प्रकारचा प्रत्यवाय नाहीं, तथापि मराठी राज्याचा लय होऊन इंग्रजांची राजसत्ता महाराष्ट्रांत प्रस्थापित झाली, त्या काळीं न्यायदान देणाऱ्या संस्था कोणत्या प्रकारच्या होत्या व न्यायदानपद्धति कशा स्वरूपाची होती यांविषयींची चर्चा व विवेचन यापुढें करणें प्राप्त आहे.

## इंग्रज राजवटीपूर्वील न्यायाधीश

प्रसिद्ध झालेल्या इतिहाससाधनांत यादव व मुसलमान राजवटींतील नामांकित न्यायाधिशांचीं नांवें अगर माहिती अद्याप उपलब्ध झालेली नाहीं, या राजवटींत व्यवहारनिर्णय करण्याकरितां न्यायाधीश नेमण्याची पद्धत असली पाहिजे, यांत संशय नाहीं. परंतु प्रस्तुत या राजवटींतील एकाहि न्यायाधिशाचें नांव अगर त्यानें केलेला एखादा वादाचा निवाडाहि उपलब्ध झालेला नाहीं. मराठा राजवटींतील न्यायाधिशांचीं कांहीं नांवें उपलब्ध झालेलीं आहेत. छत्रपति शिवाजी महाराजांनीं अष्टप्रधान संस्था स्थापन केल्याचें प्रसिद्धच आहे. या संस्थेपैकीं न्यायाधीश म्हणून एक प्रधान होता. शुक्रनीतींत अष्टप्रधानांत अंतर्भूत होणाऱ्या निरनिराळ्या प्रधानांचें खालील श्लोकांत दिग्दर्शन केलेलें आहे.

सुमन्त्र पण्डितो मन्त्री प्रधानः सचिवस्तथा ॥
अमात्यः प्राड्विवाकश्च तथा प्रतिनिधिः स्मृतः ॥ ७२ ॥
एता भृतिसमास्त्वष्टौ राज्ञः प्रकृतयः सदा ॥
इङ्गिताकारतत्त्वज्ञो दूतस्तदनुगः स्मृतः ॥ ७३ ॥

वरील श्लोकांतील प्राड्विवाक हाच शिवाजींच्या अष्टप्रधान संस्थेंतील न्यायाधीश होय. चिटणीसकृत राजनीतींत या प्रधानानें करावयाच्या कार्याचें दिग्दर्शन खालीलप्रमाणें केलेलें आहे —

" आतां न्यायाधीश प्रधान याचें कृत्य सांगतों. संपूर्ण न्याय, राष्ट्र, देश व नगरातील वृत्ति आदि करून मनास आणावें. न्याय मनास आणणें याचीं लक्षणें पूर्वी सभाप्रकरणीं सांगितलीं त्याप्रमाणें अन्याय न करितां राजास परम कल्याणावह असें पाहून प्राड्विवाक म्हणून ब्राह्मण व सभासद यांचीं लक्षणें पूर्वी सांगितलीं असे असतील त्यास घेऊन न्याय अन्याय मनास आणून राजास समजवावें त्याची निवाडापत्रें करावीं. निवाड्याचीं राजपत्रें होतील. त्याजवरि संमताचिन्ह त्याचें असावें याप्रमाणें न्यायाधीशप्रधानकृत्य सांगितलें."

छत्रपति शिवाजी महाराजांनीं पूर्वकालीन भारतीय राजनीति ग्रंथांतील वर्णन केलेल्या अष्टप्रधान संस्थेसारखी संस्था स्वराज्याची स्थापना केल्यानंतर थोड्याच वर्षांत स्थापन केली. या संस्थेची ज्या परिस्थितींत त्यांनीं स्थापना केली, ती लक्षात घेऊन एका पंडितराव प्रधानाखेरीज बाकीच्या सर्व प्रधानांनीं पुरातन नीतिग्रंथांत सांगितलेलीं कृत्यें करावी असें नमूद असून याशिवाय त्यांत युद्धकर्म करावें ही एक विशेष गोष्ट आढळून येते.

न्यायाधीश प्रधानासंबंधीं वरीलप्रमाणें दिग्दर्शन केल्यावर छत्रपति शिवाजी महाराजांनी स्वराज्य स्थापनेपासून मराठाराज्य अस्तंगत होईपर्यंत न्यायाधीशप्रधानाचे कामावर नेमण्यात आलेले लोक व त्यांच्याविषयींची माहिती प्रसिद्ध झालेल्या इतिहाससाधनांत जी आढळून येते, तिचें प्रस्तुत स्थळीं थोडक्यात दिग्दर्शन करितों. शिवाजींचा पहिला न्यायाधीश निराजी रावजी हा होता. त्यानंतर न्यायाधीश प्रधानपद बाळाजी सोनदेव यास दिलें. संभाजी महाराजांच्या कारकीर्दींत न्यायाधीश प्रधानपदावर कोण होते, याची माहिती उपलब्ध नाहीं. राजाराम छत्रपतींच्या कारकीर्दींत न्यायाधीश पदावर कोनेर जगन्नाथ नावाचा न्यायाधीश होता. शाहू छत्रपतींच्या कारकीर्दींत सखो विठ्ठल (१७०८-९ ते १७१२-१३), होनाजी पंडित (१७१२-१३ ते १७२५-२६), यादोराव अनंत (१७२६-२७ ते १७५०-५१) हे होते. रामराजा यांच्या कारकीर्दींत खंडेराव काशी (१७५०-५१ ते १७७३-७४) व आप्पाजी खंडेराव (१७७३-७४ ते......) याप्रमाणें न्यायाधीशपदावर असल्याचें आढळते. आप्पाजी खंडेरावानंतर न्यायाधीश प्रधानाच्या जागेवर नेमण्यांत आलेल्या इसमांचीं नांवें उपलब्ध नाहींत.

न्यायाधीश पद धारण करणाऱ्यास देण्यात येणाऱ्या वेतनाची, उपलब्ध झालेल्या इतिहाससाधनांवरून थोडीफार कल्पना करता येते. छत्रपति शिवाजी महाराजांच्या कारकीर्दींतील न्यायाधीश प्रधानांना किती वेतन देण्यात येत असे, याचा उल्लेख आढळत नाहीं. परंतु अष्टप्रधानांतील मुख्य प्रधान व अन्य प्रधान यांना

सालिना वेतन १०००० ते १५००० होन (३५००० ते ५२५०० रु.) व शिवाय सरंजाम असे दिले असल्याचे उल्लेख आढळतात. यावरून न्यायाधीश प्रधानासहि याच तोलाचे वेतन मिळत असले पाहिजे, असे अनुमान करणे चुकीचे होणार नाही. प्रस्तुत इंग्रजराजवटींत मुख्य न्यायाधिशास सालिना ६०,००० रु. व अन्य न्यायाधिशांना ४८००० रु. पगार देण्यात येतो. ही गोष्ट लक्षांत घेतली असतां छत्रपतींच्या न्यायाधीश प्रधानास त्या काळाच्या मानानें भरपूर वेतन दिलें जात होतें, असें दिसून येतें.

शाहू छत्रपतीचे कारकीर्दीतील न्यायाधीश प्रधानांना मिळणाऱ्या रोख वेतनाबद्दलचा उल्लेख आढळत नाहीं; परंतु बहुमोल सरंजाम देण्यांत आल्याचे उल्लेख आढळतात. रामराजाचे कारकीर्दीत न्यायाधीश प्रधान अपाजी खंडेराव यांना सालिना १००० होन (३५०० रु.) व सरंजाम कायम असें वेतन मिळत असल्याचा उल्लेख आहे.

बाळाजी बाजीराव यांची कारकीर्द सन १७६१ पर्यंत होती व त्यांच्या कारकीर्दीत शाहू छत्रपतींनी नेमलेले न्यायाधीश प्रधान काम करीत असल्यानें बाजीरावानें पुणें शहरीं स्वतंत्र न्यायाधीश नेमल्याचें दिसत नाहीं. माधवरावांची कारकीर्द सन १७६१ ते १७७२ पावेतों झाली. या कारकीर्दीत खंडेराव काशी हा न्यायाधीश सातारा येथें प्रधानाच्या जागेवर होता. असें असूनहि थोरले माधवराव पेशव्यांनी पुणें शहरीं रामशास्त्री प्रभुणे यांची न्यायाधीश म्हणून नेमणूक केल्याचें दिसतें. रामशास्त्री प्रभुणे यांना पेशव्यांकडून दरसाल ठराविक रकम वेतन म्हणून देण्यांत येत असल्याचे उल्लेख आढळत नाहींत.

रामशास्त्री यांनी न्यायाधिशाचें काम अत्यंत निःस्पृहतेनें व निःपक्षपातीपणानें केल्याचें सर्वश्रुत आहे. मराठा राज्य अस्तंगत झाल्यावरहि कित्येक वर्षे रामशास्त्र्यांच्या निःस्पृहतेविषयीं सर्वत्र प्रशंसा केली जात असे व इंग्रजी राज्याची स्थापना झाल्यानंतर मराठी राज्यांतील न्यायदान–पद्धतीविषयीं चौकशी करून तत्संबंधीं एका इंग्रज अधिकाऱ्यानें आपला अभिप्राय 'Notes on Maratha institution' या हस्तलिखितांत नमूद केला आहे. त्यांतील रामशास्त्र्यांसंबंधाचा महत्त्वाचा उतारा आम्ही येथें उद्धृत करितों.

"...Even after the death of his patron (Madhaorao I) Ramshastri continued to up hold the duties of his situation with becoming dignity and high honour, His memory is revered throughout the country, and many of the good acts of Nana Fadnawis are believed to be originated in the weight and respectability of Ramshastri's opinions, such a public character under corrupt Government is beyond all praise.."

रामशास्त्र्यानंतर दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत बाळशास्त्री या नावाचा एक न्यायाधीश नेमण्यांत आलेला असून त्याच्या हाताखालीं दहाबारा कारकून असत. पंतप्रतिनिधीच्या जहागिरींतील आबाजी पाणेकर यानें " Notes on Mahratta Institution " लिहिणाऱ्या इंग्रजास खालील माहिती दिली आहे.

"It was not necessary that the Superintendent or umpire should be a Government servant but the plan was to give it to some friend of Balshastri when the parties were plundered in due form, each party said what he could give and how much he could pay down In a just cause it was lawful to take fees and ofcourse among such people he who paid most had the best couse"

(Notes on Mahratta Institution हा ग्रंथ छापून प्रसिद्ध झालेला नाहीं व ग्रंथकर्त्याचें नावहि उपलब्ध नाहीं. इंडिया ऑफिसमध्यें कित्येक हस्तलिखितें आहेत. त्यांतील या हस्तलिखिताचें वर्णन खालीं दिल्याप्रमाणें आहे.

PP 323 to 439 Home miscellaneous Volume No 531 section (3) General Records (No 16 in miss cummings lists)

या हस्तलिखिताची टाईप केलेली प्रत राजवाड्यांच्या संग्रहीं होती. त्यांतून वरील मजकूर उद्धृत केला आहे )

दुसऱ्या बाजीरावाची रवानगी ब्रह्मावर्तास केल्यानंतर सातारच्या गादीवर इंग्रजांनीं प्रतापसिंहाची स्थापना केली. प्रतापसिंहाच्या कारकीर्दींत सातारचे न्यायाधीश म्हणून नीळकंठ यत्ते या नांवाचे एक शास्त्री होते, त्यांच्या कारकीर्दीविषयीं वरील इंग्रज लेखकानें कांहीं अभिप्राय व्यक्त केलेला नाहीं.

मराठा राजवटींत न्यायाधीशपद धारण करणाराची माहिती येथपावेतों दिल्यावर या न्यायाधिशांनीं त्यांच्याकडे येणाऱ्या शेंकडों व्यवहाराचे जे निर्णय केले, त्यांतील महत्त्वाचे निर्णय अद्याप उपलब्ध होऊन प्रसिद्ध झालेले नाहींत. छत्रपति शिवाजी महाराजांनीं स्वराज्याची स्थापना करण्याचा उद्योग सुरू करण्यापूर्वी शहाजी राजे यांच्या पुणें-सुपें परगण्यांतील जहागिरीचा कारभार त्यांचे कारभारी दादोजी कोंडदेव हे पहात असत. जहागिरीचा कारभार पहात असतां कारभारी या नात्यानें त्यांना जीं कामें करावीं लागत, त्यांत एक महत्त्वाचें काम म्हणजे त्या प्रदेशांतील प्रजेंत उत्पन्न होणाऱ्या व्यवहाराचा (वादांचा) निवाडा करणें हें एक काम होतें. व्यवहारनिर्णयाचें काम दादोजी कोंडदेव एकटेच न करितां पंचायत मार्फत करीत असत. दादोजी कोंडदेवांनीं केलेल्या कांहीं महत्त्वाच्या व्यवहाराचीं निर्णयपत्रें छापून प्रसिद्ध झालीं आहेत, त्यावरून त्यांचे अशीं असलेले व्यवहारनिर्णय कोष्टक उद्धृत

प्रकारें दिसून येतें. शिवाय वर नमूद केलेल्या अन्य न्यायाधिशांचे एकहि निवाडा-पत्र अद्याप उपलब्ध झालें नाहीं. पुणें येथील मुंबई सरकारच्या ताब्यांत असलेल्या पेशवे दप्तरांतील ऐतिहासिक महत्त्वाच्या पत्रांचे ४५ ग्रंथ छापून प्रसिद्ध झाले आहेत. हें काम चालू असतां छापून प्रसिद्ध करावयाच्या कागदपत्रांची निवड करण्याकरितां कांहीं गृहस्थांची एक समिती नेमिली होती. या समितीचे अध्यक्ष रा. ब. गो. स. सरदेसाई होते. रामशास्त्री व अन्य न्यायाधीश यांनीं दिलेले निवाडे पेशवे दप्तराच्या रुमालांत कोठें आढळल्यास ते छापून प्रसिद्ध करावे, असें आम्ही रा. ब. सरदेसाई यांना कळविलें होतें, परंतु त्यांनीं आम्हास असें कळविलें कीं, रामशास्त्री अगर अन्य न्यायाधीश यांनीं दिलेले निवाडे पेशवे दप्तरांत आढळत नाहींत. श्री. सरदेसाई यांचें हें उत्तर वाचून आम्हांस आश्चर्य वाटलें. पेशव्यांच्या या दप्तरांत राज्यकारभारांतर्गत नानाविध विषयांसंबंधानें असल कागद-पत्र उपलब्ध होत असतां यदीन्यायविषयक कागदपत्रांचा आढळ कां होऊं नये ही एक आश्चर्यकारक गोष्ट म्हटली पाहिजे. पुढेंमागें कधीं काळीं हे कागदपत्र उपलब्ध झाल्यास मराठा राजवटींतील कायदा व न्यायदानपद्धति या विषयींची उद्बोधक माहिती उपलब्ध होईल व प्रस्तुत काळीं कांहीं बाबतींत मुंबई हायकोर्टाचे जे निवाडे मान्य समजले जातात, ते कसे चुकीचे आहेत, हें दिसून येईल. प्रस्तुत काळीं मुलीचा मुलगा अगर बहिणीचा मुलगा दत्तक घेणें कायदेशीर मानलें जात नाहीं. मराठा राजवटींतहि अशा प्रकारचा दत्तक कायदेशीर समजला जात नसे, परंतु विशिष्ट परिस्थितींत मुलीच्या अथवा बहिणीच्या मुलाचें दत्तविधान सरकारकडून कायदेशीर ठरवून घेण्याची सवलत त्या काळीं अस्तित्वात होती, असें प्रसिद्ध झालेल्या इतिहास साधनावरून दिसून येतें. वर नमूद केलेले निवाडे उपलब्ध झाल्यास हाय-कोर्टापुढें निवाड्याकरितां येणाऱ्या कित्येक हिंदु कायद्यांतील वादग्रस्त मुद्यांसंबंधीं प्रस्तुतच्या न्यायाधिशांचीं जीं मतें बनलीं आहेत, त्यांत बदल होण्याचा संभव आहे.

---

प्रकरण ३ रें

## इंग्रज राजवटीपूर्वील धर्म व व्यवहारनिर्णय
आणि
## इंग्रज राजवटींतील कायदा व निवाडापद्धति

स्वदेश व स्वसमाज यांच्या इतिहासाच्या अज्ञानामुळें व इंग्रज राज्यकर्त्यांनीं स्थापन केलेल्या शिक्षण संस्थांतून देण्यांत येणाऱ्या पाश्चात्य शिक्षणानें मनावर

झालेल्या संस्कारामुळें इंग्रजराजवटीच्या प्रारंभींच्या काळात महाराष्ट्रातील लोकांच्या दोन तीन पिढ्यांना इंग्रजांनी स्थापन केलेली कोर्टें व त्या कोर्टांतून केले जाणारे वादांचे निवाडे याविषयीं मोठें कौतुक वाटत असे. या काळातल्या कित्येक लोकांची अशी समजूत होती की, इंग्रजांनीं स्थापन केलेलीं कोर्टें व इंग्रजांनीं केलेले कायदे या पूर्वी कधीं काळीं आपल्या देशात नसलेल्या अपूर्व गोष्टी आहेत; परंतु अलीकडे या विषयाविषयींचीं जीं अनेक इतिहाससाधनें उपलब्ध झालीं आहेत, त्यावरून त्या काळच्या लोकांचा वरील प्रकारचा समज निराधार व असत्य असल्याचें सिद्ध झालें आहे. मागील भागात इंग्रज राजवटीपूर्वी ६०० वर्षांच्या काळात आपल्या देशात कोणत्या प्रकारच्या न्यायदानसंस्था अस्तित्वात होत्या, याविषयींची माहिती दिली. प्रस्तुत प्रकरणांत इंग्रजराज्यकर्त्यांनीं जे अनेक कायदे मंजूर करून त्यांचा अंमल सुरू केला व प्रजेचें नियंत्रण ज्यांच्या योगानें केलें जातें, त्यासारख्या इंग्रजराजवटीपूर्वी कोणत्या योजना अमलात होत्या, याचें स्थूल दिग्दर्शन केलें आहे.

प्रस्तुत कायदा व कायदे हे दोन शब्द प्रचारांत आहेत व प्रजेंत उत्पन्न होणाऱ्या वादांचा निर्णय ज्या पद्धतीनें होतो, तिला न्यायदानपद्धति असें म्हणतात. ब्रिटिश पूर्वकालीं कायदा या अर्थी 'धर्म' हा शब्द अस्तित्वात होता व प्रजेंतील उत्पन्न होणाऱ्या वादांच्या निर्णयपद्धतीस व्यवहारनिर्णयपद्धति अशी संज्ञा प्रचलित होती.

"धर्म" या संज्ञेचा याज्ञवल्क्य स्मृतीवरील मिताक्षरा टीकेंत जो अर्थ दिला आहे, तो आम्ही येथें नमूद करितों. योगीश्वर याज्ञवल्क्य यांना ब्राह्मणादि वर्ण, ब्रह्मचर्यादि आश्रम, वर्णसंकर होऊन उत्पन्न झालेल्या जाति इत्यादिकांचे धर्म कथन करण्याबद्दल प्रार्थना करण्यात आल्यावरून याज्ञवल्क्यांनीं धर्म शब्दाची खालील प्रमाणें फोड केली आहे:—

"धर्म शब्दावरून सहादि प्रकारचे धर्म घ्यावे. वर्णधर्म, आश्रमधर्म, वर्णाश्रमधर्म, गुणधर्म, निमित्तधर्म व साधारणधर्म. हे सहा प्रकारचे धर्म होत.

१ ब्राह्मणानें कधींहि मद्य पिऊं नये, हा वर्णधर्म.

२ ब्रह्मचाऱ्यानें सायंप्रातर होम करावा, हा आश्रमधर्म

३ ब्राह्मण ब्रह्मचाऱ्याचा दंड पळसाचा असावा, हा वर्णाश्रमधर्म

४ शास्त्रीय अभिषेकादि गुणानें युक्त असलेल्या राजानें प्रजेचें पालन करावें, हा गुणधर्म.

५ शास्त्रानें जें विधान केलें असेल तें न करणें व शास्त्रानें ज्याचा निषेध केला असेल तें करणें या दोन कोटींकरितां करावें लागणारें जें प्रायश्चित्त, तो निमित्तधर्म.

६ अहिंसा, सत्य भाषण इत्यादि ब्राह्मणापासून चांडाळापर्यंत लागू असणारा जो धर्म तो साधारणधर्म होय.

वेद, स्मृत्यादि ग्रंथांत ठिकठिकाणीं आलेल्या 'धर्म' या शब्दाचा सांगोपांग विचार करून श्री. पांडुरंग वामन काणे यांनीं "मनुष्यमात्राचें आर्य म्हणून

विवक्षित वर्णांतील व आश्रमांतील एक व्यक्ति म्हणून जें जें कर्तव्य य से ते एक तो धर्म, त्याचप्रमाणें आपलें कल्याण व्हावें असें इच्छिणाऱ्या चार वर्णांतील व आश्रमांतील लोकांनीं आचारिलेला जो धर्म, तो प्रवृत्ति व निवृत्ति अशा दोन प्रकारचा आहे " अशा प्रकारची व्याख्या केली आहे. याज्ञवल्क्य स्मृतीवरील मिताक्षरा टीकेंत धर्म या संज्ञेचें स्पष्टीकरण करतांना कोणत्या ग्रंथ त सांगितलेले या कोणत्या व्यक्तींनीं सांगितलेले धर्म प्रमाण मानावयाचे हा प्रश्न उपस्थित केला असून त्याचें उत्तर त्यांनीं पुढें दर्शविल्याप्रमाणें दिलें आहे. वेद, धर्मशास्त्रें, शिष्टांचा आचार, व्याख्याविषयीं विकल्प असेल अशा धर्मानुष्ठानांत आपणास जें प्रिय वाटेल तें करणें, उत्तम संकल्पापासून उत्पन्न झालेली व शास्त्राच्या विरुद्ध नसलेली इच्छा या पांच बाबींस अनुसरून धर्म निश्चित करावा, असें म्हटलें आहे

एखादी विवक्षित बाब धर्मास अनुसरून अगर धर्मविरुद्ध आहे, असा प्रश्न उपस्थित झाल्यास त्याचा निर्णय कशा रीतीनें करावयाचा यासंबंधीं मिताक्षरा टीकेंत पुढीलप्रमाणें दिग्दर्शन केलें आहे. वेद व धर्मशास्त्र जाणणाऱ्या चार ब्राह्मणांस परिषद म्हणतात, किंवा ऋग्वेदादि तीन वेदांस जाणणारे जे त्रैविद्य ब्राह्मण त्यांच्या समूहास परिषद म्हणतात.

अशा प्रकारची परिषद जो धर्म सांगते तोच धर्म होय, अथवा एकहि सर्वोत्तम वेदशास्त्रज्ञ ब्राह्मण जो निर्णय करील तो धर्म होय.

येथपावेतों आम्हीं जें विवेचन केलें आहे, त्यावरून धर्म या शब्दाचा अर्थ काय, या संज्ञेंत कोणकोणत्या बाबींचा समावेश होतो, कोणत्या बाबी धर्मास आधारभूत मानावयाच्या व विशिष्ट बाब धर्मसम्मत आहे कीं धर्मविरुद्ध आहे इत्यादि मुद्यांचा खुलासा झालेला आहे. 'धर्मशास्त्र' या मथळ्याखालीं श्री. काणे यांच्या प्रसिद्ध झालेल्या एका चर्चात्मक लेखांतील धर्म या शब्दाची व्याख्या आणि या संज्ञेंत समाविष्ट होणाऱ्या बाबी या विषयींचा महत्त्वाचा भाग, धर्म या शब्दाच्या व्यापतीची कल्पना वाचकांस बरोबर यावी, एतदर्थ आम्ही खालीं देतों —

" प्रथम धर्म हा शब्द घेऊ. या शब्दाच्या रूपांत व विशेषतः अर्थांत अनेक फरक झाले. त्याचे हल्लीचे जे कांहीं अर्थ आहेत म्हणजे पुण्य, यम, भाव, न्याय वगैरे त्याच्याकडे लक्ष देण्याचें या लेखांत प्रयोजन नाहीं फार प्राचीन वाङ्मयांत धर्म हा शब्द धर्मन् या स्वरूपांत दिसतो व तो बहुधा नपुंसकलिंगी आढळतो. हा शब्द ऋग्वेदांत पन्नासाहून जास्त वेळा आला आहे तीन ठिकाणीं तो पुल्लिंगी आहे. (ऋग्वेद १-१८७-१, १०-२१-३, १०-९२-२) या तीन ठिकाणीं 'धर्मन्' हा शब्द विशेषण आहे व त्याचा अर्थ 'धारण करणारा' ( धारक ) हा आहे. उदाहरणार्थ पितुं नु स्तोष महो धर्माणं तविषीम् ( ऋ. १-१८७-१ मोठया अशा सर्व जगाचें धारण करणारें बलयुक्त असें जें अन्न त्याचें मी स्तवन करितों ) या तीन उदाहरणांखेरीज बाकी बहुतेक सर्व ठिकाणीं 'धर्मन्' शब्द नपुंसकलिंगी आहे. त्याच्या अर्थाबद्दल थोडा संशय आहे "त्रीणि पदानि विचक्रमे विष्णुर्गोपा अदाभ्य ||

अतो धर्माणि धारयन्" [ऋग्वेद १–२२–१८ "पालनकर्ता व ज्याला कोणी इजा करूं शकत नाहीं असा जो विष्णु त्यानें धर्माचें धारण करण्यासाठीं तीन पदें घेतलीं.] या ऋचेंत त्याचप्रमाणें 'समिधानः सहस्रजिदग्ने धर्माणि पुष्यसि' (ऋग्वेद ५–२६–६) विशां राजानमद्भुतमध्यक्षं धर्मणामिमम् अग्निमीळे स उश्रवत् [ऋ. ८–४३–२४ सर्व लोकांचा अद्भुत राजा व धर्मांचा अध्यक्ष असा जो अग्नी त्याचें मी स्तवन करितों; तो (स्तुति) ऐको.] यज्ञेन यज्ञमयजन्त देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् (ऋ. १०–९०–१६) इत्यादि ऋचांमध्यें 'धर्मन्' म्हणजे अग्निहोत्र, यज्ञयागादि क्रिया असा अर्थ अभिप्रेत आहे. याच अर्थानें बहुतेक ठिकाणीं या शब्दाचा उपयोग ऋग्वेदात केलेला आहे. दुसऱ्या कांहीं ऋचांत 'धर्मन्' शब्दाचा वरील अर्थ लागणार नाहीं; त्या ठिकाणीं 'आचाराचे किंवा सृष्टीचे नियम' असा अर्थ घ्यावा लागेल. उदाहरणार्थ 'धर्मणा मित्रावरुणा विपश्चिता व्रता रक्षेथे असुरस्य मायया' ऋ० ५–६६–७ सर्वज्ञ मित्रा वरुण देवहो (सृष्टिरूप धर्मानें तुम्हीं व्रताचें रक्षण करिता' इत्यादि) 'अचित्ती यत्तव धर्मा युयोपिम मा नस्तस्मादेनसो देव रीरिषः' (ऋ. ७–८९–५) 'हे देवा, न कळत आम्ही तुझे धर्म (घालून दिलेले नियम) मोडतों म्हणून त्या पापामुळें आमचा नाश करूं नकोस' वाजसनेय संहिता व अथर्ववेद यातहि धर्मन् शब्द येतो; व ऋग्वेदातील धर्मशब्दयुक्त बऱ्याच ऋचा वरील वेदात आढळतात. याच दोन वेदात प्रथम धर्म असा अकारान्त शब्द आढळतो. (वाज. सं. १०–२१, २०–९ अथर्ववेद ११–९–२७ इ.) ऐतरेय ब्राह्मणात (७–१७) 'धर्माचें रक्षण करणारा उत्पन्न झाला' (धर्मस्य गोप्ताजनि) असें राज्याभिषेकासंबंधानें म्हटलें आहे. या ठिकाणी धर्म म्हणजे सर्व कर्तव्याचा समूह किंवा कलाप असा अर्थ केला पाहिजे. छांदोग्य उपनिषदात (२–२३) एक वाक्य असें आहे, 'धर्माचे तीन स्कंध आहेत; यज्ञ, अध्ययन आणि दान (गृहस्थाश्रम) हा एक, दुसरा तपश्चरण (वानप्रस्थाश्रम व संन्यास) हा व तिसरा म्हणजे आचार्यकुलांत मरणापर्यंत राहून त्या ठिकाणींच आपल्या देहाचा पात करणारा ब्रह्मचारी' ('त्रयो धर्मस्कंधा यज्ञोऽध्ययनं दानमिति प्रथमस्तप एवेति द्वितीयो ब्रह्मचार्याचार्यकुलवासी तृतीयोऽत्यन्तमात्मानमाचार्यकुलेवसादयन्') या वाक्यात धर्म म्हणजे वर्ण व आश्रम यांचीं कर्तव्यें असा अर्थ दिसतो. याच अर्थानें धर्म हा शब्द तैत्तिरीयोपनिषदातील 'सत्यं वद, धर्मं चर' या वाक्यांत उपयोजिला आहे. मूळ यज्ञयागादि क्रिया या अर्थावरून मनुष्यमात्रांचें कार्य म्हणून, विवक्षित वर्णांतील व आश्रमांतील एक व्यक्ति म्हणून जें जें कर्तव्य व जे जे हक्क असा अर्थ धर्म शब्दास प्राप्त झाला. याच अर्थानें धर्म या शब्दाचा उपयोग करून भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणतात, 'स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकम्पितुमर्हसि' आणि 'स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः' या ठिकाणीं क्षत्रिय म्हणून जें अर्जुनाचें परंपरागत कर्तव्य

तोच त्याचा स्वधर्म. श्रीकृष्ण जेव्हां बोलले तेव्हां हिंदुधर्म, बौद्धधर्म, इस्लामी-धर्म या शब्दप्रयोगांत जी धर्म शब्दाच्या अर्थाची कल्पना आहे, ती मुळीं नव्हतीच. बोधायन, गौतम, आपस्तंब, वसिष्ठ यांची धर्मसूत्रें व मनुस्मृति वगैरे दुसरे स्मृतिग्रंथ ब्राह्मणादि वर्ण व आश्रम यांच्या कर्तव्याकर्तव्यानेंच नियम घडून दिलेले आहेत. फार प्राचीन काळापासून समाजांत स्वास्थ्य नांदावें व त्यांतील व्यक्तींनी समाज व त्यांचीं अंगें ह्या संबंधानें आपापलीं कर्तव्यें योग्य रीतीनें बजावून समाजस्थैर्य साधावें व त्याची परंपरा कायम राहावी म्हणून धर्मसूत्रांत निर्बंध घालून एकत्र करण्यांत आले. इ. स. पूर्वी दुसऱ्या शतकांत झालेल्या पातंजल महाभाष्यांतहि अनेक वेळां धर्मशास्त्रकारांची आज्ञा ईश्वराज्ञेप्रमाणें समजली जाई, असें सूचित केलें आहे. ' अपवादांकडून उत्सर्गाचा बाध होतो, अशी ईश्वराचीहि आज्ञा नाहीं किंवा धर्मसूत्रकारसुद्धां असें म्हणत नाहींत. ' (' नैवेश्वर आज्ञापयति नापि धर्मसूत्रकाराः पठन्ति अपवादैरुत्सर्गा बाध्यन्तामिति मिदचोऽन्त्यात्परः ' या पाणिनिसूत्रावरील महाभाष्य. ) धर्म शब्दाचा हा मुख्य अर्थ आहे. धर्मशास्त्रावरील प्रमुख ग्रंथ पाहिले तर त्यांत मुख्यत्वें करून तीन गोष्टींचा अंतर्भाव होतो. कांहीं विशिष्ट ( यज्ञादि ) क्रिया; विशिष्ट संस्कार व आचार; सत्य, दया, शम, दम, दान इत्यादि नैतिक नियम, जड सृष्टि, मनुष्य व इतर प्राणि, आत्मा व परमात्मा यांचें अस्तित्व व परस्परसंबंध इत्यादि आध्यात्मिक व तत्त्वज्ञानविषयक सिद्धान्त, या तिन्ही गोष्टींचा धर्म या शब्दांत अंतर्भाव केलेला आहे. हा सिद्धान्त सनातन धर्माबद्दलच सत्य आहे असें नाहीं, तर प्रचलित ख्रिस्ती धर्म इस्लामी धर्म यांतहि हीं तिन्ही अंगें थोड्या-फार प्रमाणानें आढळतात. एखाद्या धर्मांत यांतील एक किंवा दोन अंगांवरच फार भर आहे; त्याचप्रमाणें सनातन धर्मांतील निरनिराळ्या पंथांतहि एक किंवा दोन अंगांवरच जोर दिलेला आढळतो.

धर्म शब्दांत वर सुचविल्याप्रमाणें तीन गोष्टींचा अंतर्भाव होतो, व धर्मग्रंथांत तीन अंगांपैकीं एकाद्याच अंगावर विशेष भर दिला जातो ही गोष्ट धर्म शब्दाच्या कांहीं व्याख्या पाहिल्या असतां जास्त स्पष्ट होईल. पूर्वमीमांसासूत्रांत ' चोदना लक्षणार्थो धर्मः ' अशी व्याख्या दिली आहे. चोदना म्हणजे क्रियेला प्रवृत्त करणारें (' स्वर्गकामो यजेत ' अशा प्रकारचें ) वचन, त्यानें सूचित केलेली व मनुष्य-प्राण्याला श्रेयस्कर अशी जी गोष्ट तो धर्म, असा या व्याख्येचा अर्थ आहे. म्हणजे या व्याख्येनें ज्योतिष्टोमादि यज्ञयागच अभिप्रेत आहेत म्हणून या व्याख्येंत धर्माच्या एकाच अंगावर जोर दिलेला दिसतो ' अहिंसा परमो धर्मः ' ( अनुशासनपर्व ११५–१; ११६–३८, आदिपर्व ११–१३ ) हे शब्द महाभारतांत अनेक वेळां येतात. त्याच प्रमाणें ' आनृशंस्यं परो धर्मः ( वनपर्व ३७३–७६ आनृशंस्य म्हणजे क्रूरपणाचा अभाव अर्थात् दया ) हेहि शब्द वारंवार येतात. तसेंच ' इज्या-ध्ययनदानानि तप. सत्य दया क्षमा । अलोभ इति मार्गोयं धर्मस्याष्टविधः स्मृत ॥ ' या व्याख्येंत विशेषत नीतिविषयक नियमांवरच जास्त भर देण्यांत आला आहे. वैशे-

षिक सूत्रात ज्यापासून अभ्युदय ( स्वर्ग, कांहींच्या मतें तत्त्वज्ञान ) आणि निःश्रेयस ( मोक्ष ) याची सिद्धि होते तो धर्म, अशी व्याख्या दिलेली आहे. ( यतोऽभ्युदय-निःश्रेयससिद्धिः स धर्मः ) या व्याख्येंत अमुकच अंगावर विशेष भिस्त आहे, असें जरी दर्शविलें नाहीं तरी मुख्यत्वें करून तत्त्वज्ञान व वेदोक्त आचार यावरच भर आहे असें पुढील संदर्भावरून दिसतें. मनुस्मृतींत ( १-१०८ ) 'आचारः परमो धर्मः' असें म्हणून आचाराला प्राधान्य दिलें आहे. शंकराचार्यांनीं भगवद्गीताभाष्याचे प्रारंभीं 'आपलें कल्याण व्हावें असें इच्छिणाऱ्या चार वर्णांतील व आश्रमांतील लोकांनीं आचरिलेला तो धर्म; व तो प्रवृत्ति आणि निवृत्ति असा दोन प्रकारचा आहे' अशी व्याख्या केली आहे. ही व्याख्या व्यापक असून यांत उपरिनिर्दिष्ट तीनहि अंगाचा अंतर्भाव होतो." ( —लोकमान्य हिंदुस्तान अंक : शके १८४५, पान ५८ )

आता प्रस्तुत कालीं आपणांस परिचित असलेला कायदा व इंग्रजी राजवटीमुळें आपणांस अपरिचित झालेला 'धर्म' या दोन संज्ञांत अंतर्भूत होणाऱ्या कोणकोणत्या बाबतींत सादृश्य व कोणकोणत्या बाबतींत वैषम्य आहे याचें आम्ही थोडक्यात दिग्दर्शन करितों. एक अगर अनेक राजसत्ताधारी व्यक्तींनीं मंजूर करून अमलांत आणलेली आज्ञा म्हणजे कायदा असा प्रस्तुत कायदा या शब्दाचा अर्थ आहे. श्रुति आणि स्मृति या ग्रंथांत ग्रथित केलेल्या विधिनिषेधरूपी आज्ञा हा अर्थ धर्म शब्दानें व्यक्त होतो. अर्थात् धर्म आणि कायदा यांचा उत्पत्तिदृष्ट्या विचार केला असता, त्यात साम्य नाहीं हें उघड आहे. ज्या श्रुति अगर स्मृति यापासून धर्मशास्त्राचा उगम झाला आहे, त्या कोणत्याहि राजसत्ताधारी व्यक्तींनीं निर्माण केलेल्या नाहींत. कायद्याचें परिपालन, मुख्यत्वेंकरून राजसत्ताधिष्ठित व्यक्तींकडून त्याचा भंग केला असता होणाऱ्या दंडाच्या भीतीच्या योगानें केलें जातें. धर्माचें परिपालन, त्यात अंतर्भूत होणाऱ्या विधिनिषेधरूप आज्ञाचें उल्लंघन करणाऱ्या व्यक्तींची, समाजातील इतर लोकाकडून होणारी निर्भर्त्सना टाळण्याच्या हेतूनें, त्याचप्रमाणें त्या व्यक्तीचें पारमार्थिकदृष्ट्या होणारें अकल्याण टाळण्याच्या हेतूस्तव मुख्यतः केलें जातें. धर्मशास्त्राचें उल्लंघन केल्यास राजसत्ताधारी व्यक्तिकडून होणाऱ्या दंडाची भीति हेंहि धर्मशास्त्राच्या परिपालनाचें एक कारण आहे. भरतखंडात विशिष्ट पद्धतीनें बनलेल्या व चातुर्वर्ण्य समाजांत अंतर्भूत होणाऱ्या ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र इत्यादि प्रमुख वर्णाचे लोक, या प्रमुख वर्णांतील स्त्री-पुरुषाच्या अनुलोम, प्रतिलोम पद्धतीनें झालेल्या विवाहसंबंधापासून निर्माण झालेल्या प्रजाच्या पोटजातीचे लोक, जीवन व्यवसायाच्या भिन्नत्वामुळें उदयास आलेल्या जातीचे लोक व अनार्य प्रजा यांचें नियंत्रण धर्म करितो. कायदा हा एका काळवागोंच्या वर्णभेदासेरीज ब्राह्मण क्षत्रियादि भेद मान्य करीत नाहीं. धर्म या संज्ञेंत आचार, व्यवहार, प्रायश्चित्तधर्म, राजधर्म, स्त्रीपुरुषाचे धर्म इत्यादिकाचा समावेश होतो. स्मृत्यादि ग्रंथांत व्यवहार या संज्ञेंत पडणाऱ्या ज्या बाबी दर्शविल्या आहेत, त्या फक्त कायदा या

सर्व समाविष्ट होण्यासारख्या आहेत. धर्मांत अंतर्भूत होणाऱ्या प्रायश्चित्त या सदरांत पडणाऱ्या बाबी कायदा या सदरांत समाविष्ट होत नाहीत.

कायदा आणि धर्म या संज्ञांचा अर्थ काय व या संज्ञांत कोणकोणत्या बाबींचा समावेश होतो, या दोन्ही संज्ञांच्या मर्यादेच्या सीमा कोणत्या हें वरील विवेचना वरून वाचकांच्या लक्षात येण्यासारखें आहे. मराठी रियासतींत श्रुतिस्मृतिप्रणीत विधिनिषेधरूपी आज्ञांचा अमल राजसत्ता धारण करणाऱ्या अधिकाऱ्याकडून करण्यांत येत असे. (पुढें येणाऱ्या विवेचनांत ही गोष्ट आम्ही सिद्ध करून दाखविणार आहों.) स्मृत्यादि ग्रंथांत संग्रहित केलेल्या धर्मांशांचें पुढें दर्शविल्याप्रमाणें वर्गीकरण केलेलें आढळतें. धर्मांचे मुख्य आठ भाग मानिलेले आहेत (१) आचारधर्म. यांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चार वर्णांच्या लोकांचे आचारधर्म व उप जीविकेचीं कर्में यांचा समावेश होतो. (२) व्यवहार (३) राजधर्म (४) विवाहित स्त्रीपुरुषांचे धर्म (५) संकर जातींच्या लोकांचे धर्म (६) आपद्धर्म (७) प्रायश्चित्तधर्म (८) मोक्षधर्म. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या तीन वर्णांतील लोकांच्या आयुष्याच्या चार अवस्था कल्पिल्या आहेत या चार अवस्थांस आश्रम ही संज्ञा आहे, ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास या चार आश्रमांतील व्यक्तींचीं कर्तव्यें भिन्न स्वरूपाचीं आहेत. यामुळें या चार आश्रमांतील लोकांचे धर्महि भिन्न स्वरूपाचे आहेत या चारहि आश्रमांतील लोकांच्या आचारांच्या निरनिराळ्या नियमांस आश्रमधर्म ही संज्ञा असल्याचें आम्ही वर नमूद केलेंच आहे. मराठी रियासतींत चातुर्वर्ण्य समाजापैकीं कोणत्याहि व्यक्तीनें ती व्यक्ति ज्या वर्णाची व आश्रमाची असेल त्या वर्णास व आश्रमास श्रुतिस्मृतिदृष्ट्या विहित म्हणून प्रतिपादिलेल्या धर्मास अनुसरून वर्तन न केल्यास त्या व्यक्तीस दंड करण्याचें अथवा प्रायश्चित्त घेण्यास भाग पाडण्याचें राजसत्ताधिष्ठित व्यक्तींच्या अनेक कर्तव्यांपैकीं एक कर्तव्य समजण्यांत येत असे. ही अत्यंत महत्त्वाची व लक्षांत ठेवण्यासारखी बाब प्रस्तुत स्थळीं नमूद करणें जरूर आहे प्रस्तुतच्या इं. पि. कोडप्रमाणें दारू पिऊन सार्वजनिक ठिकाणीं दंगामस्ती करून शांततेचा भंग करणें हें कृत्य जसें दंड्य समजलें जाऊन त्या व्यक्तीस इंग्रजी राज्यांतील मॅजिस्ट्रेट (दंडनायक) शिक्षा करितो, त्याचप्रमाणें आचारधर्मांत अंतर्भूत होणाऱ्या विधिनिषेधरूप आज्ञांचे विरुद्ध वर्तन करणारास मराठी राज्याच्या अमदानींतील सरकारी अधिकारी शिक्षा करीत. प्रस्तुतच्या पिनल कोडाप्रमाणें नुसतें मद्यप्राशन करणें हा गुन्हा होत नाहीं मग ती व्यक्ति कोणत्याहि वर्णाची असो अगर आश्रमांतील असो. मराठी रियासतींत श्रुतिस्मृतिप्रतिपादित धर्मप्रमाणें ब्राह्मणास मद्यप्राशनाचा निषेध आहे त्या काळीं एखाद्या ब्राह्मणानें मद्यप्राशन केल्यास त्यास सरकारी अधिकारी स्मृतिधर्माची आज्ञा मोडल्याबद्दल शिक्षा (देहदंड अगर शारीरदंड) करीत, व शिवाय स्मृतिधर्मांप्रमाणें प्रायश्चित्त घेण्यासहि भाग पाडीत. आचारधर्माविरुद्ध वर्तन करणारास शासन करणें, हें त्या काळीं सरकारी अधिकाऱ्यांचें कर्तव्य असे आता स्मृत्यादि ग्रंथांनीं प्रतिपादि

केला, धर्माचा व्यवहारधर्म हा जो दुसरा प्रमुख भाग त्याच्या व्याप्तीचें थोडक्यात दिग्दर्शन करितों. हजारों मानवी व्यक्ती मिळून बनलेल्या मानवी समाजांत व्यक्तिव्यक्तिमध्यें ऋणदानादि अनेक व्यवहार घडणें स्वाभाविक असून अपरिहार्य आहे. अशा प्रकारचे व्यवहार चालू असतां दोन निरनिराळ्या व्यक्तींमध्यें वाद उत्पन्न व्हावयाचाच अशा व्यवहाराचे अठरा प्रमुख प्रकार स्मृत्यादि ग्रंथात सांगितलेले आहेत. कांहीं स्मृतिग्रंथातून व्यवहाराचे एकशें आठ प्रकार असल्याचें सांगितलें आहे. ऋणदानादि व्यवहाराच्या बाबतींत स्मृत्यादि ग्रंथांत जे निरनिराळे प्रकार सांगितले आहेत, त्यास 'व्यवहारधर्म' अशी संज्ञा आहे. प्रजेंत जे व्यवहार उत्पन्न होतील, त्यांचा योग्य प्रकारें निवाडा करणें, हें राजाच्या अनेक कर्तव्यांपैकीं एक कर्तव्य आहे. स्मृत्यादि ग्रंथात व्यवहाराचीं जीं अठरा प्रमुख स्थानें सांगितलीं आहेत त्यांचे मुख्य दोन भेद आहेत. ऋणदानादि व्यवहारस्थानें (ज्यामध्यें प्रस्तुत काळच्या सिव्हिल लॉचा समावेश होईल) व वाक्पारुष्य, दंडपारुष्य इत्यादि व्यवहारस्थानें (ज्यामध्यें प्रस्तुत काळच्या क्रिमिनल लॉचा समावेश होईल) हे ते दोन भेद होत. धर्म या संज्ञेंत समाविष्ट होणारा तिसरा महत्त्वाचा भाग म्हटला म्हणजे 'प्रायश्चित्तधर्म' होय. स्मृत्यादि ग्रंथात जे वैयक्तिक वर्णाश्रमधर्म ग्रथित केले आहेत, त्या धर्माच्या उल्लंघनामुळें अगर त्या धर्माच्या विरुद्ध वर्तन केल्यामुळें घडणाऱ्या दोषाचें निराकरणार्थ स्मृत्यादि ग्रंथात विशिष्ट प्रकारचीं प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत, त्यास प्रायश्चित्तधर्म असें म्हणतात. प्रायश्चित्तमयूखात मयूखकारानें प्रायश्चित्ताचा हेतु व व्याख्या पुढीलप्रमाणें केली आहे. कर्म (संध्यादि) न केल्यापासून, सुरादि निषिद्ध पदार्थांचें सेवन केल्यापासून आणि इंद्रियांचें दमन न केल्यामुळें मनुष्यास पातित्य येतें. या दोषापासून मुक्त होण्याकरितां तप व निश्चय यांनीं युक्त जें कर्म करावयाचें, तें प्रायश्चित्त होय. प्रायश्चित्तें अनेक प्रकारचीं सांगितलीं आहेत; परंतु प्रस्तुत स्थळीं त्यांविषयीं अधिक चर्चा करण्याचें प्रयोजन नाहीं. राजधर्म हा एक धर्माचा महत्त्वाचा भाग आहे. राजाची दिनचर्या, प्रजेसंबंधीं व परराज्यसंबंधीं राजाचीं कर्तव्यें, युद्ध, संधि, विग्रह, अमात्यप्रधानाची स्थापना इत्यादि बाबींसंबंधीं राजाचीं जीं कर्तव्यें, त्यांचा समावेश राजधर्मांत होतो. विवाहित स्त्रीपुरुषांचीं परस्परासंबंधीं जीं कर्तव्यें, तोहि धर्माचा एक महत्त्वाचा भाग आहे. आतां धर्माच्या एका महत्त्वाच्या भागासंबंधीं दिग्दर्शन करावयाचें राहिलें. तो भाग म्हणजे आपद्धर्म हा होय. ब्राह्मणक्षत्रियादि चार प्रमुख वर्णांतील व्यक्तींचे जीवनव्यवसाय व धर्म स्मृतींनीं सांगितले आहेत; परंतु आपत्ति आली असतां त्या व्यक्तीचा जो जीवनव्यवसाय स्मृतींनें सांगितला आहे, तो व्यवसाय करून आपली उपजीविका करणें त्या व्यक्तीस अशक्य झालें तर आपत्कालीं त्या व्यक्तीनें जीवनव्यवसायार्थ जें कर्म करावयाचें, त्यास आपद्धर्म ही संज्ञा आहे.

कायदा व धर्म या दोन संज्ञांचा अर्थ, यांत समाविष्ट होणाऱ्या निरनिराळ्या बाबी, या दोन बाबतींत असलेलें साम्य व वैषम्य आणि या दोन बाबींच्या व्याप्तीचा

प्रदेश या विषयांचें विवेचन वरीलप्रमाणें केल्यानंतर न्याय आणि व्यवहारनिर्णय या दोन संज्ञांचा अर्थ व यांत समावेश होणाऱ्या बाबींचें आम्ही आतां दिग्दर्शन करितों. प्रस्तुत काळीं कोणत्याहि बाबीसंबंधीं दोन व्यक्तींत वाद उत्पन्न झाला असतां त्या वादाचा निकाल करणें अगर एखाद्या व्यक्तीनें कायद्याविरुद्ध वर्तन केल्यास त्याची चौकशी करून कायद्याविरुद्ध वर्तन करणारास शासन करण्याची जी क्रिया, त्यास न्याय म्हणतात. इंग्रजी राज्य महाराष्ट्रांत स्थापित झाल्यावर हें कार्य करण्याकरितां ज्या संस्था स्थापन करण्यांत आल्या, त्यास कोर्टें ही संज्ञा असून न्यायदानाचें काम हीं कोर्टें करितात. प्रस्तुत काळीं न्याय करणें ही संज्ञा ज्या क्रियेस दिली जाते, त्या क्रियेस पूर्वी व्यवहारनिर्णय असें म्हणत. मनुस्मृतीच्या आठव्या अध्यायाच्या प्रारंभीं जे श्लोक दिले आहेत, त्यांत व्यवहार शब्दाचें स्वरूप व व्याख्या यांचें दिग्दर्शन केलें आहे. ऋणदानादि अठरा विवादामध्यें विरुद्ध अर्थ प्रतिपादन करणाऱ्या वादीप्रतिवादी यांच्या वाक्यापासून उत्पन्न होणाऱ्या संदेहास घालविणारा जो विचार त्यासच व्यवहार असें म्हणतात अशा विचारामुळें आपसां-तील विवादाच्या योगानें प्रजेस होणारी पीडा नाहींशी होत असते, यास्तव हाहि प्रजेच्या रक्षणाचा उपाय असल्यामुळें राजानें व्यवहार अवश्य पाहावा, असें मनु स्मृतींत सांगितलें आहे. प्रस्तुत काळीं ज्यास न्याय करणें म्हणतात, त्यासच इंग्रजी राज्याच्या स्थापनेपूर्वी व्यवहारनिर्णय करणें म्हणत, हें वरील विवेचनावरून स्पष्ट झालें आहे.

प्रायश्चित्त या संज्ञेच्या अर्थाचें दिग्दर्शन मागें एके ठिकाणीं केलेलें आहे. स्मृतिग्रंथांत सांगितलेल्या आचारधर्मविषयक विधिनिषेधरूपी आज्ञांचें उल्लंघन मराठी रियासतीचे काळांत प्रजेपैकीं कोणी एखाद्यानें केल्यास त्याबद्दल त्यास दंड करणें अगर विशिष्ट प्रकारचें प्रायश्चित्त घेण्यास भाग पाडणें हा अधिकार सरकारी अधिकाऱ्यास होता. इंग्रजी राज्याच्या स्थापनेनंतर प्रायश्चित्त धर्माची बजावणी सर-कारी अधिकाऱ्याकडून होणें बंद पडलें. इंग्रज राजकर्ते हे स्मृतिधर्मानुयायी नसल्या-मुळें हा प्रकार घडून आला. मराठी रियासतींत कोणतें कर्म केल्यास त्यास कोणतें विशिष्ट प्रायश्चित्त घ्यावयाचें याचा निर्णय वन्हाड, माहुली, वाई, कोल्हापूर, नाशिक, पुणतांबें, पैठण इत्यादि क्षेत्रांच्या ठिकाणच्या विद्वान् व धर्म-शास्त्रपारंगत ब्राह्मणांच्या सभा करीत असत. या सभांकडून प्रायश्चित्ताचे बाबतींत फर-म्यात येणारे निर्णय म्हणजेच प्रायश्चित्त निर्णय होय.

---

प्रकरण ४ थें

# ' इंग्रज राजवटीतील न्यायदानसंस्था व न्यायदानपद्धति '

## पूर्वार्ध इ. स. १८१८ ते १८६९

महाराष्ट्रात इग्रजी राज्य स्थापन झाल्यावर या प्रदेशात प्रजेत उत्पन्न होणाऱ्या वादाचा निर्णय करण्याकरिता कोणती पद्धति व कोणत्या संस्था स्थापन कराव्या हा एक मोठा महत्त्वाचा व बिकट प्रश्न इग्रज राज्यकर्त्यांपुढें उभा राहिला. इग्रज हे सूज्ञ व चाणाक्ष राज्यकर्ते असल्यामुळें व कोणत्याहि प्रश्नाची सांगोपांग व संपूर्ण माहिती मिळवून तिच्या परीक्षणानंतर कोणती गोष्ट करणें युक्त हें निश्चित करण्याची पद्धति त्यांच्या अंगीं असल्यानें ब्रिटिश राजवटीपूर्वीच्या मराठी राज्यात कोणती पद्धति व कोणत्या संस्था प्रजेंतील वादाचा निवाडा करण्याकरितां अस्तित्वांत होत्या याची साधार माहिती मिळविण्याकरिता त्यांनीं प्रश्नपत्रिका तयार करून तत्कालीन मराठी राज्यांतील नामांकित घराण्यांच्या प्रमुखाकडे व पूर्वं राजवटींतील अधिकाऱ्या कडे पाठवून त्यांचीं उत्तरें मागविलीं. अशा प्रकारच्या कांहीं प्रश्नपत्रिका राजवाडे संशोधन मंडळाकडून प्रसिद्ध होणाऱ्या संशोधक त्रैमासिकात प्रसिद्ध करण्यात आल्या आहेत. त्यापैकीं नमुन्यादाखल एक प्रश्नपत्रिका आम्ही येथें देतों इंग्रज राज्यकर्त्यांनीं पूर्व राजवटींतील जी एतद्विषयक माहिती मिळविली ती प्रश्नपत्रिकेंतील प्रश्नास दिलेल्या उत्तरात नमूद केलेली आढळून येते ही प्रश्नपत्रिका पेशवाईंतील काशिपत चदरे ( वैद्रे ) यांचेकडे पाठविण्यात आली होती व या पत्रिकेंतील प्रश्नांचीं उत्तरें त्यांनीं जीं दिलीं तीं खालीं दिलेल्या यादींत नमुद केलीं आहेत

यादी तारीख १५ अगस्ट सन १८२२ इ शके १७४४ श्रावण ब।। १४ सरकारातून यादी आली त्यातील आज्ञा

१ शिवाजी महाराज व शाहू महाराज यांचे कारकीर्दींत न्याय मजकूर कसा होता त्याची माहितगारी विशी कलमें

२ पातशाहा यांचे कारकीर्दींचे मजकूर

३ बाळाजी बाजीराव व माधवराव बाळाजी व माधवराव नारायण ति।। बाळाजी जनार्दन अखेर सदरहू मजकूर. कलमें

पैकीं महाराज उभयता व पातशाहा यांचे कारकीर्दींतील न्याय प्रकर्णी वगैरे मजकूर ओकिफ्यातील स्मरणात नाहीं. कलमें २. बाकी बाळाजी बाजीराव वगैरे कारकीर्दींतील ज्या प्रकर्णी ऐकीव मजकूर. कलमें

१ प्रथम जे वेळेस आसामी गुन्हा करतो, तो वेळा पचाइत जमा कराचे

नंतर त्याजवर तक्सीर आहे किंवा नाहीं हें दर्यासी पंचाइत पाहात होते किंवा सरकारांत गुन्हा चौकशी करून शाबूत करीत होते म्हणोन आज्ञा याचें उत्तर विनंती. कलमें

१ फंदी व फितुरी व राजकारणी व गवाळीपाळेगार बदमाश यास तेच समई कैद करून सरकारांत दिवाण याचे वि॥ चौकशी करीत होते आणि गुन्हा शाबूत सरकारांतच करीत होता.

२ मध्यम आपराधी मोठ्या माणसापासून जाहल्यास कैद न करितां बोलणार मुछदी याचे जिमेस करून त्याचा जाब घेतोन परभारा बोलणार याजकडोन गुन्हा शाबूत करून आपराध व सामर्थ्य पाहून गुन्हेगारीवर विल्हेस लागत होते कलमें

३ किरकोळ आपराध व लाहान माणसें याजकडून होत त्यातील मजकूर कानावर आल्यास कामगार लोक याजकडे आज्ञा होऊन चौकशीनरूप गुनेगारी घेऊन विल्हेस लागत होते शासनचा अन्याय असल्यास कामगार याजकडून समजान घेऊन पारपत्य करीत होते. कलमें

४ वतनी वादाविशीं निवडपत्रें व महजर व ताकिदीपत्रें फिर्यादी वगैरे यास द्यावयाची त्याचा मजकूर कामगार याजकडून समजोन घेऊन वतनी मार माहजर वादी प्रतिवाद याचे समक्ष व ताकिदीपत्रें कारभारी याजकडून देवावीं येणेंप्रमाणें विल्हेस लागत होते.

२ पाटील गुन्हा करी तरी त्याचे दर्यासीस पाटील ब्राह्मणाचे गुन्हास ब्राह्मण असेच जातीचे जमा करोन गुन्हा शाबीत करीत होते किंवा कसें म्हणोन आज्ञा याचें उत्तर कलमें

१ पाटील याचे तपशील

१ वतनी वाद प्रकर्णी पाटील जमा करीत होते अन्य रालून मेकातीं घेत होते

२ बदकर्म प्रकर्णी गुन्हेगारी बोभाट जाहल्यास जातींत धर्णे जातीचे विचारें करीत होते

३ किरकोळ कटकटी रईतेच्या त्याच्या तडजोडी.

४ बाकी गुन्हे सरकार मामलेदार मनास आणीत होते

२ ब्राह्मण याचा तपशील.

१ शास्त्रार्थ प्रकर्णी खटल पडोन प्रामस्त जाहल्यास मोठमोठे जमा करोन त्याचा शास्त्रार्थ करावयाचा तो सर्वांचे विच्यारें करीत होते

२ प्रायश्चित्त देणें अगर वाळींत टाकणें जातीचे विच्यारें

३ च्योरी अगर बदकर्म जाहल्यास त्याची खबर घेतोन सरकारचे विच्यारें गुन्हेगारी घेऊन उलगडा करीत होते कलमें

४ फदकितूर राजकारण खून प्रसीद्ध असल्यास सरकारांतून पारिपत्य किलया-वर ठेवित होते अगर देशांतर करवित होते. जातीचें प्रयोजन नाहीं.

३ जातीजातीचा मार लाहान मोठा अवरचा पाहून व्यवस्था पारपत्य अगर गुन्हेगारी घेऊन बक्षीस होत होतें दस्तुराचा येक नेम नाहीं.

३ एक पंच पंचाइत गुन्हा शाबीत करावयास करीत होते किंवा वेगळे वेगळे नेमीत होते म्हणोन आज्ञा याचें उत्तर कलमें

गुन्हेगार आसामी.

१ फंदी व फितुरी व राजकारणी हरजात

२ मवशी पालेगार

३ बंडवाले व तोतये

४ ज्या वर्णास मद्यपान करावयाचा अधिकार नाहीं ते

५ हीन वर्णाशी उत्तम वर्णाची स्त्री बदकर्म करिते व हीन वर्ण उत्तम वर्णाशी जाऊन बदकर्म करिता यकूण

६ सरकारचे कन्या कामात हिशेबी ऐवजाची तफावत करणार व बोलण्यात ऐवजाची तफावत करणार आसामी

७ द्रव्यलोभानें चोरी करणार व परस्त्री हरण करणार

८ खुनी दग्यानें मारणार

१ मारेकरी

२ दावेकरी जमेदारी वादावा वगैरे

३ हरवडेकरी व चोरटे येरट व वाट मारणार मांग वगैरे

४ बदकर्मानिमित्य पुरुष अगर बायको अन्योन्य वध

५ शिवेच्या कज्यानिमित्य परस्परें कटकटीत खून

६ शिपाई लोक याचे वाद कलागतींत मेले जातात ते फिर्यादी

९ बायको बदफैली निघाली दुसेरियाची हिमायत करोन नवराशीं वागत नाहीं

१० शिवे प्रकर्णी ज्याजती कोणी केल्यास अशक्त फिर्यादी देतो

११ बंधु रयाची वांटणीविशी सावकार व जगेदार वगैरे दौलतदार खेरीज करून

१२ जमेदार वृत्तीच्या वादानिमित्य

१३ घेण्यादेण्याचा

१४ तुफानी अगर ज्याजवर तुफान आलें तो

१५ घर जागा कम ज्याजती विशीं

१६ बाजारी वी कलागतें

१७ मामलेदार यांणी ज्यास्ती जुलूम केल्यामुळें रयत मामलेदार याजवर फिर्यादी

१८ जातीनूत बाहेर टाकिलो जातीवर फिर्याद

१९ मस्त होऊन दुसऱ्याचे यावयावर हुकूम करणार त्याजविषीं फिर्याद त्यांतील पंचायत

१ हुजूर पुणें मुकामीं

१ न्यायाधीश शास्त्री याजकडे फडणीस चिटणीस दरकदार याचे विशी घ्यावे हुकूम

२ फडणिशीकडे तसनवती था व मामलेदार प्रकर्णी

३ कोतवाल चावडी बदकर्मी व बायकांचे टाटले व किरकोळ फिर्यादी दरकदार याचे विशी

४ पुणें सुभा शिवेप्रकर्णी चोरी करणार दावे करणार जमेदार दरवडेखोर व खुनी किरकोळ पर जाग्याप्रकर्णी व बाजारी फलागता वगैरे किरकोळ

५ हुजूर खावंद दिवाण फदपितुरी राजकारणी मवशी पालेगार बंडवाले व तोतये मारेकरी मोठा अवरुचा माणूस गैराह वागणारा येणेप्रमाणें याची चौकशी समक्ष मनास आणोन अवरुचा बन्दाव गुन्हेगारी घेऊन करा मयाचा अस्स्यास करावा जामीन घ्यावा पारपत्य करावयाचे अस्स्यास करित होते चौकशीस वलणाचे मुसदी जवल असेत त्याचे विच्यारें दरवाती होत होती

२ माहाली मामलेदार सदरहू कलमें मनास आणित होते लाहान मोठा पाहून गुनेगारी घेणें आणि येमालुम बचाव करणें अगर पारपत्य करणें अगर पचाईत नेमून देणें सारासार विचार पाहून करीत होते फंदी फितुरी राजकारणी हुजूर आशेनरुप पारपत्य करणें ते करीत होते दस्तुर एक नाही वादी प्रतिवादी मामलेदार याजवर गैरराजी होऊन हुजूर फिर्याद जात होते

३ पचाईत नेमावयाची त्यास कामगार कोणी पांच नेमावे त्यांत मुखत्यार सरकारचा एक कारकून अगर ज्याजकडे पचाईत नेमिली तो प्रमुख येणें प्रमाणें ठरल तो मजकूर प्रमुख अगर कारकून याणीं सरकारांत समजावा.

४ दरोबस्त फिर्यादी खावद नित्यानित्य पाहात होते असें नाहीं. येकादे वेलेस गाठ पडल्यास ऐकून घेऊन मनास आणावयास सांगत होते नेहमीं ज्याचें काम त्याणीं घरावर करून कानावर घालावें कामगार याजकडे फिर्याद करावी हरवक्त ज्याजती जुलूम करणार त्याजविशीं बातमी नेऊन ताकीदी होत होत्या.

४ कोणती पचाईत कोणाकडे होती पचाईत कोण करीत ते त्याचें नाव ल्हूण दावेकरी वगैरे सुधा खावद समजोन घेत होते किंवा नाहीं म्हणोन आज्ञा याचें उत्तर.

१ हुजूर खावद व दिवाण याणीं मनास आणावयाचीं कामें.

१ फंदी फितुरी राजकारणी

२ मवशी पालेगार

३ बंडवाले व तोतये.

४ मारेकरी व ज्यास्ती मस्त होऊन मोठा माणून जुलूम करणार वगैरे.

येणेंप्रमाणें कमजास्ती पाहून गुणेगारी घेऊन अम्ल ठेवीत होते अगर पारपत्य करणें असल्यास करीत होते.

२ न्यायाधिशीकडे

१ मद्यपी वाजविशीं.

२ मामलेदार याजकडोन खटले न तुटल्यास ताकीदपत्रें द्यावयाचीं अगर मनास आणावयाचें.

३ जमेदारी वाद.

४ घेणें देणें या.

५ तुफाणी आदावती.

६ ज्याती बाहेर टाकिले त्याजविशीं.

७ किरकोल तो.

३ कोतवाल बदकर्मी वगैरे खुनी किरकोल खटले

४ फडावर तफावती प्रकर्णी व मामलेदार प्रकर्णी वगैरे फिर्यादी

५ शिपाई लोक सरदार प्रकर्णी मानकरी वगैरे बक्षी याजकडे

६ शिवेचे खटले व दरवडेखरी व चोर दावेकरी जमेदार व खुनी घरजागा प्रकर्णी व वध कलागती वगैरे किरकोल

७ बाकी मादासी मामलेदार मनास आणीत होते

येणेंप्रमाणें मजकूर कामगार मनास आणोन खावंदास समजावित होते शिर. छेद करणें अगर गुनेगारी घेऊन खुन माफ करणें सरकार आज्ञेवरून व किरकोल काम परभार दर्यांसी पाहून कामगार करीत होते.

५ शिरछेद करणें गुन्हा ठरल्यावर हा मगदूर सरकारातच होता किंवा मामलेदार वगैरे करीत होते म्हणोन आज्ञा याचें उत्तर

१ हुजूर सरकार अपराध पाहून करीत होते

२ नजीक संस्थानें

१ सर सुभा वसई

२ सर सुभा बागलाण

३ सर सुभा सावनूर

४ सर लस्कर सुभा कर्नाटक

५ पुणें सुभा

६ दौल सातारा

७ मिरजकर

८ रास्ते

९ विंचूरकर ब्राह्मण खेरीज करून बाकी अपराध माणूस पाहून

अशा ठिकाणी परवानगीनें होत होते व दरबारकरी, मांग, धेड दारें पर-पत्य मुखत्यारीनें करीत होते कारण सरकार परवानगी देती.
२ ओर तऱ्ही अमल.

१ स्वारी हुजूर जरीपटका.
२ सर सुभा अमदाबाद.
३ सर सुभा नंदुरबार.
४ मामलेदार बुंदेलखंड.
५ मामलेदार झांशीवाले.
६ सुभा शिंदे.
७ सुभा होळकर.
८ अली बहादर.
९ मामलेदार ओर अमली अंमलमवशी.

न्याय अन्याय पाहून ब्राह्मण खेरीज करून मुखत्यारीनें विरछेद करीत होते.
खेरीज मगदूर ऐकण्यांत नाहीं.

वर नमूद केल्याप्रमाणें त्या काळीं अस्तित्वांत असलेल्या न्यायदानसंस्थांची ज्या प्रकारची माहिती दिली आहे, तशा प्रकारची माहिती Notes on Maratha Institutions या नांवाच्या एका हस्तलिखित ग्रंथांत त्या काळीं महाराष्ट्रांतील लोकसमाजाविषयींची नाना प्रकारची माहिती मिळवून ती या हस्तलिखितांत दिली आहे. त्यापैकीं न्यायदान पद्धतींविषयींची या हस्तलिखितांत दिलेली माहिती यापुढें आम्हीं नमूद केली आहे.

## मराठा राजवटींतील न्याय देणाऱ्या संस्थांसंबंधीं माहिती

किरकोळ कर्जवसुली सारख्या किरकोळ वादाचा निवाडा पंचायतीकडे न सोंपवतां सरकारी अधिकारी पक्षकाराच्या संमतीनें स्वतःच करीत. पंचायत बोलावून तिचेकडे असल्या वादाचा निवाडा सोंपवण्याची वहिवाट नव्हती.

कोणताहि वादाचा निवाडा करण्याकरितां पंचायत नेमावयाची कीं नाहीं हें सरकारी अधिकारी व सरकारचे न्यायशास्त्री ठरवीत असत. परंतु कोणत्याहि महत्त्वाच्या वादाचा निवाडा पंचायत भरवूनच केला जात असे. पंचायत न भरवतां असल्या वादाचा निवाडा करणें हें कायदेशीर समजलें जात नसे.

वादाचा निवाडा करण्याकरितां पंचायतींतील सभासद होतां होईल तो ज्या इसमांत वाद उत्पन्न झाला असेल त्याच्या जातीचे अगर धंद्याचेच नेमण्यांत येत असत. परंतु ही गोष्ट करणें शक्य नसेल तर अन्य जातीचे अगर धंद्याचे पंच

नेमीत असत. वादाचा निवाडा करण्याचे अधिकार असलेल्या कोणाहि अधिकारी माणसाकडे अर्ज करून पंचायत मरविण्यात येत असे.

एखाद्या महत्त्वाच्या वादात धर्माच्या अगर कायद्याच्या प्रश्नाबद्दल शंका उपस्थित होण्याचा प्रसंग आल्यास एखाद्या शास्त्र्याचें मत त्या मुद्यापुरतें विचारात घेण्यात येत असे. परंतु शास्त्री पंचायतीचा सभासद असल्यास त्याच्या मताचें महत्त्व मानण्यात येत असे.

पंचाच्या निवाड्यात वादाची हकीकत, उभयता वाद्याच्या लेखी तकारींचा साराश, पक्षकारातर्फे दाखल करण्यात आलेल्या लेखी व तोंडी पुराव्याचें विवेचन, दाव्यातील मुद्यांबद्दलचीं साधकबाधक प्रमाणें व अखेर निर्णय इत्यादि गोष्टी पंचाच्या निवाड्यात दाखल करण्यात येत असत

पंचांच्या निवाड्यानुसार वादाच्या अखेर हुकूम पुणें शहरात पेशवे करीत, व अन्य ठिकाणचा मामलेदार अगर त्या प्रदेशाचा वरिष्ठ अधिकारी करीत असे.

पंचायतीच्या निवाड्यावर अपीलें करण्याचा वराच प्रघात होता. सरकारनें पंचायतीचा निर्णय कायम केल्यावरहि एखाद्या पक्षकारानें सबळ कारणें दाखविल्यास व सरकार हुकूम करीत तो देण्यास तयार असल्याचें कबूल केल्यास सरकारनें केलेल्या हुकुमाचा फेरविचार करण्यात येत असे अथवा नवीन पंचायत भरवून त्या वादाचा निवाडा करण्यात येत असे.

एखाद्या वादाचा निवाडा करण्याचे कामीं जाणूनबुजून अन्याय झाल्याचें दृष्टोत्पत्तीस आल्यास अथवा वजनदार गृहस्थाचें सरकारी निर्णयाची तपासणी करावी असें मत झाल्यास त्या वादाचा निवाडा करण्याकरिता पुन्हा पंचायत भरविण्यात येत असे.

निवाडा करण्याकरिता रकम देण्याचा प्रघात नव्हता. परंतु पंच उभयतां पक्षकाराकडून कांहीं रकम घेत. परंतु लाच खाऊन पंच आपलें मत निवाड्याचे कामीं देताना आढळत नसत.

पुणें शहरात ज्याप्रमाणें पेशव्याच्या हुकुमानें पचायती भरविण्यात येत त्याच प्रमाणें परगण्याचा मुख्य अधिकारी परगण्याच्या पचायती बोलावीत असे ग्रामपंचायतींत विशेष मानगड नसे. लिहिण्याचें काम म्हणण्यासारखें या पंचायतीस करावें लागत नसे. वादाच्या निवाड्याचा थोडक्यात साराश तेथील कुलकर्ण्याकडून करविण्यात येत असे.

पाटलाकडे कोणत्याहि वादात पंचायत नेमण्यात यावी असा कोणीं अर्ज केल्यास पंचायत बोलावणें त्याच्या मर्जीवर अवलंबून असे. त्याला योग्य वाटल्यास तो पंचायत बोलावीत असे पंचायत बोलावण्याचें पाटलानें नाकारल्यास त्या बाबतींत मामलेदाराकडे अर्जदारास अपील करता येत असे अथवा शेकदाराकडे तक्रारअर्ज पक्षकारास करतां येत असे. शेकदार पंचायत भरविण्याविषयीं पाटलास शिफारस करीत

असे अथवा परगण्याच्या मुख्य अधिकाऱ्याकडे पंचायत भरयाची अशी शिफारस करीत असे. परंतु शेतदारांस वरिष्ठ अधिकाऱ्यानें पंचायत बोलविण्याचा अधिकार सोंपविला नसल्यास त्यांना पंचायत बोलावण्याचा अधिकार नसे.

ग्रामपंचायतीमध्यें गांवांतील व्यवहार जाणणारे हुशार लोक पंच म्हणून काम करीत. यांतील टाकलेले व हलक्या जातीचे लोकांस पंच म्हणून निवडण्यांत येत नसे.

वतनासंबंधाच्या वादांत आसपासच्या गांवच्या स्नेहसंबंधी पाटलांना वलात्कारतीकरितां बोलावण्याचा प्रघात होता. वतनासंबंधीं वादाच्या निवाड्याकरितां पंचायत भरविणें जेव्हां जरूर पडे तेव्हां अशा लोकांची मामलेदारांच्या हुकुमावरून पंच म्हणून निवड करण्यांत येत असे.

पंचांच्या निवाड्याची अंमलबजावणी पाटलाकडून केली जात असे. त्यांच्या व्यक्तिगत वजनावर त्यांच्या निवाड्याची बजावणी अवलंबून असे. पाटलाच्या निवाड्यात कोणत्याहि प्रकारची जुलूमजबरदस्ती असली तर त्याचा पाठपुरावा केला जात असे.

पाटलाच्या पंचायतीहून *देशमुख–देशपांड्याची पंचायत ही वरिष्ठ प्रकारची होती. मुसलमानी अंमलाखालीं देशमुख–देशपांडे वतनदारांच्या पंचायती भरविण्यांत येत असत.

एखादा वादी, देशमुख–देशपांड्याकडे पंचायत भरविण्याविषयीं विनंति करण्यास गेल्यास तशी पंचायत बोलावण्याचा अधिकार देशमुख–देशपांड्यास होता व ते तशी पंचायत भरवीत असत.

पंचायतीसंबंधीं लोकमत काय आहे यासंबंधीं चौकशी करतां लोकांना पंचायती पसत असल्याचें दिसून आलें. अदालतीविषयीं लोकमत विशेष अनुकूल असल्याचें दिसलें नाहीं. पुरातन कालापासून पंचायती अस्तित्वांत असल्यामुळें त्याचे विषयीं लोकमत अनुकूल आहे व चांगल्या पद्धतीनें पंचायतींचें काम केलें गेल्यास अन्यायाचा प्रतिकार उत्कृष्ट प्रकारें त्यांचेकडून होईल.

आपली न्यायदानाची पद्धत व आपल्या न्यायदानाच्या संस्था कितीहि चांगल्या असल्या तथापि लोकमत आपल्या पद्धतीविषयीं प्रतिकूल असल्यामुळें आपली न्यायदान पद्धति देशांत सुरू करणें मुत्सद्दीपणाचें होणार नाहीं.

पंचायतीमध्यें कांहीं लाचेचे व अप्रामाणिकपणाचे प्रकार जरी दृष्टोत्पत्तीस पडले तथापि लोकांचा त्यापासून नुकसानीपेक्षा फायदा अधिक होत असे. मात्र पंचायतीचे कारभारावर अधिक देखरेख ठेवून लाच खाणा या पंचास शिक्षा देऊन पंचायती सुधारण्याचा प्रयत्न करणें अवश्य आहे.

---

* देशमुख–देशपांड्याच्या पंचायतीस देशकसभा असें म्हणण्याचा प्रघात असे. या सभेचा उल्लेख मागें आलाच आहे.

मोठया जहागिरींत जहागीरदारानें नेमलेले न्यायाधीश असत. त्याची त्या जहागिरींतील पंचायतीवर देखरेख असे.

लहानमोठे जहागीरदार व इनामदार यांना पंचायत भरविण्याचा अधिकार असे. एखाद्या लहान जहागिरदाराविरुद्ध तक्रार आल्यास त्याची चौकशी मोठया मुत्सद्याकडून केली जात असे. परंतु एखाद्या मोठया जहागिरदाराविरुद्ध तक्रार असल्यास त्याची दाद लागत नसे.

पक्षकारातर्फे वकील धंदेवाईक असे नसत. परंतु वादाची माहिती असणारा पक्षकाराचा कारकून अथवा नातेवाईक हे पक्षकारातर्फे हजर राहात असत.

एखादा पक्षकार वादाच्या कामी गैरहजर राहिला तर त्याविरुद्ध त्या त्या वादाचा निकाल केला जात नसे. त्या वादीचा स्नेही, कारकून अगर अन्य कोणी इसम तक्रार करणारा म्हणून उभा केला जात असे.

[ भा. इ. सं. मंडळाचा अहवाल : शके १८३२ मध्ये जोशी वि. पाध्ये हा निवाडा या प्रघातास अनुसरून केल्याचे दिसून येईल. ]

जातिविषयक वादाचे निवाडे जातीच्या लोकांच्या पंचायतीमार्फत होत असत.

येथपावेतों दिलेल्या माहितीवरून मराठी रियासतींत व तिच्या समाप्तीच्या काळात महाराष्ट्र देशांत न्याय देणाऱ्या संस्था व न्यायदानपद्धति कोणत्या प्रकारच्या अस्तित्वांत होत्या, याची यथातथ्य कल्पना वाचकास येईल. याशिवाय इंग्रज राजकर्त्यांनी याविषयींची साधार माहिती अन्य पद्धतीनें मिळविण्याचा प्रयत्न केल्याचें दिसून येतें.

इंग्रजी राज्याच्या स्थापनेच्या प्रारंभिच्या काळांत मुंबईच्या गव्हर्नरनें मि. चॉपलिन या नावाच्या एका अधिकाऱ्याची दक्षिणेंतील बाजीराव पेशवे यांचेकडून जिंकलेल्या मुलुखाविषयींची माहिती मिळवून त्याविषयींचा अहवाल तयार करणेकरितां नेमणूक केली.

मि. चॉपलिन साहेबांनी याविषयींचा तयार केलेला अहवाल छापील ग्रंथरूपानें प्रस्तुत उपलब्ध आहे. पेशव्यांकडून जिंकलेल्या मुलुखाच्या व्यवस्थेकरितां गोरे जिल्हाधिकारी नेमण्यांत आले होते मराठी राजवटींतील न्यायदानपद्धति, आहे त्या स्वरूपांत कायम ठेवावी अथवा ती नष्ट करून त्या ठिकाणीं इंग्रजी पद्धतीची न्यायदानपद्धति प्रस्थापित करावी, अशाविषयीं अभिप्राय मि. चॉपलिन यांनी मागविले. अभिप्राय देणाऱ्या या गोऱ्या जिल्हाधिकाऱ्यांपैकीं कांहींनी मराठी राजवटींतील न्यायदानपद्धति कायम ठेवावी असा अभिप्राय दिला. लोकांच्या ओंगवळणी पडलेली न्यायदानपद्धति कायम ठेवणें केव्हांहि श्रेयस्कर होय व ती कायम ठेविल्यानें नुकत्याच जिंकलेल्या प्रदेशांतील प्रजेचीं मनें अकारण दुरावली जाणार नाहींत ही दोन कारणें मुख्यत्वेंकरून वरील अभिप्राय व्यक्त करण्यास कारणीभूत झाल्याचें दिसतें. हा अभिप्राय कांही जिल्हाधिकाऱ्यांनीं जसा दिला तसा कांहीं अधिकाऱ्यांनी मराठी राजवटींतील न्यायदानपद्धति नाहींशी करून टाकून त्या ठिकाणीं प्रस्तुत ज्या

प्रकारची न्यायालयें अस्तित्वांत आहेत, तशा प्रकारचीं न्यायालयें स्थापन करण्यात यावी व इंग्लंडांतील कायद्याप्रमाणें नवीन कायदे तयार करून त्या कायद्यान्वयें प्रजेतील वादांचे निवाडे करण्याची पद्धत सुरू करण्यांत यावी, असा अभिप्राय व्यक्त केला. अखेर इंग्रजी राज्यकर्त्यांनीं हा अभिप्राय मान्य करून त्यास अनुसरून प्रजेतील वादांचा निवाडा करण्याकरितां नवीन कायदे मंजूर करून नवीन प्रकारचीं न्यायालयें अस्तित्वांत आणण्याचें ठरविलें. या प्रकारचें धोरण जें ठरविण्यांत आलें, त्यास दुसरें एक बलवत्तर कारण त्या काळीं अस्तित्वांत होतें. तें असें:—

इंग्रजी राजधानी स्थापना झाल्यानंतर ज्या ज्या बाबतींत विशिष्ट प्रकारची व्यवस्था करण्याचा अधिकार लोकांच्या हातीं होता, त्या त्या बाबतींत लोकांच्या हातांतील तो अधिकार काढून घेऊन इंग्रज अधिकाऱ्यांचे हातात तो आणावयाचा, असें धोरण होतें. या धोरणाचा हेतु प्रजेस पंगु करावयाचें हा होता व या हेतूस अनुसरून मराठी राजवटींतील न्यायदानपद्धति नष्ट करणें हें इंग्रजी राज्याच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनें केव्हांहि श्रेयस्कर होतें. याशिवाय दुसरें एक महत्त्वाचें कारण, वरील योजना अस्तित्वांत आणण्यास कारणीभूत झालें असलें पाहिजे. इंग्रजांनीं आपली राजकीय सत्ता प्रस्थापित केल्यावर त्यांचें राज्ययंत्र हांकण्यास लागणारा खर्च प्रजेकडून त्यांना काढावयाचा होता. राज्ययंत्र चालविण्याकरितां दहा हजार कोसांवरून हिंदुस्थानांत येणारे गोरे वरिष्ठ अधिकारी व एतद्देशीय कनिष्ठ वर्गाचे हिंदी अधिकारी यांना द्यावा लागणारा तनखा भागविण्याकरितां बरेंच द्रव्य खर्च करणें प्राप्त होतें. हा सर्व खर्च कोर्ट-फी स्टँपाच्या रूपानें प्रजेकडून वसूल करावयाचा असें इंग्रज राज्यकर्त्यांनीं ठरविलें व कोर्ट-फी स्टँप रूपानें हा खर्च वसूल करण्याची पद्धति इंग्रज राज्यकर्त्यांनी अस्तित्वात आणली.

इ. स. १८१८ सालांत मराठी राज्य लयास गेल्यानंतर नऊ वर्षांच्या अवधींत वर दर्शविल्याप्रमाणें या विषयासंबंधाची चौकशी, पूसतपास व विचारविनिमय करून इ. स. १८२७ सालात पेशव्यांपासून जिंकलेल्या मुलखाच्या व्यवस्थेकरिता कित्येक कायदे, ज्यांना '१८२७ चे रेग्युलेशन्स' असें म्हणतात ते, मुंबईचे गव्हर्नर व त्याचें कौन्सिल यांनीं मंजूर करून त्याचा अंमल या प्रदेशात सुरू केला.

अशा रीतीनें मंजूर केलेल्या रेग्युलेशनच्या स्वरूपावरून अनेक विषयांसंबंधीं नूतन पद्धति कायद्याच्या रूपानें महाराष्ट्रांत कशा निर्माण झाल्या हें वाचकास दिसून येईल. वकील, वकीलवर्ग व वकिलीचा धंदा यासंबंधाचीं कलमें या रेग्युलेशनमध्यें समाविष्ट करण्यात आलीं. अशा रीतीनें स्थापित करण्यात आलेलीं न्यायालयें व तीं चालविणारे न्यायाधीश यांचें न्यायदानाचें काम सुकर व्हावें, एतदर्थ वकील वर्ग अस्तित्वात आला, हें उघड आहे.

इंग्रजी राज्यसत्तेच्या स्थापनेनंतर इंग्रजी कायद्यान्वयें जीं न्यायालयें मुंबई इलाख्यात स्थापन करण्यात आलीं, प्रजेतील वादांचे निवाडे करण्याकरितां जे न्यायाधीश नेमण्यात येऊं लागले व या न्यायालयात केल्या जाणाऱ्या कामाकरितां जे

दुय्यम दर्जाचे नोकर ठेवण्यात येऊं लागले, त्याविषयींची ब्रिटिश राजवटीच्या सुरुवातीपासून सन १८६१ पर्यंतची ( या सालीं मुंबई सिव्हिल कोर्ट्स ॲक्ट नं. १४ अंमलांत आला ) स्थूल माहिती या भागात आम्ही देत आहों. सन १८२७ च्या २ न्या रेग्युलेशनमध्ये वकिलांचे संबंधानें जशीं कलमें समाविष्ट करण्यात आलीं आहेत, त्याप्रमाणें त्यात न्यायाधिशाच्या बाबतींतहि युक्त कलमें समाविष्ट करण्यात आलीं आहेत. १८२७ च्या २ न्या रेग्युलेशननंतर न्यायाधिशासंबंधाचे इंग्रज राजकर्त्यांनीं आणखी अन्य कायदे मंजूर करून अंमलात आणले. या कायद्यान्वयें नेमल्या जाणाऱ्या न्यायाधिशाच्या नेमणुकीच्या पद्धतींचा व त्याच्यापुढें येणाऱ्या वादाच्या निर्णयाच्या पद्धतीचा विकास कसा होत गेला व कोणकोणते फेरफार होत गेले याचें सुरुवातीसच दिग्दर्शन करणें अगत्याचें आहे. या दिग्दर्शनाचें मर्म लक्षात येण्यास्तव इंग्रजी राज्याची स्थापना होण्यापूर्वीची मराठयाच्या राज्यातील न्यायदान संस्था व न्यायदानपद्धति याविषयींची माहिती मागील भागांत दिली आहे. या माहितीच्या परिशीलनानें इंग्रजांनीं सुरू केलेल्या न्यायदानपद्धतींत झालेला विकास व फेरफार याचें मर्म वाचकाचे लक्षात सहज रीतीनें येईल.

## इंग्रजी राज्याच्या सुरुवातीस इंग्रजांनीं महाराष्ट्रांत स्थापन केलेल्या न्याय देणाऱ्या संस्थांचें स्वरूप

( संशोधक : वर्ष ४ थें, अंक ३ रा )

इंग्रजी राज्य महाराष्ट्रात स्थापन होण्यापूर्वी स्वराज्याच्या काळात हल्लीं जशीं प्रत्येक तालुक्याच्या ठिकाणीं दिवाणी कोर्टें व्यवहारनिर्णय करण्याकरिता इंग्रजांनीं निर्माण केलीं आहेत तशा प्रकारचीं कोर्टें अस्तित्वात नव्हतीं. मागें दर्शविल्याप्रमाणें इंग्रज राज्यकर्त्यांनीं निरनिराळ्या तालुक्याच्या ठिकाणीं दिवाणी कोर्टांची स्थापना केली व न्यायदान करण्याकरितां न्यायाधीश अधिकाऱ्याच्या नेमणुका केल्या.

पूर्वींच्या न्यायदान संस्थाचा देखावा कायम ठेवणें इष्ट वाटल्यामुळें व न्याय देण्याकरिता नेमलेल्या इंग्रज अधिका यांना मराठी भाषा येत नसल्यानें योग्य प्रकारें न्याय त्यांचेकडून होण्याचा संभव नसल्यामुळें, इंग्रजांना व्यवहारनिर्णय करणाऱ्या मराठ्याच्या काळच्या जुन्या व त्यांनीं सुरू केलेल्या नव्या संस्था यांच्या दरम्यानचा एक तडजोडीचा मार्ग टरवून त्याप्रमाणें व्यवहारनिर्णयाचे बाबतींत कांहीं दिवस एक विशिष्ट योजना अमलात आणणें भाग पडलें. या योजनेच्या स्वरूपाचें आम्ही येथें दिग्दर्शन करितों. इ. स. १८३० मध्यें खानदेश जिल्ह्याच्या कलेक्टरास दिवाणी व फौजदारी अशा दोन्ही स्वरूपाच्या व्यवहाराचा निर्णय करण्याचा अधिकार होता, कोणत्याहि व्यवहाराबद्दल कलेक्टरकडे फिर्याद दाखल झाली म्हणजे त्या व्यवहाराचा निर्णय पंचामार्फत करण्याची पक्षकाराची इच्छा आहे कीं काय

याचा खुलासा प्रथम पक्षकाराकडून करून घेण्यात येत असे व्यवहाराचा निर्णय पंचांनी करावा अशी उभय पक्षकारांनी आपली इच्छा दर्शविल्यास प्रत्येक पक्षकारास त्यांच्यातर्फे पंच म्हणून ज्या गृहस्थांची नेमणूक करण्याची त्यांची इच्छा असेल त्यांची नांवें पक्षकार लिहून देत असत याप्रमाणे पंचांची नांवें लिहून दिल्यावर कलेक्टर त्या लोकांस पंचायतीस बसण्याकरितां आपल्या सहीनें बोलावणें करीत असे. अमुक रोजी पंचायतीत बसण्याकरितां यावें असें पंचांस लेखी कळविण्यांत येत असे उभयतां पक्षकारांकडून त्यास पसंत असलेल्या पांचसहा पंचांचीं नांवें प्रथम घेऊन त्या सर्वांना पंचायतींत बसण्याकरितां बोलावणें करण्यांत येत असे सर्व पंच हजर झाल्यानंतर पक्षकारांच्या परस्परांच्या पंचांस हरकती असल्यास अथवा पंचायतीं बसण्याचें एखाद्या पंचास गैरसोईचें असल्यास त्याची हरकत ऐकून घेऊन नंतर सरकार तर्फे एक पंच व उभयतां वादी प्रति वादी तर्फे प्रत्येकी दोन दोन पंच कायम करण्यांत येत अशा रीतीनें पांच पंच कायम झाले म्हणजे त्या व्यवहाराच्या निर्णयाचें काम त्यांचेकडे सोंपविण्यात येत असे

इंग्रजांचें राज्य महाराष्ट्रांत स्थापन झाल्यावर सन १८२७ सालांत मुंबईचे गव्हर्नर व त्यांचें कौन्सिल यांनी वेळोवेळीं जरूर त्या बाबींसंबंधीं रेग्युलेशन्स करावे अशा प्रकारचा अधिकार देणारा एक रेग्युलेशन पास करण्यांत आला व त्यानंतर निरनिराळ्या बाबींसंबंधीं अनेक रेग्युलेशन्स् त्याच सालांत पास करण्यांत आले सन १८२७ चा चवथा (४) हा रेग्युलेशन दिवाणी दाव्यांच्या निकालाकरितां निर्माण करण्यात आलेल्या संस्थांबाबत आहे या रेग्युलेशनच्या कलम १, १६, २७, २८ व ३७ अन्वयें सुप्रीम कोर्ट अगर सदर अदालत म्हणजे हल्लीं ज्या संस्थेचें मुंबई हायकोर्टांत रूपांतर झालें आहे ती संस्था, प्रत्येक जिल्ह्याकरितां अदालत अगर जिल्हाकोर्ट व त्या कोर्टाचें काम करण्याकरितां जिल्हा जज्ज, जिल्हा जज्जांच्या अभावीं ॲक्टिंग जज्ज अथवा असिस्टंट जज्ज, फर्स्ट अथवा सेकंड क्लास जज्ज आणि नेटिव्ह कमिशनर्स हे न्याय करणारे अधिकारी नेमण्यात यावे असें ठरविण्यात आलें या रेग्युलेशनच्या ३७ व्या कलमाअन्वयें प्रत्येक जिल्ह्याकरिता दिवाणी दाव्यांचा निवाडा करण्याकरिता वाटल्यास नेटिव्ह कमिशनर नेमण्यांत यावे असें ठरविण्यात आलें कमिशनरची निवड जिल्हा जज्जानें करावयाची व सदर दिवाणी अदालतीनें जिल्हा जज्जानें पसंत केलेल्या गृहस्थास कमिशन द्यावयाचें असें कलम ३८ अन्वयें ठरविण्यात आलें इंग्रजी राज्याची स्थापना नुकतीच झाली होती इंग्रज जज्जांना मराठी भाषा न समजल्यामुळें साक्षीदार काय सांगतात हें समजण्याची फार अडचण भासत असे याशिवाय एतद्देशीय लोकांच्या रीतरिवाजाची इंग्रज जज्जांना माहिती नसे अशा परिस्थितींत न्याय देणाऱ्या इंग्रजी अधिकाऱ्यांना न्याय करण्याचें काम अर्थात् बरेंच कठीण जात असे याशिवाय इंग्रजांनीं जो महाराष्ट्र देश जिंकून आपल्या सत्तेखालीं आणला होता त्या देशांतील अस्तित्वांत असलेल्या न्याय देणाऱ्या संस्था अगदीं निराळ्या स्वरूपाच्या असून

प्रजेपैकी दोघां इसमांत वाद उपस्थित झाल्यास त्या वादाचा निकाल होता होईल तों पंचायतीकडून करून घ्यावयाचा असा दंडक या प्रदेशात अस्तित्वात होता. यामुळें ही पद्धत एकदम बंद करून नवीन पद्धत एकदम अंमलात आणल्यास लोकानाहि ती न रुचता त्याचा असंतोष व्हावयाचा. हा असंतोष होता होईल तों टाळणें इंग्रजी राज्याचे सुरुवातीस त्यांना इष्ट होतें. या सर्व गोष्टी लक्षात घेऊन महाराष्ट्र देश पादाक्रांत करणाऱ्या धूर्त इंग्रजांनीं या रेग्युलेशनमध्यें खालील स्वरूपाचें एक कलम घालून मागें दर्शविलेल्या सर्व अडचणींतून मार्ग काढला. या कलमाचा थोडक्यात सारांश असा आहे :—

" ज्या कोर्टात न्याय देणारा अधिकारी युरोपियन असेल त्यानें एतद्देशीय सभ्य गृहस्थांची पंचायत नेमून न्याय करण्याचे कामीं त्यांची मदत घ्यावी. ही मदत खालील पद्धतीनें घ्यावी.

पहिली बाब—सर्व दावा अगर त्या दाव्यातील एखादा मुद्दा अगर सर्व मुद्दे पंचायतीकडे निकालाकरिता सोंपवावे. या पंचायतीनें दाव्याची चौकशी स्वतंत्र रीतीनें करावी आणि पंचायत जो कांहीं निकाल करील तो कोर्टास कळवावा. पंचायतीकडे खटला निकालाकरितां पाठविण्याचा हुकूम आणि पंचायतीनें केलेला निवाडा हे लेखी असले पाहिजेत व ते कोर्टाच्या दप्तरीं दाखल करण्यांत यावेत.

दुसरी बाब—एतद्देशीय दोन अगर त्याहून अधिक गृहस्थास सल्लागार म्हणून सभासद या नात्यानें मदतीस घ्यावे साक्षीदाराच्या जबान्या घेते वेळीं या गृहस्थांच्या ज्ञानाचा विशेषेंकरून फायदा व्हावा म्हणून याप्रकारें तजवीज करावी. प्रत्येक सल्लागाराचें मत स्वतंत्र नमूद करण्यात येऊन त्याची स्वतंत्र चर्चा करण्यात यावी सल्लागाराची इच्छा असल्यास अगर न्यायाधिशास वाटल्यास खटल्यात सल्लागारांचीं मतें नमूद करून ठेवण्यात यावीत.

तिसरी बाब—एतद्देशीय सभ्य गृहस्थांची जूरीच्या धर्तीवर नेमणूक करावी. दाव्याची चौकशी सुरू असतां या लोकांनीं कोर्टात हजर राहावें व ज्या मुद्यांची चौकशी व्हावी असें त्यांना इष्ट वाटेल ते मुद्दे त्यांनीं सुचवावे आणि दाव्याच्या निकालाकरिता जरूर ती माहिती शक्य तितका प्रयत्न करून पक्षकाराची हरकत नसल्यास मिळवावी आणि परस्परांच्या मताची चर्चा करून आपलें मत कळवावें.

चवथी बाब—वरील तीन बाबींत नमूद केलेल्या पद्धतींपैकीं कोणत्याहि पद्धतीचा अवलंब करण्यात आला तरी न्याय देण्याकरिता नेमण्यात आलेल्या अधिकाऱ्याचे हातात त्या दाव्याचा निकाल करण्याचा अधिकार सर्वस्वी आहे, हें स्पष्टपणें समजण्यात यावें.

वरील रेग्युलेशनचें हें महत्वाचें कलम महाराष्ट्राचें स्वातंत्र्य हिरावून घेणाऱ्या पूर्वकालीन इंग्रजांना पसंत असलेल्या न्यायदान पद्धतीचा व मराठी राज्यात अस्तित्वांत असलेल्या न्यायदानाच्या पूर्व पद्धतीचा एक प्रकारचा दुवा आहे असें म्हटलें तरी चालेल. सन १८२७ च्या तिसाच्या रेग्युलेशनअन्वयें खानदेश जिल्ह्यास सन

१८२७ चा चवथा हा रेग्युलेशन लागू करण्यांत आला व त्याप्रमाणें खानदेशांत न्यायदान देणाऱ्या संस्था अस्तित्वांत येऊन न्याय करणाऱ्या अधिकाऱ्यांना नेमणुका होऊं लागल्या.

आतांपावेतों इंग्रजी राज्याचे सुरवातीस न्याय देणाऱ्या संस्थांविषयी जी माहिती नमूद केली ती * बेहमाच्या निम्मा दिव्याबद्दल रु. (७००) सातशे मिळावे अशी पार्वतीबाई कोम शिवाजी यादकराम कुळकर्णी मौजे सोमपूर परगणे पिंपळ, इची गोपाळ शिवाजी तळिवणकर निसबत देशमूख याचेवर फिर्याद होती ती विषयींची आहे.

या फिर्यादींतील एक पहिला कागद वादी पार्वतीबाई तर्फे लक्ष्मणराव परगणे सुलतानपूर यांस पंच मुकरर केले आहे तरी तुम्ही कचेरीत हजर राहून सदरहू पंचायतींत यसत जावें असा ता. २९ आक्टोबर सन १८३१ इसवीचा हुकूम आहे. या कागदावर " श्री कलेक्टर सुमा खान्देश " असा शिक्का आहे. याच तारखेच्या दुसऱ्या लेखांत सरकारतर्फे नेमण्यांत आलेला पंच व वादी प्रा वादी तर्फे नेमण्यात आलेले पंच नमूद केलेले आहेत. वादीकडील पंच महिपत मनसाराम गुमास्ते देशमूख परगणे लळिंग व दाजी शिवाजी कुळकर्णी कसबे सोनगीर व प्रा वादीकडील पंच सदाशिवदास देसाई परगणे नंदुरबार व श्रावणदास देसाई परगणे भामेर हे असल्याचें नमूद आहे. पहिल्या कागदांतील गृहस्थास पंच नेमण्यात आलें नाहीं, हें यावरून उघड आहे. हल्लीं ज्याप्रमाणें फौजदारी खटल्यात सेशन कोर्टाकडून परेच गृहस्थास असेसर्स म्हणून हजर राहण्याविषयी समन्स काढण्यात येतात व ते हजर झाल्यावर त्यांपैकीं जरूर तितक्या लोकांची नेमणूक करून बाकीच्या लोकांस जगी रजा देण्यांत येते त्याप्रमाणें अगर पंच या नात्यानें काम करण्यास लक्ष्मणराव यांची कांहीं अडचण असल्याकारणानें पंच म्हणून नेमणूक करण्यात न येता वादीतर्फे दुसऱ्या पंचाची नेमणूक करण्यात आल्याचें दिसतें. सन १८२७ च्या चवथ्या अ रेग्युलेशनच्या पहिल्या पोट कलमाअन्वयें या दाव्याच्या निकालाच्या बाबतींत जज्जानें हुकूम केल्याचें दिसतें. प्रस्तुत अमलात असलेल्या सिव्हिल प्रोसीजरमध्यें कोणत्याहि दाव्याचा निकाल करण्याकरिता दावा कोर्टात चालू असतां पंचाची नेमणूक करून त्याचेकडून त्या दाव्याचा निकाल करवून घेण्यात यावा अशी सवलत पक्षकारास देण्यात आली आहे. या कलमांत व सन १८२७ च्या चवथ्या रे च्या रेग्युलेशनच्या २४ व्या कलमाच्या पहिल्या पोट कलमात दोन महत्वाचे फरक आहेत ते लक्षात ठेवण्यासारखे आहेत. प्रस्तुत अमलात असलेल्या कायद्यान्वयें पंचाची नेमणूक पक्षकारानीं आपखुषीनें कोर्टास जाहीर केल्यास त्या दाव्याच्या निकालाचें काम पंचाकडे सोपविण्यात येतें. सत्ताविसच्या रेग्युलेशन अन्वयें पंचाकडे

* सन १८३१ सालच्या उपलब्ध झालेल्या एका इतिहास साधनाच्या आधारें दिली आहे.

वाद निवाड्याकरिता सोपविणें हें न्याय देणारा अधिकारी युरोपियन असल्यास व दाव्याचा निवाडा करण्याकरिता पंच नेमावे असें त्यास वाटल्यास पंचाकडे दाव्याच्या निवाड्याचें काम सोपविण्याचा त्यास अधिकार देण्यात आला होता. याशिवाय दुसरा महत्त्वाचा फरक म्हटला म्हणजे सत्ताविसाव्या रेग्युलेशन अन्वयें नेमलेल्या पंचायतींनें केलेल्या निवाड्याप्रमाणें निकाल करणे अगर न करणें हें न्याय देणाऱ्या अधिकाऱ्याचे मर्जीवर ठेवण्यात आलें होतें. प्रस्तुतच्या कायद्याप्रमाणें पंच जो निवाडा देतील त्याप्रमाणें, पंचांनीं निवाडा करण्याचे कामीं पक्षपात केला आहे अशी अगर याच प्रकारच्या दुसऱ्या रकमारी पक्षकारांनीं शाबीत केल्यास त्याचा निवाडा अमान्य करण्याचा अधिकार कोर्टास ठेविला आहे, परंतु या गोष्टी शाबित न झाल्यास पंचाच्या निवाड्याप्रमाणें कोर्टानें दाव्याचा निकाल केला पाहिजे. इंग्रजी राज्याचे सुरुवातीस मराठी राज्यातील न्याय देणाऱ्या संस्था कशा रीतीनें नष्ट करण्यांत आल्या व त्या ठिकाणीं प्रस्तुत काळीं अस्तित्वात असलेलीं कोर्टें इंग्रजांनीं कशा रीतीनें स्थापित केलीं या स्थित्यंतराचा इतिहास या स्वरूपाचा आहे.

न्यायदानसंस्था व न्यायदानपद्धति यात इ स. १८१८ सालापासून इंग्रजांनीं वेळोवेळीं केलेल्या कायद्यामुळें कसकसा विकास व फेरफार होत गेला हें आतापर्यंत केलेल्या विवेचनावरून स्पष्ट झालें आहे पाश्चात्य शिक्षणाचा प्रसार होऊन कायद्याचा अभ्यास करणारे व कायद्याच्या परीक्षेत उत्तीर्ण होणारे कित्येक तरुण महाराष्ट्रात निर्माण होऊं लागले. असल्या लोकाना मराठी भाषेचें व महाराष्ट्रांतील लोकांच्या चालीरीतींचें इंग्रज अधिकाऱ्यासारखें अज्ञान नसल्यामुळें न्यायाधिकारी या नात्यानें त्यांच्या नेमणुकी करण्याची परिस्थिति उत्पन्न झाली, हें लक्षात घेऊन न्यायदानसंस्था व न्यायदानपद्धति यांच्या संबंधानें सन १८१८ पासून वेळोवेळीं केलेले कायदे इंग्रज राज्यकर्त्यांनीं रद्द करून न्यायालयासंबंधाचा [ दिवाणी कोर्टासंबंधाचा ] इ. स. १८६९ चा १४ वा कायदा मंजूर करून अमलात आणला. प्रस्तुत महाराष्ट्र देशात जीं दिवाणी कोर्टें व न्यायदानपद्धति अस्तित्वात आहे, तिचा आरंभ या कायद्यापासून झाला व तेव्हांपासून आजतागायत प्रस्तुतची पद्धत अस्तित्वात असून चालू आहे.

---

## प्रकरण ६ वें

# इंग्रजी राजवटींतील न्यायदानसंस्था व न्यायदानपद्धति १८६९ ते १९४८

## [ उत्तरार्ध ]

चार वर्षांपूर्वी जिल्हा कोर्टांत आम्ही वकिलीचा धंदा करण्याकरितां म्हणून, दाखल झालों, त्या कालीं मुंबई इलाख्यातील निरनिराळ्या तालुक्यांच्या व जिल्ह्यांच्या ठिकाणीं ज्या प्रकारचीं न्यायालयें ( दिवाणी कोर्टें ) व न्यायाधिकारी अस्तित्वांत होते, त्याच प्रकारचे आजतागायत अस्तित्वांत आहेत सन १८६९ च्या १४ व्या कायद्यान्वयें हीं न्यायालयें अस्तित्वांत आलीं, हें मागील भागात नमूद केलेंच आहे मुंबई इलाख्यात जितके तालुके आहेत, त्या प्रत्येक तालुक्यात न्यायालय ( दिवाणी कोर्ट ) व न्यायाधिकारी असतो, असें नाहीं एका तालुक्याचें दिवाणी काम म्हणण्या सारखें नसलें तर दोन तालुक्यांमिळून एक न्यायाधीश नेमण्याची वहिवाट आहे अशा कोर्टास Link Court असें म्हणतात. या कोर्टांत दिवाणी दाव्यांचा निवाडा देण्यासाठीं जो न्यायाधीश नेमण्यांत येतो, त्यास सेकंड क्लास सबजज्ज (दुसऱ्या वर्गाचा न्यायाधीश ) ही संज्ञा आहे प्रस्तुत सिव्हिल कोर्टस ॲक्टमध्यें झालेल्या दुरुस्तीनुसार सिव्हिल जज्ज ज्यूनिअर डिव्हिजन, ही संज्ञा त्याला दिली गेली आहे या प्रकारच्या न्यायाधिशास ज्या दाव्यातील विषयाची किंमत पांच हजाराहून अधिक नाहीं, त्या वादाची चौकशी करुन निवाडा करण्याचा अधिकार देण्यात आलेला असतो जिल्ह्याच्या शहरीं फर्स्ट क्लास सबजज्ज ( प्रस्तुत सिव्हिल जज्ज सीनियर डिव्हिजन) या संज्ञेचा न्यायाधीश असतो कोणत्याहि दाव्याच्या विषयाची किंमत कितीहि मोठी असली, तरी त्या दाव्याचा निवाडा करण्याचा अधिकार या न्यायाधिशाला असतो या शिवाय जिल्ह्याच्या ठिकाणीं साधारणपणें वादाच्या विषयाची किंमत पाच हजार रुपयांच्या आत असेल अशा दाव्यांचा निवाडा करण्याकरिता जॉइंट सबजज्ज ( सिव्हिल जज्ज ज्यूनियर डिव्हिजन ) या संज्ञेचा एक न्यायाधीश असतो याशिवाय दिवाणी दाव्याचें काम वाढल्यास ॲडिशनल फर्स्टक्लास सबजज्ज, एक्स्ट्रा जॉइंट सबजज्ज असे न्यायाधिकारी नेमण्यात येतात याशिवाय जिल्हा जज्ज ( District Judge ) या नावाचा अधिकारी जिल्हा कोर्टांत नेमण्यात येतो तालुक्याच्या न्यायाधिकाऱ्यांनीं केलेल्या दिवाणी दाव्याचे निवाड्यावर अपिलें घेण्याचा अधिकार या न्यायाधिशाला असतो अपिलांशिवाय अन्य दिवाणी स्वरूपाचीं कामेंहि त्याचेकडे सोंपविलेली असतात अव्वल फौजदारी खटल्याची चौकशी हाच न्यायाधीश करितो फौजदारी खटल्याचा निवाडा करणारा अधिकारी म्हणून त्याला 'सेशनजज्ज' अशी संज्ञा

आहे. जिल्ह्यांतील फर्स्ट क्लास मॅजिस्ट्रेटला ज्या गुन्ह्यांची चौकशी करण्याचा अधिकार असतो, असे खटले सेशन जज्जाकडे पाठविण्यात येतात, व तो त्याचा निवाडा करितो. फौजदारी खटल्यांचें काम वाढल्यास ॲडिशनल सेशन जज्ज, जॉइंट डिस्ट्रिक्ट जज्ज, असि. सेशन जज्ज इत्यादि न्यायाधिशाची जरूर पडेल ते वेळीं सरकार नेमणूक करितें. याशिवाय जिल्ह्याचे ठिकाणीं डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट या नावाचा फौजदारी खटले चालविणारा एक अधिकारी असतो. त्याशिवाय खून, दरोडा, फंदफितुरी इत्यादि मोठमोठया गुन्ह्याशिवाय अन्य किरकोळ गुन्ह्याची चौकशी करण्याकरिता क्रिमिनल प्रोसीजर कोडान्वयें फर्स्टक्लास, सेकंडक्लास, थर्डक्लास मॅजिस्ट्रेट नेमण्यात येतात. अशा प्रकारें फौजदारी व दिवाणी कोर्टांचें जाळें गेलीं ७० ८० वर्षे अस्तित्वात आहे. दिवाणी व फौजदारी खटल्याच्या निवाड्याकरिता अस्तित्वांत असलेल्या या संस्थान्चा स्वरूपानें स्थूल दिग्दर्शन केल्यावर निवाडा करणाऱ्या न्यायाधिशाविषयीं माहिती देणें ओघानेंच प्राप्त आहे. दिवाणी कोर्टांचे सर्व न्यायाधीश गेल्या ५० वर्षांपासून विश्वविद्यालयांत कायद्याची पदवी संपादन केलेले असतात. यापूर्वीच्या काळात हायकोर्टाच्या वकिलीची परीक्षा मराठींत देऊन पास झालेले असेहि काहीं न्यायाधीश होते. यांनीं मराठींत लिहिलेले वादांचे निवाडे आमच्या पाहण्यात आहेत. त्यावरून हे न्यायाधीश न्यायनिवाड्यांचें काम बऱ्या प्रकारें करीत असें दिसून येतें. सन १९०० सालापूर्वी इंग्रजींत हायकोर्ट वकिलीची परीक्षा पास झालेले असे काहीं फर्स्टक्लास सबजज्ज होते. त्यांपैकीं कित्येकांनीं इंग्रजींत लिहिलेले ठराव इतके उत्कृष्ट असत कीं, मुंबईच्या लॉ कॉलेजच्या एका वार्षिक समारंभाचे प्रसंगीं बॅरिस्टर इनव्हऱ्यारिटी यानें आपल्या अध्यक्षीय भाषणात त्यांची प्रशंसा करून असें म्हटलें आहे कीं, अपील चालविते वेळीं या अधिकाऱ्याच्या ठरावाकडे तुच्छतेनें न पाहाता त्याचा उत्कृष्ट अभ्यास करून मग अपील चालविणाऱ्या वकिलानें त्याच्या ठरावावर हल्ला करावा. या न्यायाधिकाऱ्यांची पिढी थोडक्याच वर्षांत नाहींशी होऊन प्रस्तुत काळीं सर्वच न्यायाधीश बी. ए., एल्एल्. बी. पदवी मिळविलेले आहेत. आम्हीं वकिलीचा धंदा करण्यास ज्या काळीं प्रारंभ केला, त्या काळीं बहुतेक फर्स्टक्लास सबजज्ज ब्राह्मण, कायस्थ प्रभु, गुजराथी व वैश्य वर्गांपैकीं असत. प्रस्तुत या बाबतींत पुष्कळच स्थित्यंतर घडून आलें आहे. आतां न्यायाधिशाच्या जागेवर निरनिराळ्या ज्ञातींचे लोक आढळून येतात. हें स्थित्यंतर निरनिराळ्या ज्ञातींत झालेल्या शिक्षणाच्या प्रसारामुळें घडून आलें आहे. याशिवाय निरनिराळ्या ज्ञातींच्या लोकसंख्येच्या मानानें त्या त्या ज्ञातींतील लोकांना सरकारी नोकरींतील अधिकाऱ्याऱ्या जागा देण्यात याव्या, हें तत्त्व मान्य केलें गेल्यामुळें हें स्थित्यंतर घडून येणें स्वाभाविकच होतें. याप्रमाणें न्यायाधिशाच्या जागेवर काम करणाऱ्या अधिकाऱ्यासंबंधाची प्रस्तुतची परिस्थिति निवेदन केल्यावर वादाचा निर्णय योग्य प्रकारें करण्याच्या कामीं, कोणत्या गुणाची आवश्यकता, निवाडा करणाऱ्या अधिकाऱ्याच्या अंगीं असावी लागते यासंबंधाची अल्प चर्चा करितों.

चौकशी पोलिस अधिकाऱ्याकडून केली जात नाहीं. याप्रमाणें पोलिस अधिकाऱ्याचा रिपोर्ट गेल्यावर हायकोर्टातील न्यायाधिशाकडून अर्जदारास या भेटींत न्यायाधीश त्याच्याविषयीं विचारपूस करितात, व त्याचा पोशाख पाहून मनावर होणाऱ्या अनुकूल किंवा प्रतिकूल ग्रहानुसार त्यास पसंत केलें जातें. ही जी पद्धत प्रस्तुत अस्तित्वांत आहे, तिच्या योगानें वरील वचनांत दर्शविल्याप्रकारचे गुण अर्जदाराचे अंगीं आहेत कीं नाहींत हें निश्चितपणें समजूत येणें कठीण होतें.

आमच्या चार तपाच्या वकिलीच्या काळांत सेकंड क्लास सबजज्ज, फर्स्टक्लास सबजज्ज, डिस्ट्रिक्ट व सेशन जज्ज, ॲडिशनल सेशनजज्ज या हुद्यावरचे अधिकारी जवळ जवळ १५० ते २०० होऊन गेले या अधिकाऱ्यांचे दोन वर्ग पडतात. एक वर्ग म्हणजे इंग्रज व हिंदी इंडियन सिव्हिल सर्व्हिस परीक्षा पास झालेला व दुसरा वर्ग मुंबई विश्वविद्यालयाची पदवी घेतलेला फर्स्ट, सेकंड क्लास सबजज्ज, डिस्ट्रिक्ट व सेशनजज्ज इत्यादि पद धारण करणारे हिंदी पदवीधर. त्याना कायद्याचें ज्ञान उत्तम प्रकारचें असल्याकारणानें वादाचा निर्णय करण्याची लायकी त्यांच्या अंगीं चांगल्या प्रकारें असल्याचें आढळून आलें. अशा प्रकारची लायकी नसलेले दोन तीन अधिकारीच गेल्या ४८ वर्षांत आम्हास आढळून आले.

डिस्ट्रिक्ट जज्ज, सेशन जज्ज, असि. जज्ज आणि ॲडि. सेशनजज्ज या पदावर असणाऱ्या हिंदी पदवीधरांपैकीं सर्वच वादाचा निवाडा करण्याच्या दृष्टीनें श्रेष्ठ प्रतीच्या लायकीचे असे आढळले परंतु कायद्याचा अभ्यास न केलेले व I. C. S. ची परीक्षा पास झालेले जे हिंदी व गोरे न्यायाधीश असत त्यांच्या ठिकाणीं दिवाणी दाव्याचा निवाडा करण्याची लायकी फार कमी प्रमाणांत असल्याचें आढळलें. या जागावरील न्यायाधीश फौजदारी खटल्याचे निवाडे बऱ्या प्रकारें करीत. I C. S. ची परीक्षा पास झाल्यावर त्याची असि. कलेक्टरच्या जागेवर प्रथम नेमणूक करण्यांत येत असे व या हुद्यावरून रेव्हेन्यू व अन्य खात्याचें काम करीत असतां फौजदारी खटल्याचे निवाडे करण्याचें काम मॅजिस्ट्रेट या नात्यानें, त्याला तीन चार वर्षे करावें लागे. या काळांत फौजदारी खटल्याशीं संबंध असलेल्या इं. पिनल कोड व क्रि. प्रो. कोड या दोन कायद्यांतील कलमाचा पूर्ण परिचय त्यास होत असे व यामुळें या खटल्याचे निवाडे करण्याची पात्रता त्यास येत असे. अंमलबजावणी खात्यांत काम करण्यास जो कोणी असि. कलेक्टर सरकारच्या पसंतीस पडत नसे त्याची उचलबांगडी करून त्याला दिवाणी खात्यांत घालण्याचा प्रघात होता. या प्रघातास अनुसरून असि. कलेक्टरची नेमणूक असि. जज्ज म्हणून होई व त्यानंतर क्रमाक्रमानें असि. जज्ज, जॉइंट सेशन जज्ज, ॲडि. डिस्ट्रिक्ट जज्ज, सेशन जज्ज आणि शेवटीं डिस्ट्रिक्ट व सेशन जज्ज या पदावर त्याची नेमणूक होत असे. या पदावर काम करीत असतांना कायद्याचा अभ्यास केला नसल्यानें दिवाणी दाव्यांचे निवाडे करण्याचें काम करण्याच्या पात्रतेचा त्याच्या ठिकाणीं पूर्ण अभाव असे. तरी नर्मदेंतील दगड पाण्याच्या प्रवाहांत घोळले जाऊन जसे गुळगुळीत बनतात, त्याच-

प्रमाणें दिवाणी दाव्याचे निवाडे करण्याचें काम करण्यास लागणाऱ्या कायद्याचें ज्ञान अशा लोकांना क्रमाक्रमानें प्राप्त होत असे. अशा प्रकारच्या अधिकाऱ्यांपैकीं एकाद्या इंग्रज I. C. S. ची नेमणूक असि. सेशन जज्जाच्या जागेवर करण्यांत आल्यावर त्याचा शिरस्तेदार म्हणून एखादा हुशार व कायद्याची परीक्षा उत्तीर्ण झालेल्या हिंदी इसमाची नेमणूक करण्याचा प्रघात होता. या शिरस्तेदारास शिरस्तेदार म्हणून काम करावें लागून शिवाय जज्जाचा कायद्याचा शिक्षक म्हणूनहि काम करावें लागत असे एकदां एका इंग्रज I C S असि. कलेक्टरची असि जज्ज म्हणून नेमणूक झाली त्याचेकडे कांहीं दिवाणी अपिलें निवाडा करण्याकरितां सोंपविण्यांत आलीं. त्यापैकीं एक अपील प्रथमदर्शनी चौकशीकरितां त्याचेकडे लावण्यात आलें. साहेबाला प्रिलिमिनरी हिअरिंग आणि फायनल हिअरिंग या अपिलाच्या चौकशीचा प्रकार माहीत नव्हता. प्राथमिक चौकशीकरितां नेमलेल्या त्या अपिलांत अपेलंटच्या वकिलाची तक्रार ऐकून घेतल्यावर जज्ज साहेबांनीं ठराव लिहून त्यांत कनिष्ठ कोर्टाचा ठराव मी कायम करितों, असें नमूद केलें. प्राथमिक चौकशीकरितां अपील नेमलें असल्यानें जाब देणारास नोटिस काढून त्याच्या वकिलाची तक्रार ऐकल्याशिवाय असा हुकूम आपणास करता येत नाहीं. तूर्त अपील मंजूर अगर नामंजूर याविषयीं हुकूम करून अपील मंजूर करणें असल्यास तें मंजूर केलें असून जाब देणारास नोटिस काढण्यांत यावी, असा हुकूम आपण करावयास पाहिजे, असें शिरस्तेदारानें साहेबास सांगितलें. त्यावर साहेबानें पूर्वीचा हुकूम खोडून टाकून अपील मंजूर करण्यांत आलें असून जाब देणारास नोटिस देण्यांत यावी असा नवा हुकूम लिहिला. कित्येक निवाशिक्या इंग्रज जज्जाना त्याची दिवाणी अपिलाचे निवाडे करण्याकरितां नेमणूक झाली असता प्रारंभीं लिमिटेशन ॲक्ट (मुदतीचा कायदा) ची कल्पनाहि नसते. तथापि दिवाणी अपिलाचे निवाडे करण्याचें काम कांहीं वर्षे केल्यानंतर सिव्हिल प्रोसिजर कोड, कॉंट्रॅक्ट, ट्रॅन्स्फर प्रॉपर्टी ॲक्ट, हिंदु लॉ, महामेडन लॉ, इत्यादि कायद्यांशीं त्याचा पूर्ण परिचय होतो असें जरी झालें तथापि कायद्याची पदवी धारण करणाऱ्या न्यायाधिशाची बरोबरी असल्या न्यायाधिशांकडून होऊं शकत नाहीं.

दिवाणी कामाचा निवाडा करण्याकरितां ज्या प्रकारचे न्यायाधीश नेमण्यांत येतात, त्यांचेबाबत येथपर्यंत दिग्दर्शन केलें. आतां फौजदारी गुन्ह्यांची चौकशी व निवाडा करण्याकरितां तालुक्याच्या व जिल्ह्याच्या ठिकाणीं ज्या न्यायाधिशांची नेमणूक प्रस्तुत केली जाते त्याच्या संबंधींचें थोडक्यांत दिग्दर्शन करितों. क्रि. प्रो. कोडान्वयें डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट, सब् डिव्हिजनल मॅजिस्ट्रेट व फर्स्ट, सेकंड आणि थर्ड क्लास मॅजिस्ट्रेट ह्या संज्ञा या न्यायाधिशांना असतात. प्रत्येक तालुक्याच्या ठिकाणीं मामलेदार व अव्वल कारकून यांना फर्स्ट क्लास, सेकंड क्लास किंवा थर्ड क्लास मॅजिस्ट्रेटचे अधिकार देण्यात येतात. मुलकी व इतर खात्यांचीं कामें करून शिवाय फौजदारी खटल्यांचे निवाडे करण्याचें काम यांचेकडे सोंपविण्यांत येतें. या जागांवर त्यांची

नेमणूक होण्यापूर्वी त्यांच्या खात्याची परीक्षा देऊन तींत त्यांना उत्तीर्ण व्हावें लागतें. या परीक्षेच्या प्रश्नपत्रिकांपैकीं एक प्रश्नपत्रिका इं. पि. कोड, क्रि. प्रो. कोड व किरकोळ फौजदारी कायदे या विषयाची असते. त्यामुळें फौजदारी गुन्ह्याचे निवाडे करण्याची लायकी त्यांच्या ठिकाणीं आलेली असते.

दिवाणी व फौजदारी खटल्यांच्या निवाड्याचें यंत्र चालविणाऱ्या प्रमुख अधिकाऱ्यांशिवाय दुय्यम दर्जाचे बरेच अधिकारी या निवाड्यासंबंधाचीं किरकोळ कामें करणारे असतात. पन्नास वर्षांपूर्वी वकिलीच्या धंद्यात प्रवेश करण्याचे सुमारास या दुय्यम दर्जाच्या अधिकाऱ्यात बहुसंख्य ब्राह्मण असत. परंतु प्रस्तुत ही स्थिति पार पालटून जाऊन सर्व ज्ञातींचे लोक या अधिकाऱ्यात प्रविष्ट झाले आहेत. पूर्वी ज्या कचेरीत ५०–६० ब्राह्मण अधिकारी होते, तेथें आतां ५–१० हि आढळून येत नाहींत •

वरिष्ठ दर्जाच्या न्यायाधिशाविषयीं अधिक विवेचन करण्यापूर्वी या कनिष्ठ दर्जाच्या अधिकाऱ्यासंबंधीं जी गोष्ट आमच्या आढळण्यात आली, ती येथें नमूद करितों. पूर्वी असल्या प्रकारच्या बहुतेक अधिकाऱ्यांचीं मोडी अक्षरें चांगल्या प्रकारचीं असत व त्यांची बुद्धिमत्ताहि चांगल्या प्रकारची होती. त्या काळीं दिवाणी कोर्टातील कामासंबंधाचें समन्स, नोटिसा इत्यादींशिवाय छापील फॉर्म फार थोडे असत. सन १८३० सालच्या रत्नागिरी कोर्टाच्या एका दाव्यातील समन्स आमच्या पाहण्यात आहे. तें सर्व कारकुनानें मोडींत लिहिलेलें आहे. मुंबई सरकारनें अलीकडे काहीं वर्षांपूर्वी दिवाणी व रेव्हेन्यू इंग्रज अधिकाऱ्यांच्या सोईकरितां मोडीची हकालपट्टी करून सर्व लिखाण बालबोधींत कनिष्ठ अधिकाऱ्यांनीं करावें, अशी पद्धत सुरू केली आहे. परंतु या पद्धतीचा दुष्परिणाम असा झाला आहे कीं, हे कनिष्ठ अधिकारी बालबोधमध्यें जो मजकूर लिहितात, तो मोडी अक्षरांइतकाच वाचण्यास कठीण जातो. एवंच सरकारचा मूळ हेतु साधण्याचें बाजूलाच राहून ५००–६०० वर्षांपासून अस्तित्वात असलेली मोडी लिपी मृत्युपंथास लागून नष्ट होण्याचा समय प्राप्त झाला आहे. प्रस्तुत दुय्यम दर्जाचे अधिकारी मॅट्रिक अगर स्कूल फायनलची परीक्षा उत्तीर्ण झालेले असतात. परंतु बुद्धिमत्ता व हुशारी या दोन्ही दृष्टींनीं पन्नास वर्षांपूर्वील दुय्यम दर्जाच्या अधिकाऱ्यांशीं त्यांची तुलना करता येणार नाहीं. पक्षकारांचीं जरुरीचीं कामें करण्यास्तव पानसुपारी ( लांच ) घेणें हा पूर्वापार चालत आलेला एक दोष आहे; व त्याचें कधीं काळीं उच्चाटन होईल असें दिसत नाहीं. दुय्यम दर्जाच्या अधिकाऱ्याकडून पक्षकाराचें काम निकडीनें करून घ्यावयाचें असल्यास त्याला दाक्षिणेप्रीत्यर्थ पाच दहा रुपये खर्च करावे लागतात. या पाच दहा रुपयांची वाटणी वकिलाचा कारकून व या कामाशीं संबंध येणाऱ्या कारकुनात होते. दुय्यम सरकारी नोकरांपैकीं दरखास्तीच्या बजावणीचें काम करणारा बेलीफ या नांवाचा जो एक वर्ग आहे, त्याच्या दक्षिणेचें प्रमाण निश्चित असें नसतें. कामाच्या महत्त्वाप्रमाणें ५ रु. पासून १०० रु. पर्यंत तें जाऊं शकतें. तालु-

पक्षाच्या व जिल्ह्याच्या ठिकाणच्या येथील सोकारींशीं कांहींनीं यच्याच किंमतीच्या रपावर मिळकती संपादन केल्याची उदाहरणें आढळतात. मुंबईच्या स्मालकॉज कोर्टांतील वकिलांच्या दक्षिणेचें प्रमाण तालुक्यांतील व जिल्ह्यांतील वकिलांच्या दक्षिणेपेक्षां जवळ जवळ दुप्पट ते चौपट असतें. दक्षिणा घेऊन जी गोष्ट वाजवी करावयाची ती न करतां खोटी गोष्ट करण्याबद्दल या अधिकारी वर्गांपैकीं कांहीं लोक दिक्कत मानीत नाहींत, असें आम्हांस एका महत्त्वाच्या कामांत आढळून आलें. कोर्टांत चाललेल्या एका महत्त्वाच्या खटल्यांत चार दिवसांपूर्वीं निवाडा झालेल्या एका दिवाणी दाव्यांतील अस्सल कागदाच्या सहीशिक्क्याच्या नकला दाखल करण्याकरितां आम्ही घेऊन त्या मुकदम्याच्या कामीं हजर केल्या होत्या. या कागदांत एका महत्त्वाच्या मुद्यासंबंधाचा जो उल्लेख होता, तो मूळ कागदांत नाहीं असें दाखविण्याकरितां प्रतिपक्षाच्या वकिलानें त्याच कागदाच्या नकला कोर्टांतून घेतल्या. आमच्या सहीशिक्क्याच्या नकलांत ज्या महत्त्वाच्या मुद्याचा हेटी उल्लेख होता, तो प्रतिपक्षानें हजर केलेल्या नकलांत अजिबात नव्हता. कोर्टांत दाखल झालेल्या एकाच अस्सल कागदाच्या या दोन प्रकारच्या नकला पाहून न्यायाधिशास स्वाभाविकपणें शंका आली. अस्सल कागद हजर करण्यांत आलेल्या कोणत्या नकलेप्रमाणें आहे याविषयीं खातरी करून घेण्याकरितां न्यायाधिशानें अस्सल कागद मागविले व तपासून पाहतां आमच्या प्रतिपक्षानें हजर केलेल्या सहीशिक्क्याच्या नकलांत महत्त्वाच्या मुद्याचा उल्लेख मुद्दाम गाळण्यांत आला आहे, असें त्याच्या दृष्टोत्पत्तीस आलें. प्रतिपक्षानें लबाडी करून मिळविलेल्या या नकलांपीत्यर्थ दोन–दीडशें रु. दक्षिणा त्यानें दिली असली पाहिजे, हें सांगणें नकोच. हे व असल्या प्रकारचे कांहीं लबाडीचे प्रकार सदा सर्वकाळ सुरू असतात. गरजवंतास अक्कल नाहीं या म्हणीअन्वयें आपला फायदा साध्य करून घेण्याकरितां पक्षकार अशा तऱ्हेनें दक्षिणा देण्यास कमी करीत नाहीं ही गोष्ट लक्षांत घेतां असले प्रकार कधीं काळीं बंद पडतील कीं नाहीं याची शंकाच वाटते.

वरीलप्रमाणें विवेचन केल्यावर श्रेष्ठ दर्जाचे जे न्यायाधीश त्यांच्याविषयीं कांहीं महत्त्वाच्या गोष्टींचा उल्लेख करितों. न्यायाधीश सात्त्विक वृत्तीचा असावा, हें पूर्वीं आम्हीं सांगितलेंच आहे. सात्त्विक माणसाचा स्वभाव शांत असतो. न्यायाधिशाच्या ठिकाणीं हा एक बहुमोल गुण समजला पाहिजे. दाव्याची चौकशी चालली असतां पक्षकार, साक्षीदार अगर वकील यांपैकीं कोणाचेंहि म्हणणें शांत चित्तानें, बोलणारास मध्येंच व्रडथळा न करितां ऐकून घेणें अगत्याचें आहे. या प्रकारचा स्वभाव बहुतेक न्यायाधिशांत आढळून येतो. संतापी, चिडखोर व उगीच वटवट करणारा न्यायाधीश दाव्याचें काम चालवीत असला तर तें काम सरळपणें व शिस्तीनें चालत नाहीं. याशिवाय दुसरा एक महत्त्वाचा दोष न्यायाधिशाच्या ठिकाणीं नसावा, तो म्हणजे स्वतःच्या शहाणपणाची घमेंड म्हणजेच अहंकारी वृत्ति हा होय. निस्पृहपणा व निःपक्षपातीपणा हेहि फार महत्त्वाचे गुण न्यायाधिशाच्या

अशीं असणें जरूर आहे. एखाद्या जिल्ह्याच्या अगर तालुक्याच्या ठिकाणीं न्याया-धिशाच्या जागेवर नेमणूक झाली म्हणजे तो अधिकारी तेथें येतो. तेथें आल्यावर गावांतील कित्येक प्रतिष्ठित लोकांशीं व वकिलांशीं त्याचें संघट्टन सुरू होतें. या संघट्ट-नात वकील वर्गापैकीं कांहीं लोकांविषयीं त्याचप्रमाणें गावांतील अन्य गृहस्थांविषयीं कित्येक गोष्टी त्याच्या कानावर येतात. असल्या गोष्टी त्याच्या कानावर आल्या, तरी त्यानें आपलें मन कलुषित न होऊं देण्याची खबरदारी घेतली पाहिजे. आमच्या या जिल्ह्याच्या शहरीं जॉइंट सबजज्ज या नात्यानें एका गृहस्थाची नेमणूक झाली यांची व आमची विद्यार्थीदशेपासूनची ओळख होती येथें एक विनोदी व कुचेष्टेखोर वकील, डिस्ट्रिक्ट कोर्टांतील शिरस्तेदार व अन्य एक दोन लोक यांचा बैठकीचा एक अड्डा होता. त्यात हे न्यायाधीश सामील झाले. आमचे व आमच्या एक दोन मित्रांचे राजकीय मताच्या बाबतींत वरील विनोदी व कुचेष्टेखोर वकिलाशीं मतभेद असल्यानें त्याच्याशीं बरें नव्हतें. नेहमींच्या बैठकींत झालेल्या बोलण्याचालण्यावरून या न्याया-धिशाचें आम्ही व आमचे स्नेही याच्याविषयीं मन कलुषित झालें. या न्यायाधिशापुढें आमचीं बरींच कामें असल्यानें आम्हांस बराच त्रास सोसावा लागला. त्याची बदली झाल्यावर त्याच्या जागीं आमच्याविषयीं थोडी फार माहिती असणारे व म्हणून आमचेविषयीं बरें मत असणारे दुसरे न्यायाधीश आल्यानें त्या त्रासातून आमची सुटका झाली. वैयक्तिरीतें दर्शविलेल्या गुणापेक्षा सर्वांत श्रेष्ठ प्रतीचा असा जो गुण न्यायाधिशाच्या अंगीं असला पाहिजे तो म्हणजे पक्षकारांकडून त्यांच्यातर्फे निवाडा करण्याकरिता लांच न घेणें हा होय. गेल्या पन्नास वर्षांत डिस्ट्रिक्ट व सेशनजज्ज या हुद्यावर आलेल्या हिंदी व इंग्रज अधिकाऱ्यांपैकीं लांच घेणारा एकहि अधिकारी आमचे आढळण्यात आला नाहीं. फर्स्ट क्लास सबजज्जाचे हुद्यावर नेमण्यात आलेल्या अधिकाऱ्यांपैकीं कांहीं अधिकारी लांच घेणारे आढळले. लांच खाऊन दोन तीन लाख रुपये किंमतीची मिळकत असल्या एका अधिकाऱ्यानें संपादन केल्याचें उदाहरण आम्हांस माहीत आहे. लांच घेणाऱ्या न्यायाधिशासंबंधानें मुंबई सरकारचें धोरण त्याच्यावर खटला न करिता कमिशन नेमून त्याची चौकशी करावयाची असें असे. त्याप्रमाणें लांच खाणाऱ्या न्यायाधिशाची चौकशी कमिशन मार्फत झाल्याचीं सन १८९९ पासूनचीं पांच सहा उदाहरणें आमच्या ऐकिवांत आहेत. असल्या लांच-खाऊ न्यायाधिशावर फौजदारी खटला होऊन त्यास शिक्षा झाल्याचें एकच उदा-हरण आमच्या ऐकिवात आहे. न्यायाधिशाला लांच मिळवून देणाऱ्या मध्यस्थां-विषयीं कांहीं मनोरंजक माहिती प्रस्तुत स्थळीं आम्ही नमूद करितों.

लांच देणारे मध्यस्थ त्या जिल्हा-शहरांतील, तालुका-शहरांतील अगर जिल्ह्यांतील अन्य गावच्या प्रतिष्ठित लोकांपैकीं बहुशः असतात. कांहीं कारणावरून असल्या लोकांची व न्यायाधिशाची ओळख होते कित्येकदा असले लोक एखाद्या नवीन न्यायाधिशाची नेमणूक झाली आहे, अशी वार्ता कानांवर येताच नवीन न्यायाधिशाची ओळख करून घेण्याची खटपट करितात. अशा रीतीनें ओळख

झाली म्हणजे हे लोक अधून मधून रावसाहेबांच्या भेटीस जाण्याचा प्रघात सुरू ठेवितात असा प्रघात सुरू ठेवल्यानें त्याचा न्यायाधिशाशीं स्नेह आहे, असें लोकांस वाटून ज्या पक्षकारांचे दावे चालू असतात, ते अशा मध्यस्थामार्फत लांच देण्याच्या खटपटी सुरु करतात आमच्या या जिल्ह्याच्या शहरीं जॉइंट सबजजाच्या जागेवर एका गृहस्थाची नेमणूक झाली. हे गृहस्थ उत्तरस्थ वृत्तीचे होते व कोणी प्रतिष्ठित गृहस्थ त्यांचेकडे भेटीस आल्यास ते त्याचा अनादर करीत नसत अशा प्रकारची त्यांची वृत्ति पाहून या शहरांतील एका प्रतिष्ठित व वयोवृद्ध मारवाडी गृहस्थांनीं सकाळीं रावसाहेबांच्या भेटीस जाण्याचा प्रघात सुरू केला नमस्कार चमत्कार करून हे गृहस्थ खालीं बसून रावसाहेबांपुढें तपकिरीची डबी ठेवीत तपकिरीची चिमूट रावसाहेबांनीं घेतल्यावर इकडच्या तिकडच्या गोष्टी करून शेटजी निघून जात या त्यांच्या नित्याच्या क्रमामुळें फलाण्या शेटजीचें रावसाहेबांकडे चांगलें वजन आहे, अशी गावांत प्रसिद्धि झाली. न्यायाधीश साजस व पापभीरु वृत्तीचा असल्यानें लाच घेणारा नव्हता न्यायाधिशाशीं वरील संघटन झाल्यावर शेटजी न्यायाधिशापुढें चालू असलेल्या खटल्याबद्दलचें बोलणें काढूं लागले या बोलण्यांत दाव्याचा निकाल कोणातर्फे होणार याचा अदाज शेटजींना आला कीं ते न्यायाधिशाकडून निकाल तुमच्या बतीनें होईल असा बदोबस्त करतों, असें सागून पक्षकाराकडून न्यायाधिशास लाच देण्याकरिता पैसे घेऊ लागले अशा रीतीनें शेटजींनें आपली तुबडी बरीच भरून घेतली हा न्यायाधीश वास्तविक लाच घेणारा नव्हता परतु आता वर्णन केलेल्या पद्धतीनें त्याची लाचखाऊ म्हणून बदनामी व्हावयाची ती झालीच ! लांच न घेणाऱ्या अधिकाऱ्यांच्या बाबतींत असल्या प्रकारच्या मध्यस्थाचा त्यास काहीं उपयोग न झाला, तरी जे लांच घेणारे न्यायाधीश आहेत, त्यांना असल्या लोकांकडून फार मोठी किफायत होते; व हे मध्यस्थ स्वत चाहि फार मोठा लाभ करून घेतात वकील वर्गापैकीं प्रतिष्ठित वकिलांचा उपयोग लाच मिळविण्याकरिता काहीं न्यायाधिशाकडून कसा केला जातो याचा उल्लेख मागें आम्ही केलाच आहे. वकील वर्गापैकीं न्यायाधिशास लाच मिळवून देणाऱ्यांची सख्या फारच अल्प आहे, हें प्रस्तुत स्थळीं आम्ही नमूद करितों जिल्ह्याच्या व तालुक्याच्या शहरच्या न्यायाधिशाचा वरिष्ठ अधिकारी डिस्ट्रिक्ट जज्ज असतो याची सर्वसाधारण देखरेख तालुक्यातील व जिल्ह्याच्या ठिकाणच्या फर्स्ट व सेकड क्लास सबजज्ज यांचेवर असते या न्यायाधिशाना त्याच्या हाताखालचा कोणता मनुष्य लाचखाऊ असतो, ही गोष्ट ठाऊक असते परतु नामदार हायकोर्टाकडे असल्या न्यायाधिशाच्या या लांच खाण्याच्या सबधीबाबत रिपोर्ट करणें ही गोष्ट सहसा केली जात नाहीं. आमच्या जिल्ह्याच्या शहरीं एक फर्स्ट क्लास सबजज्ज लांच खाण्यात पटाईत होते फर्स्ट क्लास होण्यापूर्वी या जिल्ह्यातील एका तालुक्याच्या ठिकाणीं हे सेकड क्लास सबजज्ज होते तेथें असताना लाच खाऊन त्यांनीं बरीच संपत्ति मिळविली होती डिस्ट्रिक्ट जज्जापुढें सेकड क्लास सबजज्ज या नात्यानें

केलेल्या ठरावावर डिस्ट्रिक्ट जज्जाकडे चौकशीसाठीं एक अपील निघालें. त्या अपिलांत निदर्शनास आलेल्या गोष्टी डिस्ट्रिक्ट जज्जाना फार विचित्र भासल्या. म्हणून त्यांनीं बारकाईनें तपास करून कनिष्ठ कोर्टांकडून सर्व माहिती सरकारी रीत्या मागविली. जिल्ह्याच्या ठिकाणीं न्यायाधिशाचें काम करीत असतांना कित्येक स्पेशल दाव्यांत लांच घेऊन निवाडे दिल्याचा बोभाटा डिस्ट्रिक्ट जज्जाचे कानावर गेला होता. म्हणून डि. जज्जानीं या दाव्यांचे कामींहि केलेल्या निवाड्याची माहिती मिळविली. या सर्व प्रकारामुळें या न्यायाधिशाविषयीं अत्यंत तिटकारा वाटून नामदार हायकोर्टाकडे ह्याच्यासंबंधीं लांचखाऊपणाबद्दलचा साग्र रिपोर्ट तयार केला. ही वार्ता या न्यायाधिशाच्या कानीं गेली तेव्हां तो अन्य जिल्ह्याच्या ठिकाणीं फर्स्ट क्लास सबजज्ज होता. आमच्या जिल्हा जज्जास शरण जाऊन त्याची माफी मागावी व हायकोर्टाकडे डि. जज्जानें रिपोर्ट पाठवूं नये अशी समक्ष विनवणी करण्याकरितां तो येथें रजा घेऊन आला. परंतु तत्पूर्वींच जिल्हा जज्जाचा रिपोर्ट हायकोर्टाकडे गेला असल्यामुळें तो निराश होऊन परत गेला. जिल्हा जज्जाचा रिपोर्ट हायकोर्टातील न्यायाधिशाकडे गेल्यावर त्यानें या फर्स्ट क्लास सबजज्जानें लांच खाऊन जेवढ्या स्पेशल दाव्याचे निवाडे दिले होते व ज्या निवाड्यावर हायकोर्टांत अपिलें झालीं होतीं तीं सर्व अपिलें तावडतोब चौकशीसाठीं नेमलीं आणि या फर्स्ट क्लास सबजज्जानें केलेले निकाल रद्द केले. हा फर्स्ट क्लास सब्‌जज्ज लांचखाऊ आहे, अशी हायकोर्ट जज्जाची खातरी झाल्यावर 'सेवानिवृत्त होता कीं फौजदारी कोर्टापुढें आरोपी म्हणून उभें राहण्याची इच्छा आहे' अशी या गृहस्थास विचारणा केली. त्यावर त्यानें निमूटपणें सेवानिवृत्त होऊन आपल्यावरचें फौजदारी खटल्याचें संकट टाळलें. या न्यायाधिशापुढील एका दाव्यांत आम्हीं प्रतिवादीतर्फें वकील होतों. कागदोपत्रीं आमच्या पक्षकाराची बाजू मजबूत व उत्कृष्ट प्रकारची होती. परंतु या खटल्याचे कामीं आमच्या पक्षकाराच्या प्रतिपक्षानें या न्यायाधिशास लांच दिल्याचें आम्हांस समजलें होतें. दाव्याच्या अखेर चौकशीपूर्वीं वकील मंडळींपैकीं आमच्या एका ओळखीच्या वकिलानें ज्या पक्षकारातर्फें आम्ही वकील होतों त्या पक्षकारातर्फें मी वकील म्हणून हजर होत आहें, तुमची कांहीं हरकत आहे काय, असें मला विचारलें. त्यास माझी हरकत नसल्याचें मीं कळविलें. त्यानंतर खटल्याचें काम आम्हीं चालवून निवाडा देण्याकरितां तारीख नेमण्यांत आली. पुरावा झाल्यावर आपल्या पक्षकाराची बाजू उत्कृष्ट असून निवाडा आपल्यातर्फें व्हावा पाहिजे, असें या दाव्यांत नवीन वकीलपत्र दाखल केलेल्या वकिलानें मला सांगितलें. त्यावर दाव्याचा निकाल येथें आपल्यातर्फें होत नाहीं, असें मी त्यास सांगितलें. त्यापुढें दाव्याचा निवाडा देण्याचें काम बरेच दिवस रेंगाळत पडलें. कारण या न्यायाधिशाला लांच म्हणून देऊं केलेली रक्कम पटली नव्हती. आमच्या पक्षकारानें या कामीं दिलेले दुसरे वकील या गुन्हेगाराकडे पत्ते खेळण्यास जात असत. एके दिवशीं या वकिलानें मला सांगितलें कीं पत्ते खेळून घरीं येण्यास निघण्याचे पूर्वी मला एका बाजूस नेऊन न्यायाधिशानें असें सांगितलें

कीं दाव्याचा निवाडा मी तुमच्या पक्षकारातर्फे देणार आहे. त्यावर त्या वकिलास मी फिरून सांगितलें कीं, ही गोष्ट अन्याय्य असून निवाडा आपल्याविरुद्ध होणार आहे. नंतर दोन चार दिवसांत या दाव्याचा निकाल आमच्या पक्षकाराच्या विरुद्ध झाला. या ठरावावरहि वर नमूद केल्याप्रमाणें हायकोर्टांत अपील केलें होतें त्याचा निकाल आमच्या पक्षकारातर्फे होऊन खालच्या कोर्टाचा ठराव हायकोर्टानें रद्द केला.

याप्रमाणें हे न्यायाधीश सेवानिवृत्त झाल्यानंतर कर्जवसुली कायद्यान्वये जीं बोर्डें स्थापन करावयाचीं होतीं, त्या बोर्डांचीं कामें करण्याकरितां सेवानिवृत्त झालेल्या न्यायाधिशांपैकीं कांहींची निवड करून त्यांचीं नांवें सरकारनें प्रसिद्ध केलीं. या नावांत वरील न्यायाधीश यांचें नांव आमच्या वाचण्यातआलें; तेव्हां तर मी चकितच झालों. आंधळें दळतें व कुत्रें पीठ खातें, अशा प्रकारच्या सरकारी कारभाराचा हा एक उत्कृष्ट नमुनाच होता. लाचखाऊ म्हणून ज्याला सेवानिवृत्त होण्यास सरकारनें भाग पाडलें, त्याच इसमास कर्जवसुली-तडजोडीच्या कायद्यान्वयें स्थापन करण्यात आलेल्या बोर्डाचा अधिकारी नेमणें म्हणजे लाच खाऊन वाटेल तशी स्वतःची तुंबडी भरण्याचा मार्ग खुला करून दिल्यासारखेंच होतें. याप्रमाणें जरी या न्यायाधिशाचें नांव सुरुवातीस जाहीर झालें होतें तरी मागाहून त्यांचें नांव कमी करण्यात आल्याचें जाहीर झालें, दुसऱ्या एका लाचखाऊ जॉइंट सबजज्जानें आपल्या लांच खाण्याच्या पद्धतींत कोणत्याच प्रकारचा आडपडदा ठेविला नव्हता. ज्या कोणा पक्षकारास स्वतःचें काम लांच देऊन साध्य करून घ्यावेसें वाटेल, त्यानें राजरोस रीतीनें सदर न्यायाधिशाच्या बंगल्यावर जाऊन साखरतुपापासून तों शें दोनशें रुपयापर्यंत जें देता येईल तें द्यावें व आपल्यातर्फे निवाडा मिळवावा. न्यायविक्री करण्याचें या न्यायाधिशानें जणूं काय दुकानच काढलें आहे, असा भास कांहीं काळपावेतों चालला होता. या न्यायाधिशाचे पट्टेवाले त्याच्यापुढें चाललेल्या खटल्यातील पक्षकारास साहेबांच्या बंगल्यावर जाऊन त्यांना भेटा व पैसे देऊन काम करून घ्या असें सांगत असत. द्रव्याचा लोभ कित्येक व्यक्तींच्या ठायीं इतका विचित्र प्रकारचा असतो कीं, विद्वत्ता, न्यायनीतीचें ज्ञान इत्यादि गोष्टी त्यांच्या ठिकाणीं असल्या तरी लाच घेण्याचा मोह त्यांना आवरता येत नाहीं. इंग्लंडातील महाविद्वान् पंडित सर फ्रॅन्सिस बेकन हा मुख्य न्यायाधिशाचें काम करीत असतां पक्षकाराकडून लाच घेत असे, हें सर्वश्रुत आहे. बेकनसारख्या महापंडिताची पैशाच्या लोभामुळें जेथें लटपट उडून जात असे, तेथें तालुका व जिल्ह्याच्या ठिकाणच्या लुंग्या सुंग्या पदवीधर न्यायाधिशाची लटपट उडावी, यांत कांहीं नवल नाहीं. इंग्लंडातील सर फ्रॅन्सिस बेकन हे जसें लाचखाऊ न्यायाधिशाचें उदाहरण आढळतें, त्याप्रमाणें मराठेशाहीतील नि:स्पृही व लाचेच्या मोहास बळी न पडणारा न्यायाधीश महाविद्वान् रामशास्त्री प्रभुणे यांचें दुसऱ्या कोटींतील उदाहरण आढळतें.

न्यायाधिशापुढें येणाऱ्या वादाचे निवाडे योग्य प्रकारें होण्यास ज्या गोष्टी प्रतिकूल असतात त्यांचें दिग्दर्शन केल्यावर ज्या कांहीं विशिष्ट प्रकारच्या मनोवृत्ती

या कामीं प्रतिकूल असतात, त्याचें थोडें दिग्दर्शन करतों. काहीं विशिष्ट व्यक्ति अगर विशिष्ट जातींतील व्यक्तींचे स्वभाव यांविषयींचे अनुकूल वा प्रतिकूल मत न्यायाधिशानें वादाचा निवाडा करतेवेळीं लक्षांत घेता कामा नये. सावकारी करणारे लोक लबाड व लुच्चे असतात व कुळांनीं दिलेला वसूल कर्जापोटीं जमा न करितां ते खाऊन जातात, असा एक समज कित्येक न्यायाधिशाचा असतो हा पूर्वग्रह एखाद्या दाव्याच्या कामीं रिणकोनें वसुलाची तक्रार केली असतां तिचा निवाडा करतांना न्यायाधिशानें लक्षांत न घेतां पुढें आलेल्या तक्रारीचा पुराव्यावरून निवाडा करणें युक्त होय. असल्या प्रकारच्या तक्रारींच्या बाबतींत न्यायाधिशांत दोन भिन्न मनोवृत्तीचे लोक आमच्या आढळण्यांत आले. एक न्यायाधिशाचा वर्ग असा आढळला कीं, रिणकोनें सावकारापासून घेतलेली वसुलाची लेखी पावती हजर केली, तरच तो वसूल धावींत धरावयाचा व अशी पावती नसल्यास रिणकोनें हजर केलेल्या तोंडी पुराव्यावर विश्वास ठेवून तो वसूल धावींत धरावयाचा नाहीं. या प्रकारच्या मनोवृत्तीचे बहुतेक न्यायाधीश आढळून आले. परंतु तोंडी पुराव्यावर विश्वास ठेवून रिणकोचा वसूल धावींत धरणारेहि कांहीं न्यायाधीश आढळले. एक मराठा जातीचा न्यायाधीश आमच्या असा पाहण्यांत आला कीं, मारवाडी अगर ब्राह्मण सावकारानें केलेल्या फिर्यादींत रिणको कुणबी असला तर त्या रिणकोनें केलेली वसुलीची तक्रार त्यानें हजर केलेल्या तोंडी पुराव्यावर विश्वास ठेवून ते वसूल धावींत धरीत. असे एका तालुका कोर्टांत ते न्यायाधिशाच्या कामावर दोन तीन वर्षें होते. या मुदतींत कुणबी रिणकोची चंगळ उडाली. ब्राह्मण व मारवाडी यांचा द्वेष करणारे म्हणून त्या न्यायाधिशाची ख्याति होती. न्यायाधिशाच्या मनांतील काहीं जातिविषयीं केवळ द्वेषभावनेनें झालेला दूषित पूर्वग्रह याचा न्यायदानावर कसा परिणाम होतो हें वरील उदाहरणावरून स्पष्ट होतें. या न्यायाधिशाच्या ठरावावर कित्येकांनीं जिल्हा कोर्टांत अपिलेंहि केलीं, परंतु त्यांचा कांहींएक उपयोग झाला नाहीं, कारण कनिष्ठ कोर्टास एखादा तोंडी पुरावा देणारा साक्षीदार विश्वास ठेवण्यासारखा वाटून त्यानें त्याचा पुरावा खरा मानला तर अपीलकोर्टाला असल्या अधिकारांत हात घालतां येत नसल्यामुळें अपीलकोर्टांत या न्यायाधिशानें केलेले निवाडे बहुतेक कायम होत. याच मुद्याच्या चर्चेच्या दृष्टीनें दुसऱ्या एका प्रकारच्या फिर्यादींत येणाऱ्या तक्रारीबाबत जो विचित्र प्रकार आढळून आला, त्याचें दिग्दर्शन मनोरंजक वाटेल. एखाद्या इसमानें आपल्या मिळकतीचें सावकारास खरेदीखत करून दिलें तर त्या खरेदीखतांतील मिळकतीचा व्यवहार खरोखर खरेदी स्वरूपाचा नसून गहाणस्वरूपाचा आहे, अशी तक्रार करण्याची मोकळीक शेतकी ॲक्टांत घातलेल्या एका नव्या कलमान्वयें खरेदीखत करून देणाऱ्या शेतकऱ्यास करतां येऊं लागली. शेतकऱ्याकडून सावकार ज्या मिळकती खरेदी घेतो, त्यांपैकीं कांहीं व्यवहार खरोखरच पक्क्या खरेदीच्या स्वरूपाचे नसतात. खरेदीखताची भरण्याची रकम व्याजासह परत केली म्हणजे ती मिळकत सावकारानें त्यास परत द्यावयाची

असा करार उभयतांच्या दरम्यान ठरलेला असतो. ही गोष्ट लक्षांत घेऊनच शेतकरी ॲक्टांत वरील कलम सामील करण्यांत आलें. न्यायाधिशापुढें अशा स्वरूपाच्या तक्रारी कलम-कायद्यांत हें कलम सामील झाल्यानंतर येऊं लागल्या, तेव्हां या फिर्यादींच्या निवाड्यांचे यावतीतहि वर दर्शविल्याप्रमाणें न्यायाधिशांत दोन निरनिराळ्या मनोवृत्तींचे न्यायाधीश दिसून आले. सावकारानें खरेदीखताचा कागद हजर केला, तर त्या खरेदीखतांतील व्यवहार पक्क्या खरेदीचा असून खरेदी देणाऱ्या शेतकऱ्याची तक्रार, तो गहाणस्वरूपी असल्याबद्दलची खोटी आहे, असा निवाडा देणाऱ्यांचा एक वर्ग; व तोंडी पुराव्यावर विश्वास टेवून खरेदीखतांतील व्यवहार खरोखर खरेदीचा नसून गहाणाचाच आहे असा निवाडा देणाऱ्यांचा दुसरा वर्ग. या दोन वर्गाव्यतिरिक्त पक्षकाराचा लेखी व तोंडी पुरावा विचारांत घेऊन या वादग्रस्त मुद्याचा निवाडा करणारे असे कांहीं न्यायाधीशहि आढळत असत. वरील कायद्याचें नवीन कलम देऊन ॲग्रिकल्चरिस्ट ॲक्टांत सामील केल्यानंतर खाजगी संभाषणांत एक न्यायाधीश असें म्हणाले कीं, असल्या फिर्यादींत खरेदीखतांतील व्यवहार गहाण स्वरूपाचा आहे असें मीं कधींच ठरविलें नाहीं. एका इंग्रज न्यायाधिशाचे सरकारी कायद्याच्या पुस्तकांशिवाय स्वतःचे असे कांहीं खाजगी कायदे ठरलेले होते. यापैकीं मारवाडी, ब्राह्मण सावकार हे लबाड व लुच्चे असतात व शेतकऱ्यांच्या गहाण मिळकतींचे पक्के खरेदीखताचे कागद करून घेतात, सबब असल्या प्रकारच्या पक्षकाराचे दरम्यान वाद उपस्थित झाल्यास खरेदीखत गहाण स्वरूपी ठरवावयाचें, असा त्यांचा एक खाजगी कायदा होता. जिल्हा न्यायाधिशाचे जागेवर त्यांची नेमणूक झाल्यावर ही गोष्ट वकीलवर्गाला ज्ञात झाली. त्यानंतर कनिष्ठ न्यायाधिशांनीं यासंबंधाच्या केलेल्या ठरावावर, त्याचे कोर्टांत अपिलें भराभर दाखल होत चालली व या सर्व अपिलांचे निकाल शेतकऱ्यांतर्फे होऊं लागले. मात्र असल्या अपिलांची बाबी तयार करतांना खरेदीदार हा मारवाडी अगर ब्राह्मण सावकार आहे ही गोष्ट अपील दाखल करणाऱ्या वकिलानें प्रामुख्यानें नमूद करून अपील चालवितांना डि. जजांचें लक्ष या गोष्टीकडे मुख्यतः वेधून घेण्याची खबरदारी घ्यावी लागत असे. न्यायाच्या दृष्टीनें हा प्रकार श्रेयस्कर आहे, असें म्हणता येत नाहीं. कित्येक दाव्यांचे कामीं झालेला व्यवहार वस्तुतः खरेदीचा असून तो गहाणाचा ठरला गेला म्हणजे खरेदी घेणारावर एक प्रकारचा अन्यायच होतो. काल व परिस्थितीच्या बदलामुळें असल्या प्रकारची तक्रार घेण्यास पुरेसें व सबळ कारण नसता एका दाव्यांत आम्ही स्वतः ही तक्रार उपस्थित करून, तक्रार घेणाऱ्या पक्षकाराचा फायदा कसा झाला याचें एक मनोरंजक उदाहरण प्रस्तुत स्थळीं नमूद करितों. शेतकी ॲक्टाचीं एका कलमाखेरीज सर्व कलमें सन १९०१ सालीं आमच्या जिल्ह्यास लागू झालीं. हीं कलमें लागू होण्यापूर्वी झालेल्या एका पक्क्या खरेदीखताचा व्यवहार गहाणस्वरूपी आहे अशी तक्रार आम्हीं एका शेतकऱ्याच्या जमिनीबाबत दाखल केली. ही तक्रार साबीत होण्याचा यत्किंचितहि संभव आम्हांस

घाटत नव्हता. दिवाणी कोर्टांचीं कामें फार वाढल्यामुळें एक दोन वर्षें ती फिर्याद तशीच रेंगाळत पडली. अखेर एका नवीन नेमलेल्या मदत न्यायाधिशापुढें ती फिर्याद अखेर चौकशीसाठीं लागली. या कामातील पुरावा पक्षकारांच्या व साक्षीदारांच्या जबान्या घेण्यापूर्वी खटल्याची हकीकत सांगत असता न्यायाधीश मध्येंच खरेदी घेणारास म्हणाले, "तुला ही जमीन घेऊन काय करावयाचें आहे? खरेदीखताच्या भरण्याची रक्कम तुला मिळाली, तर तुझें काय नुकसान आहे? आजपावेतों तूं जमिनीचें उत्पन्न घेतच आहेस. तरी भरण्याची रक्कम घेऊन जमिनीवरचा हक्क सोडून देऊन आपसात तडजोड कर." यावर हो ना करता करता खरेदी घेणारा न्यायाधिशानें सुचविलेली गोष्ट करण्यास कबूल झाला. ज्या पक्षकारातर्फे आम्ही तक्रार केली होती, त्यालाहि न्यायाधिशानें सुचविलेली तडजोड मान्य करावी असा सल्ला दिला. याचें कारण असें कीं, खरेदीखतात असलेल्या दोन जमिनींपैकीं एकीची विक्री करून खरेदीखताच्या भरण्याची पुरी रक्कम येण्यासारखी होती. हा सल्ला आमच्या पक्षकारास पटून त्यानें आमच्या म्हणण्याप्रमाणें वागण्याचें कबूल केलें. न्यायाधिशानें सुचविलेल्या तडजोडीअन्वयें रक्कम भरण्यासाठीं दीड महिन्याची मुदत कोर्टानें दिली. दरम्यान दोन जमिनींपैकीं एकीची विक्री करून रक्कम भरून टाकली व अशा रीतीनें आमच्या पक्षकारास एक जमीन मालक या नात्यानें कायम उपभोग घेण्यास मिळाली. दिवाणी दाव्याचें काम रेंगाळत पडून कालपरिस्थितीत बदल झाल्यामुळें दाव्यातील पक्षकाराचा कसा फायदा होतो याचें हें उत्कृष्ट उदाहरण आहे.

हिंदु लॉ संबंधाच्या तक्रारी असलेले जे अनेक दावे कोर्टापुढें येतात, त्यात पहिल्या कोर्टापासून तों हायकोर्टाच्या अखेर निवाड्यापावेतों जो काळ जातो, त्याच्या दरम्यान हिंदु कायद्यातील पूर्वी मान्य नसलेलें एखादें नवें तत्त्व प्रीव्हीकौन्सिलनें मान्य केलें व तो निवाडा प्रसिद्ध झाला, तर या निवाड्यामुळें दाव्यातील पक्षकाराचा फायदा झाल्याचीं हि कांहीं उदाहरणें अलीकडे घडलेलीं आहेत. एकत्र हिंदु कुटुंबातील एखादा भागीदार मृत झाला तर अन्य सहभागीदाराच्या संमतीशिवाय विधवेस दत्तक घेण्याचा अधिकार नव्हता परंतु अलीकडे सहभागीदाराच्या संमतीवाचून घाटेल तेव्हां एकत्र कुटुंबातील विधवेनें दत्तक घेतल्यास विधवेच्या नवऱ्याला मिळावयाचा जितका हिस्सा मिळावयाचा, तितका मिळण्यास हा दत्तक पात्र ठरतो व तो हिस्सा सहभागीदार मयत झाल्यानंतर त्याच्या अन्य वारसाच्या ताब्यांत गेला असला तरी तो त्याचे ताब्यातून घेण्याचा दत्तकास हक्क प्राप्त होतो. प्रीव्हीकौन्सिलनें केलेल्या या निवाड्यामुळें हिंदु कायद्यात एक फारच मोठी क्रान्ति घडून आली व या निवाड्याचा फायदा हायकोर्टात चालू असलेल्या ज्या अपिलांना अशा प्रकारचे प्रश्न उपस्थित झाले होते, त्यांतील पक्षकाराचा फार मोठा लाभ झाला.

फौजदारी खटल्याच्या निर्णयाच्या दृष्टीनें दुसरा एक गुण न्यायाधिशाचे ठिकाणी आत्यंतिक स्वरूपात असला तर खटल्याच्या निवाड्यावर त्याचा परिणाम

कशा प्रकारचा होतो, हेंहि येथें नमूद करणें जरूर आहे. Justice must be tempered by mercy असें एक वचन सामान्यपणें रूढ आहे. न्यायाधिशानें फौजदारी खटल्याचे निवाडे देताना आरोपीस शासन करतेवेळीं वरील वचन ध्यानांत ठेवणें अगत्याचें आहे. आमच्या जिल्ह्यात एक सत्याने अभिमानी, कोपिष्ट व गुन्हेगारीचे दुष्मन असे न्यायाधीश होते. त्यांचें मन स्त्रिया आणि बालकें यांच्याविषयीं मृदु व दयाळु होतें, परंतु गुन्हे करणाऱ्या लोकांविषयीं अगदीं कठोर होते व एकाद्या खटल्यांत आरोपीनें गुन्हा केला आहे, अशी त्यांची पूर्ण खातरी झाली म्हणजे ते त्यास अत्यंत कडक शासन देण्यास कचरत नसत. आरोपीवर दया, क्षमा करणें ही गोष्ट त्याना मान्य नव्हती. जिल्हा न्यायाधीश म्हणून ते या जिल्ह्यात असताना दरोडेखोरीस या जिल्ह्यांत अगदीं ऊत आला होता. दरवडे घालताना द्रव्य काढण्याकरिता लोकाचे शारीरिक हाल हे दरवडेखोर अमानुषपणें करीत असत अशल्या फौजदारी खटल्यांच्या निवाड्यांत आरोपींना फांशीची शिक्षा देण्याची त्याना दिक्कत वाटत नसे त्यांच्या तीन चार वर्षांच्या कारकीर्दीत अन्य कोणत्याहि न्यायाधिशाच्या कारकीर्दीपेक्षा अधिक लोकास फाशीवर चढविण्यात आले यांच्या अगदीं उलट मनोवृत्तीचे मुंबई इलाख्यातील एक जिल्हा जज्ज व सेवानिवृत्तीचे सुमारास हायकोर्टाचे न्यायाधीश झालेल्या एका न्यायाधिशाचें उदाहरण आहे. I.C.S. ची परीक्षा पास झालेल्यांपैकीं हे न्यायाधीश होते. त्यानीं आपल्या नोकरीच्या सर्व कारकीर्दीत फाशीची शिक्षा कधींच कोणाला दिली नाहीं ते अंत करणानें दयाळु असत कोणत्याहि मानवी प्राण्याचा जीव घेण्याचा अधिकार मानवी प्राण्यास नाहीं असें त्यांचे मत होतें. एकाद्या खटल्यात कोर्टापुढें येणारा पुरावा खोटा असल्यास त्यावर विश्वास ठेवून आरोपीस फाशी देणें बरोबर होणार नाहीं. कारण पुढें आलेला पुरावा जर खोटा असला तर नाहक आरोपीचा प्राण घेतल्याचें पाप न्यायाधिशाचे माथीं येतें. सातारा जिल्ह्यातील एका खेड्यात परस्पराचा द्वेष करणारे दोन तट होते. त्यांपैकीं एका तटातील लोकानीं आपल्याच तटातील एका मनुष्यास ठार मारून त्याचा खून दुसऱ्या तटातील माणसानें केला, असा बनावट पुरावा तयार केला. त्या माणसास सेशन कोर्टाकडून फाशीची शिक्षा दिली जाईल, अशा खटपटी त्या दोन्ही तटाकडून दहा पधरा वर्षें चालू होत्या. अखेर तेथील अशाच एका खटल्यात पोलिस अधिकाऱ्याच्या चौकशींत हा प्रकार उघडकीस आला व सेशन कोर्टानें दिलेली फाशीची शिक्षा मुंबई हायकोर्टानें रद्द केली. साक्षात् घडलेल्या या प्रकारावरून तोंडी पुराव्यावर विश्वास ठेवून एखाद्या माणसास फाशीची शिक्षा करणें किती धोक्याचें आहे, हें दिसून येतें. वर सत्याचा अभिमानी, कोपिष्ट व स्त्रिया आणि बालकें यांच्याविषयीं दयार्द्र असणाऱ्या न्यायाधिशाच्या वैयक्तिक स्वभावाचा, त्याच्यापुढें आलेल्या वादाऱ्या निर्णयावर कसा परिणाम होत असे याचीं एक दोन नमुनेदार उदाहरणें येथें नमूद करितों. या न्यायाधिशापुढें एकदा एका छोट्या संस्थानिकानें खून केल्याचा फौजदारी खटला निवाड्याकरिता आला. त्या खटल्याचे

कामीं त्या खून झालेल्या दिवाणाच्या बायकोची जबानी झाली. खटला दाखल होण्या-पूर्वी दिवाणाचा खून करणाऱ्या मारेकऱ्यांना त्याची बायको सामील आहे, असा लोकांत प्रवाद होता. जबानी देतेवेळीं जबानी देतांना डोळ्यांत पाणी आणून तिनें अशा सोंगाची बतावणी केली कीं नवऱ्याच्या खुनामुळें ती अत्यंत दुःखित झाली आहे. याप्रमाणें बाईनें दिलेल्या जबानीनें त्या न्यायाधिशाच्या मनावर एवढा परिणाम झाला कीं, न्यायाधिशास ती बाई मूर्तिमंत सत्याची पुतळी वाटून नामदार हायकोर्टाचीं पुरातन सरक्युलरें हुडकून - काढून तिला त्यांनीं रकम रुपये पन्नासचें बक्षीस सरकारी पैशातून दिलें. त्याच न्यायाधिशापुढें एका अज्ञान पक्षकाराच्या वतीनें एक दिवाणी अपील चौकशीसाठीं निघालें. अज्ञान अपिलंटातर्फें म्हणण्या-सारखा पुरावा काहींएक नव्हता व कनिष्ठ कोर्टाचा ठरावहि बरोबर होता. असें असता अपिलंट व जाब देणारा या उभयताच्या वकिलाच्या तक्रारी ऐकल्यावर कनिष्ठ कोर्टाचा ठराव न्यायाधीश कायम करणार असें अपिलंटाच्या वकिलास दिसून आलें. त्यानें आपलें प्रत्युत्तराचें भाषण पुरें करून "बिचारा अज्ञान बुडाला!" असे उद्गार खालीं बसतेवेळीं काढले. हे अज्ञान अपिलंटाचे वकिलाचे शब्द कानीं पडताच त्या न्यायाधिशाच्या मनाचें पारडें एकदम फिरलें व अखेर कनिष्ठ कोर्टाचा ठराव रद्द करून त्यांनीं अपिलाचा निकाल अज्ञानातर्फें केला. दुसऱ्या एका अपिलाचे कामीं अज्ञान विरुद्ध हिंदू विधवा यांच्यात वाद होता. या वादाच्या निवाड्यावर केलेल्या अपिलांत अज्ञानातर्फें तेच वकील होते. त्यांनीं पूर्वी न्यायाधिशा-वर केलेला प्रयोग यशस्वी होईल असें वाटून अज्ञान बुडाला असे उद्गार काढले. परंतु या अपिलांत मात्र हा प्रयोग यशस्वी झाला नाहीं. कारण न्यायाधीश हें उद्गार ऐकून म्हणाले, तुमचा पक्षकार अज्ञान आहे ही जरी गोष्ट खरी असली तरी त्याचा प्रतीपक्षी हिंदू विधवा आहे. अशा स्थितींत हिंदू विधवेची बाजू मला खरी वाटते. असें म्हणून न्यायाधिशानें अपिलाचा निकाल हिंदू विधवेतर्फें केला. न्यायाधिशाचें नैसर्गिक स्वभाववैशिष्ट्य खटल्याचा निवाडा करण्यास कसें नडतें, हें यावरून दिसून येते.

## वकिलांची न्यायाधिशाकडे पाहण्याची दृष्टि

न्यायाधीश व वकील यांची परस्पराकडे पाहण्याची दृष्टि व परस्पराविषयींची अपेक्षा कशा प्रकारची असते याविषयींचें विवेचन करणें जरूर आहे. दिवाणी कोर्टातील न्यायाधिशापुढें जे वाद निवाड्याकरितां येतात, त्यांची चौकशी करण्याची कायद्यानें ठरविलेली पद्धत अशी असते कीं, त्यांत उभय पक्षकारांच्या वकिलांच्या तक्रारी ऐकून घेणें क्रमप्राप्त असतें. या पद्धतीमुळें कनिष्ठ कोर्टाच्या न्यायाधिशापासून तो हायकोर्टाच्या न्यायाधिशापावेतों त्या कामातील पक्षकाराच्या वकिलाच्या तक्रारी ऐकून घेण्याच्या बाबतींत कंटाळा अगर टाळाटाळी करणारे न्यायाधीश फारच थोडे

आढळतात. फौजदारी खटले चालविणान्या न्यायाधिशांची मनोवृत्ति मात्र प्रशंसनीय नसते. खटले चालविण्याकरितां वकील हजर झाले, की या न्यायाधिशांपैकीं पुष्कळांच्या कपाळाला आठ्या पडतात व खटल्याची चौकशी चालू असतां काम करणान्या वकिलांच्या मार्गांत अडथळे व अडचणी उत्पन्न करण्याचा प्रयत्न त्यांचेकडून वेळो-वेळीं केला जातो दिवाणी अपिलें चालविणान्या I. C. S. न्यायाधिशांपैकीं कांहींची अशी मनोवृत्ति आढळून येते. या जिल्ह्यांत एक बंगाली न्यायाधीश होते दिवाणी अपिलांतील वकिलांच्या तक्रारी ते आपल्या चेंबरमध्यें ऐकत असत. वकिलांना खटल्यांतील तक्रारी नेहमीं उभें राहून सांगण्याची संवय असते या संवयीमुळें आपली तक्रार थोडक्यात न मांडतां लांबलचक भाषण करून मांडण्याची संवय वकिलांस असते, असा यांचा समज होता. अपील थोडक्या वेळांत चालवून निवाडा करावयाचा असा या न्यायाधिशांचा दंडक असल्यामुळें अपिलांतील तक्रार सांगण्या करितां वकील उभा राहिला की "उभे कशाला राहतां ? खुर्चीवर बसूनच काय तक्रार असेल ती सांगा " असें त्या वकिलास सांगून तो खुर्चीवर बसल्यावर तक्रार ऐकण्यास सुरुवात करावयाची. न्यायाधिशाच्या या युक्तीचा थोडाबहुत उपयोग होत असे व दोन्ही पक्षकारांच्या वकिलांचीं भाषणें थोड्याच वेळात आटोपत असत याच न्यायाधिशाची सेशन जज्ज या नात्यानें त्यांच्यापुढें आलेल्या फौजदारी खटल्या च्या चौकशीच्या बाबतींत एक आढळलेली गोष्ट नमूद करण्यासारखी आहे खटल्या ची चौकशी सुरू झाल्यानंतर एकदा या न्यायाधिशाची खातरी झाली कीं, आरोपीनें गुन्हा केला आहे, कीं मग त्या खटल्याची चौकशी संपुष्टात आणण्यासाठीं ते अधीर होत अशा खटल्यांतील आरोपीच्या वकिलानें लांबलचक भाषण करण्यास सुरुवात केली तर जितकें भाषण लांबेल तितकी शिक्षा अधिक होईल असें आरोपीचे वकिलास हे न्यायाधीश बजावीत असत

सर्वसाधारणपणें वकिलांची न्यायाधिशाचे बाबतींत अशी अपेक्षा असते कीं, न्यायाधिशानें वकिलांशीं सौजन्यानें वागावें व काम चालविण्याच्या बाबतींत वकिलांना येणान्या अडचणींसंबंधीं थोड्या फार सवलती द्याव्या या दोन बाबतींत वकिलांचें समाधान झालें तर ते संतुष्ट असतात न्यायाधीश खटल्याचा निवाडा आपल्या तर्फेचा करो कीं विरुद्ध करो याची विशेष पर्वा वकील करीत नाहीं निवाडा तर्फेचा न झाला, तर वरिष्ठ कोर्टाकडे अपिलाची सवड असते अशा स्थितींत न्याया-धिशानें विरुद्ध निवाडा केला, तर त्याबद्दल विशेष तक्रार करण्याचें वकिलास कारण नसतें. धंद्यात शिरणान्या नूतन वकिलांना यासबंधीं विशेष काळजी वाटते याचें कारण उघडच आहे कीं, विरुद्ध निवाडा आल्यास पक्षकाराची नाराजी होऊन त्याचा अनिष्ट परिणाम आपल्या धंद्यावर होईल, अशी त्याला भीति वाटते. पुष्कळ वर्षें धंदा करून कामाचा ज्या वकिलाचा चांगला जम बसला आहे त्याचें मन निरढावलें जातें व एखाद्या कामाचा निवाडा तर्फेचा झाला काय कीं विरुद्ध झाला काय याची तो पर्वा करीत नाहींसा होतो.

## पक्षकारांची न्यायाधिशाकडे पाहण्याची दृष्टि

यापमाणें वकिलाची न्यायाधिशाकडे पाहण्याची दृष्टि व त्याच्या अपेक्षा यांचें दिग्दर्शन केल्यावर पक्षकाराची न्यायाधिशाकडे पाहण्याची दृष्टि कोणत्या प्रकारची असते व अपेक्षा काय असतात या विषयींचें विवेचन बरेंच मनोरंजक आहे. आमच्या या जिल्ह्यात कोणत्याहि दिवाणी कामात हजर राहण्याची कोर्टाकडून आज्ञा झाली कीं, पक्षकार त्याचें वकीलपत्र त्याच्या माहितीप्रमाणें अथवा त्याच्या सल्लागाराच्या माहितीप्रमाणें एखाद्या वकिलास देतो. ही गोष्ट तो विशेष महत्त्वाची समजत नाहीं. यापमाणें वकीलपत्र दिल्यावर दाव्याच्या विषयाची किंमत फार मोठी असली तर ज्या न्यायाधिशाकडून आपल्या दाव्याचा निवाडा व्हावयाचा त्याचेकडे कोणाचें वळण लाविता येईल, या महत्त्वाच्या मुद्याच्या तपासाकडे तो लागतो. वळण या शब्दाचा अधिक खुलासा प्रस्तुत स्थळीं करणें अगत्याचें आहे. दाव्याचा निवाडा आपले तर्फे होण्याकरितां खात्रीचा मार्ग म्हणजे त्या न्यायाधिशाशी ज्या गृहस्थाचा परिचय वगैरे असेल, त्याच्या मार्फतीनें त्यास द्रव्य देऊन अगर शिफारस करून न्यायाधिशाकडून आपल्यातर्फे निवाडा करून घेणें असा वळण या शब्दात अर्थ आहे. पक्षकाराच्या या समजुतीस अनुसरून न्यायाधिशाचे नातेवाईक कोण आहेत, कोठें राहतात, त्याचे स्नेही कोण इत्यादि तपास तो बारकाईनें करूं लागतो. या तपासांत त्याला अशा प्रकारच्या लोकांचीं नावें कळलीं म्हणजे त्याच्याकडे जाऊन त्याना भीड घालण्याचा अगर द्रव्य देण्याचा त्याचा प्रयत्न सुरू होतो. पक्षकाराच्या या खटपटींत स्वार्थी व लबाड अशा लोकांचें फार फावतें. पक्षकारांच्या मनातील हेतु जाणून हे लोक त्यास झुलवून त्याच्याकडून पैसे काढतात. न्यायाधीश खरोखरच लाच घेऊन निवाडा देणारा असल्यास असले लोक स्वतःची तुंबडी भरून न्याया-धिशालाहि यथास्थित पैसे चारतात. मोठमोठ्या दाव्याच्या कामीं अशा रीतीनें न्यायाधिशास लाच देऊन अगर त्यास भीड घालून खऱ्याचें खोटें व खोट्याचें खरें झाल्याचीं कित्येक उदाहरणें आढळतात. पक्षकाराची ही स्वाभाविक मनोवृत्ति ज्या प्रमाणात आमच्या जिल्ह्यात आढळून येते, तितक्याच प्रमाणात इतर जिल्ह्यात आहे कीं काय हें सांगता येणें कठीण आहे. ज्याच्याजवळ पैशाची पिशवी लाब असते, तो वादाचे कामीं यशस्वी ठरतो असा एक समज आहे व या समजुतींत बरेंच तथ्य आहे, असें म्हणावें लागतें. पक्षकाराच्या आता दर्शविलेल्या या मनोवृत्तीचा विचित्र परिणाम एका वादाची हकीकत या पुढील भागात आम्ही देणार आहों त्यावरून दिसून येईल.

## कांहीं न्यायाधिशांचीं संस्मरणीय स्मृतिचित्रें

आमच्या चार तपांच्या वकिलीच्या कारकीर्दीत जे अनेक न्यायाधीश कनिष्ठ व वरिष्ठ दर्जाचे आमच्या पाहण्यात आले, त्यांपैकीं कांहीं विशेष स्मरणांत राहण्यासारख्या

न्यायाधिशांचें अल्प वर्णन करितों. आमच्या जिल्ह्याच्या दुय्यम दर्जाच्या न्यायाधिशांत दोन तीन व्यक्ति स्मरणांत राहण्यासारख्या होत्या. प्रथम एका महत्त्वाकांक्षी दुय्यम न्यायाधिशाची हकीगत थोडक्यांत देतों हे न्यायाधीश कायद्याचे पदवीधर होते. एका तालुक्याच्या ठिकाणीं कांहीं वर्षें त्यांनीं वकिली केली. त्याचा धंदा बरा प्रकारें चालत असे परंतु वकिलीचा धंदा सोडून न्यायाधिशाची सरकारी नोकरी पत्करावी असें त्यांच्या मनानें घेतलें सन १९०४ च्या सुमारास त्यांनीं आमच्या जिल्ह्यांतील फर्स्ट क्लास सबजज्ज कोर्टांत ३० रु ची कारकुनाची नोकरी पत्करली पुढें थोड्याच दिवसांनीं त्याची न्यायाधिशाच्या जागेवर नेमणूक झाली आमच्या जिल्ह्यात जॉईंट सबजज्जाच्या जागेवर हे काम करीत असतां मुंबईच्या हाय कोर्टांत सर नारायण चंदावरकर हे न्यायाधीश होते निवाड्याचे निकाल देताना आधार म्हणून हिंदु स्मृतिशास्त्रांतील वचनें एखाद्या मुनसफानें आपल्या ठरावात नमूद केलीं तर, त्या न्यायाधिशावर त्यांची मर्जी बसत असे, असा समज प्रसृत झाला होता ही गोष्ट वरील जॉईंट सबजज्जांच्या कानांवर असल्यामुळें त्यांनीं त्यांच्यापुढें चाललेल्या एका दाव्यात त्याचा निवाडा करतांना स्मृतिवचनें नमूद करून त्याविषयीं चर्चा केली या दाव्यांत एका सावकाराचें दुसऱ्या माणसाकडे येणें असलेल्या कर्जाच्या रकमेच्या कबुलीच्या चिठ्ठया दर तीन वर्षांनीं घेतलेल्या होत्या. सावकारानें या कबुली चिठ्ठयांच्या आधारें फिर्याद करून मूळ कर्जाऊ घेतलेल्या रकमेच्या दुप्पट रकमेपेक्षा अधिक रकम फिर्यादींत वसूल करून मागितली त्या वेळेपावेतों झालेल्या हायकोर्टाच्या निवाड्याअन्वयें दामदुप्पटी पेक्षा अधिक रकम मागता येत नव्हती तथापि त्यानें तशा प्रकारची मागणी केली होती आमच्या पक्षकारातर्फें आम्हीं ही तक्रार प्रामुख्यानें मांडली या दाव्यात पक्षकाराच्या जबाबा होऊन मुकदमा अखेर निकालासाठीं ठेवण्यात आल्यावर फिर्यादींत एका गोष्टीची उणीव सावकारास बाधक होणारी त्या न्याया धिशास दिसून आली ही उणीव म्हणजे कर्जाच्या लेखी कबुलीवरून फिर्याद कायद्याप्रमाणें चालत नाहीं मूळ व्यवहारावरून फिर्याद दाखल केली पाहिजे, ही दोष ही उणिव दूर करण्यास्तव उभय पक्षकारातर्फें दाव्याच्या कामीं तक्रारी एकल्यावर वादीच्या वकिलाकडून फिर्यादीच्या दुरुस्तीचा अर्ज न्यायाधिशानीं स्वत मागून घेतला अर्थात् आम्हीं अर्जास हरकत घेतली परंतु आमची ही हरकत न जुमानता फिर्यादीची दुरुस्ती करून घेऊन दाव्याचा निवाडा दिला रिणकोनें वेळोवेळीं दिलेल्या कर्जाच्या कबुलीच्या लेखात दर तीन वर्षांनीं होणारी व्याजाची रकम सामील केली असली व अशा रीतीनें शेवटच्या कर्जाच्या कबुलींत नमूद असलेल्या रकमेवरील फिर्याद तारखेपर्यंत होणाऱ्या व्याजाच्या रकमेसुद्धा सावकारानें मागणी केली, तरी ती रकम मूळ व्यवहाराच्या रकमेच्या दामदुप्पटीपेक्षा अधिक असली तरी ती वसूल करण्याचा वादीस हक आहे, असा निवाडा न्याया धिशानीं दिला या निवाड्यावर नामदार हायकोर्टांत आमचे पक्षकारानें अपील केलें व तें अपील हायकोर्टानें रद्द करून कनिष्ठ कोर्टाचा ठराव

कायम केला. या अपिलाचा निकाल करणाऱ्यांपैकीं सर नारायण चंदावरकर हे एक न्यायाधीश होते व त्यांनीं आपल्या ठरावात कनिष्ठ कोर्टाच्या या न्यायाधिशाची प्रशंसा केली. या प्रकारच्या या महत्त्वाकांक्षी न्यायाधिशाची बदली होऊन त्यांची नेमणूक अखेर डिस्ट्रिक्ट व सेशन जज्ज या जागेवर झाली. या न्यायाधिशाचें अक्षर कॉपीबुकाप्रमाणें रेखीव असून दाव्याचे निवाड्यात पुराव्याचें व कायद्याचें विवेचन व चर्चा चांगल्या प्रकारें केलेली असे यामुळें वरिष्ठ कोर्टात या न्यायाधिशाचे ठराव क्वचित्च फिरविले जात. या न्यायाधिशाशिवाय लक्षात ठेवण्यासारखे दुसरे दोन न्यायाधीश विद्याव्यासंगी व मराठी वाङ्मयलेखक म्हणून प्रख्याति मिळविलेले होते. याशिवाय विशेष संस्मरणीय गुण अंगीं असलेले अन्य न्यायाधीश आम्हाला आढळले नाहींत.

फर्स्ट क्लास सबजज्ज या हुद्यावर जे अधिकारी आले, त्यांपैकीं कायद्याच्या ज्ञानापलीकडे काहीं अन्य गुण ज्यांच्या ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस आले असे एकच न्यायाधीश आढळण्यात आले. हे न्यायाधीश ज्योतिष विषयात पारंगत होते. त्यांच्या हाताखालीं काम करणारा एक कारकून वकिलीचा अभ्यास करून परीक्षेस बसत असे. एक दोन वेळा परीक्षेस बसला, पण तो परीक्षेत उत्तीर्ण होऊं शकला नाहीं. तेव्हां त्यानें या न्यायाधिशाची भेट घेऊन वकिलीच्या परीक्षेत उत्तीर्ण होण्याचा योग कधीं आहे, असें त्यांना पत्रिका दाखवून विचारलें. त्यावर मुनसफांनीं अमुक वर्षी वकिलीची परीक्षा पास होईल असें त्या कारकुनास सांगितलें व त्याप्रमाणें घडूनहि आलें. या फर्स्ट क्लास न्यायाधिशाशिवाय दुसऱ्या दोघा अन्य फर्स्ट क्लास न्यायाधिशांचीं स्मृतिचित्रें आम्ही पुढें देत आहों.

## निःस्पृह ब्राह्मण न्यायाधीश

आमच्या चार तपांच्या वकिलीच्या काळात आम्हास आढळून आलेल्या एका न्यायाधिशाचें स्मृतिचित्र कित्येक न्यायाधिशांनीं निःस्पृहपणाचा आदर्श म्हणून आपल्यापुढें ठेवण्यासारखें आम्ही येथें देतों. मुंबई विश्वविद्यालयाची कायद्याची पदवी या न्यायाधिशानीं संपादन केली होती. प्रवेशपरीक्षेत संस्कृतभाषेच्या प्राविण्याबद्दल त्यांना जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ति मिळाली होती. यानंतर संस्कृतभाषेचा व्यासंग त्यांनीं कायम ठेविला होता. त्यांचें आचरण निर्व्यसनी व शुद्ध होतें. न्यायाधिशाचें काम करीत असतां त्यांची काम करण्याची पद्धति अशी होती कीं, एकदां त्यांनीं कामास सुरवात केली कीं यंत्राप्रमाणें ते काम करीत कोर्टापुढें चालू असलेल्या दाव्यातील एकाद्या पक्षकाराचा वकील अन्य कामात गुंतल्यामुळें वेळेवर हजर न झाला, तर त्यांची खीर तावडतोब च्हडे कोणत्याहि प्रकारची सवलत वकिलास मिळणें दुरापास्त असे. वकील नामांकित असो कीं नवशिका असो, याबाबतची त्यांची

वर्तणूक ह रतीच असे त्यांचे पुढील दाव्याच्या चौकशीचें काम समाप्त झाल्यावर दाव्याचा अखेर निकाल त्यांच्या नि स्पृह वृत्तीनुसार हे करीत त्यांच्या कारकीर्दीत कोणत्याहि दाव्याचा निकाल निश्चित प्रकारचा त्यांनी केल्याबद्दलची तक्रार वकील मंडळीपैकी कोणीहि केल्याचें आमच्या ऐकिवात नाहीं या त्यांच्या नि स्पृही वर्तना मुळें सर्व वकील वर्गाच मनात त्यांच्याविषयी आदर वसत होता, परंतु वकिलांना कोणत्याहि प्रकारची सवलत न देण्याची त्यांनी जी वागणूक होती, तीमुळें त्यांच्या विषयी वकिलांचे मनांत आत्मीयता फारशी निर्माण झाली नाहीं अशा प्रकारच्या या न्यायाधिशाच्या नि स्पृही वागणुकीविषयी थोडे विस्तारपूर्वक कथन करणें अव श्य आहे आमच्या जिल्ह्यांत त्यांची फर्स्ट क्लास सबज्ज म्हणून नेमणूक झाल्यावर ते या शहरीं येऊन दाखल झाले त्यांना राहण्याकरिता घराची जरूरी होती येथून बदलून गेलेले सबजज्ज ज्या घरात राहात होते, त्या घराच्या मालकानें आपण या घरांत राहावयास यावें, अशी त्यांस आग्रहपूर्वक विनंति केली या त्याच्या आग्रहाचें गूढ प्रथम त्यांच्या लक्षात आलें नाहीं परंतु चौकशी करतां चार आठ दिवसांत त्यांना या आग्रहाचें कारण समजून आलें या घरमालकाचे बरेच दावे दिवाणी कोर्टात दाखल होत असत ज्या मुनसफास घर भाड्यानें दिलेलें असे, त्याचेपुढें हे दावे चौकशीकरितां लावण्याची तजवीज हा मालक करीत असे अशा रीतीनें न्याया धिशास थोडीफार मालकाची भीड स्वामाविकच उत्पन्न होऊन हा गृहस्थ आपला आर्थिक फायदा करून घेत असे चौकशीअंतीं ही गोष्ट या मुनसफाचे कानांवर येताच त्यांनीं या घरमालकास तुमचें घर आम्हास भाड्यानें घेणें नाहीं, असें स्पष्ट सांगितलें याच पक्षकारानें दुसऱ्या एका अन्य मार्गानें या मुनसफाकडून आपला लाभ करून घेण्याचा प्रयत्न केला या मुनसफाचे जामात या जिल्ह्यात नवीन वकील म्हणून नुकतीच वकिली करू लागले होते आपले स्वत चे मुकदमे या न्यायाधिशापुढें वर्ग करून घेण्याची सदर सावकारानें खटपट केली व या न्यायाधिशापुढें निघणाऱ्या एका दाव्यात, अगोदरचा वकील असूनहि या न्यायाधिशाचे जामातास वकीलपत्र दिलें व तो दावा जामातानीं चालविला या दाव्याचा निकाल न्यायाधिशानें योग्य प्रकारें व्हावयाचा तसाच केला व निवाडा देताना त्या पक्षकारास म्हणाले, "हें पहा मिस्टर, असल्या युक्त्या आपण केल्या असता त्यात आपला कांहीं एक फायदा होणार नाहीं एखाद्या वेळीं नुकसान होण्याचा मात्र संभव आहे तरी यापुढें असल्या खटपटी आपण करू नयेत " यानंतर थोडयाच दिवसात या न्यायाधिशाचे जामात, जवळच्या एका जिल्ह्याच्या शहरीं वकिली करण्याकरिता गेले कदाचित् न्याया धिशानें खाजगी रीतीनें आपल्या जामातास हा सल्ला दिला असल्याचाहि संभव आहे या न्यायाधिशाच्या नि स्पृहपणाची कसोटी दुसऱ्या पक्षकाराच्या दुसऱ्या एका कामात आम्हीं लावून पाहिली आमच्या पक्षकाराच्या एका नातेवाइकावर दहा हजाराचा हुकूमनामा झाला होता नातेवाइकानें जिल्हा न्यायाधिशाकडे अपील केलें व पेठेतील एका प्रतिष्ठित व्यापाराची दहा हजाराची जामिनकी देऊन बजावणीची

तहकुबी मिळविली. जिल्हा कोर्टानें कनिष्ठ कोर्टाचा ठराव कायम केल्यावर आमच्या पक्षकारातर्फे आम्ही हुकूमनाम्याच्या बजावणीनी दरखास्त दाखल करून जो प्रतिष्ठित व्यापारी जामीन राहिला होता, त्यास कैद करण्यात येऊन रकम वसूल करून मिळावी असें मागणें केलें. या दाव्यांत आमच्या पक्षकारानें फिर्याद दाखल करतेवेळीं त्याच्या नातेवाइकाचें घर जप्त करून ठेविलें होतें कायद्याप्रमाणें आम्ही जी मागणी केली होती, तीस अनुसरून जामीनदार प्रतिष्ठित सावकारावर कैदी वारंटाचा हुकूम करण्यास कायदेशीर अडथळा कांहीं एक नव्हता परंतु जामीन राहिलेले प्रतिष्ठित सावकार ऑनररी मॅजिस्ट्रेट असून या निःस्पृह न्यायाधिशाच्या परिचयाचे होते. यामुळें जामीनदारावर कैदी वारंटाचें आमचें मागणें त्यानीं नामंजूर करून प्रतिवादीविरुद्ध हुकूमनाम्याच्या बजावणीचें काम आमच्या पक्षकारानें प्रथम सुरू करावें असा हुकूम केला. आमच्या पक्षकारानें अशा प्रकारच्या हुकमानें कांहींएक नुकसान होण्यासारखें नव्हतें हें पाहून या न्यायाधिशानें आपल्या निःस्पृही मनोवृत्तीस थोडी मुरड घालून जामीनदार परिचयाचा असल्यामुळें त्याचेवर हुकुमनाम्याची बजावणी करण्याचें नाकारलें. या उदाहरणावरून न्यायाधीश कितीहि निःस्पृह असला तरी कांटकोरपणें त्याचें वर्तन होऊं शकत नाहीं, हें उघड दिसून येतें.

## मान डोलवणारे गुर्जर न्यायाधीश

### बोलणें फोल झालें । डोलणें वाया गेलें ।

सौजन्यपूर्ण व विनयशील रीतीनें वकिलाशीं वागणारे न्यायाधीश क्वचित् आढळतात. आमच्या अठेचाळीस वर्षांच्या वकिलीच्या कारकीर्दीत असे एक गुर्जर न्यायाधीश आढळण्यात आले. कोणतेंहि काम असो कांहीं कामाकरितां त्याच्याकडे वकील गेले कीं, मोठ्या आदरानें वकिलास या बसा इत्यादि गोड भाषेनें ते त्याचें स्वागत करीत. कित्येक किरकोळ कामात उभय पक्षकाराच्या वकिलाच्या तक्रारी ते आपल्या चेंबरमध्यें ऐकत असत वकिलाचें बोलणें सुरू झालें कीं या मुनसफाची माना डोलविण्यास सुरुवात व्हावयाची. या माना डोलविण्यावरून वकिलाच्या मनांत असा भ्रम उत्पन्न होत असे कीं, आपलें सांगणें न्यायाधिशास पूर्ण पटलें आहे. एका पक्षकाराच्या तर्फेच्या वकिलाचें बोलणें संपलें कीं, दुसऱ्या पक्षकाराच्या तर्फेच्या वकिलाचें बोलणें सुरू होत असे. तें सुरू झालें कीं फिरून या न्यायाधिशाचा माना डोलविण्याचा प्रकार सुरू होत असे. दुसऱ्या वकिलासहि आपलें बोलणें न्यायाधिशास पूर्ण पटलें आहे, असें वाटे. याप्रमाणें दोन्ही वकील भ्रमात पडून स्वरक्षातील तक्रारींची वकिलाची भाषणें ऐकल्यावर न्यायाधीश आपल्यातर्फे निकाल देणार अशी आशा दोन्ही वकिलांच्या मनात उत्पन्न होत असे. कोर्टात महत्त्वाच्या दाव्याच्या तक्रारींचे वेळींहि हाच प्रकार होत असे. परंतु मुनसफाच्या या प्रकारच्या

वागणुकीमुळें वकिलांच्या मनांत उत्पन्न झालेल्या आशांचें न्यायाधिशाचा निवाडा बाहेर पडल्यावर निर्मूलन होऊन वकिलांची मनें खट्ट होत असत. कित्येक न्यायाधिशांच्या पुढें काम चालवीत असतां न्यायाधिशाच्या बोलण्यावरून त्यांच्या मनाचा कल कोणत्या पक्षाकडे आहे व दाव्याचा निवाडा कशा प्रकारचा केला जाईल, याची थोडी फार कल्पना वकिलांस येते. परंतु वकिलांच्या तक्रारी चालू असतांना अगदीं एकाद्या निर्विकार पुतळ्याप्रमाणें तोंडातून एक शब्दहि न काढणारे न्यायाधीश क्वचित् आढळतात. त्यामुळें दाव्याचा निवाडा कोणत्या प्रकारचा होणार याविषयीं कोणतीच कल्पना तक्रारी करणाऱ्या वकिलास होत नाहीं. याशिवाय असल्या प्रकारचा न्यायाधीश लाच खाऊन निवाडा देणारा असला तर दाव्याचा निवाडा बाहेर पडेपर्यंत वकिलांच्या अंतःकरणात धाकधूक असल्याखेरीज राहात नाहीं. बोलणें फोल झालें। डोलणें वायां गेलें। अशी जी म्हण आहे, त्या म्हणीचा प्रत्यय वर वर्णन केलेल्या गुर्जर न्यायाधिशाच्या बाबतींत अनुभवास येत असे.

जे अधिकारी आले, त्यांपैकीं कायद्याच्या ज्ञानाशिवाय अन्य प्रकारचे संस्मरणीय गुण अंगीं असलेले दोन न्यायाधीश आमच्या आढळण्यांत आले. यांपैकीं एक हिंदी न्यायाधीश विद्याव्यासंगी व वेदान्त तत्त्वज्ञानाचे मोठे होते. न्यायाधीश या नात्यानें त्यांची मुंबई इलाख्यात कोठेंहि नेमणूक झाली, तर ते विवाहित होते तरी एकटेच रहात असत. मोठ्या पहाटेस उठून स्नान करण्याची व नंतर दोन तास योगासनें, प्राणायाम, जपजाप्य इत्यादि कर्मांत ते आपला काळ व्यतीत करीत असत. इंग्रजी भाषेवरील त्यांचें प्रभुत्व चांगलें असून ईस्ट- अँड वेस्ट नावाच्या मुंबईस प्रसिद्ध होणाऱ्या मासिक पुस्तकांत त्यांचे लेख 'क्षीरो' या नावानें प्रसिद्ध होत असत. हे न्यायाधीश मोठे दानशूर होते. त्यांची दान करण्याची पद्धत गुप्त असे. दरमहाच्या पगारापैकीं स्वतःच्या खर्चास लागणारी शेसव्वाशें रुपये रकम काढून बाकी हजार बाराशें रुपये ते निरनिराळ्या संस्थांना देणग्या देण्यांत खर्च करीत असत. याप्रमाणें कित्येक वर्षें त्यांनीं आपल्या द्रव्याचा विनियोग केला. दुष्काळांतील अनाथ बालकांचें रक्षण व शिक्षण करण्यासाठीं एक नामांकित संस्था त्यांनीं पुढाकार घेऊन स्थापन केली व तिच्या प्रारंभीच्या काळांत त्या अनाथ बालकांच्या रक्षणार्थ स्वतःच्या पदरचें द्रव्य खर्च केलें. अशा प्रकारचा दुसरा थोर व उदार अंत.करणाचा हिंदी न्यायाधीश गेल्या पन्नास वर्षांत आमच्या पाहण्यात आला नाहीं. मुके, आंधळे, पांगळे आणि थोटे। अशा दुर्दैवांना करा साह्य मोठें॥ अशी एक उपदेशपर कविता पूर्वीच्या पाठ्यपुस्तकांत होती. त्याप्रमाणें वागणारा एक थोर अंत.करणाचा इंग्रज जिल्हा न्यायाधीश आमच्या जिल्ह्यातील न्यायाधिशांत आढळण्यात आला. I C S ची परीक्षा पास झाल्यावर याच जिल्ह्यांत त्यांची असिस्टंट कलेक्टर म्हणून नेमणूक झाली. त्या हुद्यावर बरींच वर्षें काम केल्यावर त्यांची याच जिल्ह्यांत डिस्ट्रिक्ट व सेशन जज्ज म्हणून नेमणूक झाली. इंग्रजी राज्याच्या प्रारंभींच्या काळांत जिल्हा कोर्टाच्या

सरस्वतीपूजनानिमित्त होणाऱ्या निवाड्याच्या दप्तराच्या पूजेसाठीं कांहीं रक्कम मंजूर करून ती दरसाल खर्ची पडत असे. कांहीं वर्षांनंतर हा कार्यक्रम बंद पडला. तथापि मंजूर केलेली रक्कम निराळी ठेवण्यात येत असे. जिल्ह्याचे शहरीं खिस्ती प्रार्थना-मंदिर नसल्यानें आदितवारीं इंग्रज न्यायाधीश जिल्ह्याच्या न्यायालयाचा प्रार्थना-मंदिरासारखा उपयोग करीत. प्रार्थना झाल्यानंतर प्रार्थनेस आलेल्या लोकांकडून धर्मादायाप्रीत्यर्थ कांहीं रक्कम प्रार्थनामंदिरात ठेविलेल्या पेटींत टाकण्याचा खिस्ती लोकांत प्रघात आहे. या प्रघातास अनुसरून प्रार्थनेच्या दिवशीं इंग्रज न्यायाधीश व प्रार्थनेस जमलेले शहरांतील इतर इंग्रज अधिकारी या पेटींत कांहीं पैसा टाकीत. याप्रमाणें पेटींत सांचलेलें द्रव्य व वरील दप्तरपूजेचें द्रव्य अशा सांचलेल्या रकमेचा विनियोग आंधळ्यापांगळ्यांना मदत म्हणून देण्याचा प्रघात एका न्यायाधिशानें सुरू केलेला होता. या इंग्रज गृहस्थाची नेमणूक जिल्हा न्यायाधिशाच्या जागीं झाल्यावर हा प्रघात रयास पर्यंत पडून त्यानें दहा हजार रुपयांचे सरकारी कर्जरोखे विकत घेऊन त्याच्या व्याजाची रक्कम या धर्मार्थ द्रव्यनिधींत सामील करावी व तिचा विनियोग वर दर्शविल्याप्रमाणें करीत जावा, अशी योजना करून तिला सरकारची संमति मिळविली. या दयाळू इंग्रज न्यायाधिशानें करून ठेविलेल्या मृत्युपत्रात यांत आणखी भर टाकण्याकरितां बरीच मोठी रक्कम देण्यात यावी, असें लिहून ठेविल्याचें समजतें. हिंदुस्थानात अनेक वर्षें नोकरी करून फार मोठा पगार अनेक वर्षें घेणारे अधिकारी मुंबई इलाख्यात अनेक होऊन गेले. परंतु हिंदुस्थानांतील दीन दुबळ्या लोकांना थोडेफार द्रव्यसाहाय्य व्हावें अशी कल्पना मनात येऊन या देशात मिळा-लेल्या द्रव्याचा विनियोग अशा प्रकारें करणारा अन्य इंग्रज अधिकारी क्वचितच आढळेल. अगदीं अलीकडे जिल्हा न्यायाधिशात एक तरुण हिंदी विद्याव्यासंगी न्यायाधीश आमच्या आढळण्यात आले. अनेक विषयासंबंधाचें त्याचें ग्रंथवाचन गाढ असून कांहीं विषयावर त्यांनी अधिकारयुक्त लेख लिहिले आहेत. मराठींतील ललित वाङ्मयाचे लेखक म्हणूनहि अल्पकाळात हे न्यायाधीश, कांहीं ग्रंथ व लेख लिहून प्रसिद्धीस आले आहेत. जिल्हा न्यायाधिशाला दिवाणी अपिलाचें काम व फौजदारी खटल्यांचें काम इतकें असतें कीं, हीं सर्व कामें चांगल्या प्रकारें सांभाळून अन्य विषयांकडे म्हणण्यासारखा वेळ त्यांस व्यतीत करावयास मिळत नाहीं. या अडचणीमुळें मराठी भाषेंत ललित व अन्य वाङ्मयांत त्यांचे हातून किती भर पडली जाईल, हें निश्चितपणें सांगता येणें कठीण आहे. गेल्या वीस पंचवीस वर्षांपासून इंग्रज जिल्हा न्यायाधीश येण्याचें या जिल्ह्यात जवळ जवळ बंद पडलें आहे. सर्व हिंदी न्यायाधीशच जिल्हा न्यायाधिशाच्या जागेवर येतात व यापैकीं कित्येक सेकंडक्लास व फर्स्टक्लास सब्‌जज म्हणून काम केल्यावर जिल्हा जजाचे जागेवर नेमिले जातात. अशा प्रकारच्या न्यायाधिशांचें कायद्याचें ज्ञान उत्कृष्ट प्रकारचें असून पुराव्यांची पारख करण्यांतहि ते पारंगत असतात. यामुळें जिल्हा न्यायाधीश या

नात्यानें त्याच्यापुढें येणाऱ्या दिवाणी अपिलांचे निवाडे करण्याचें काम करताना उभयता पक्षकारांच्या वकिलांचीं लांबलचक तक्रारी भाषणें न ऐकतां अगोदर ऐकण्यापूर्वी अपिलांतील सर्व कागदपत्र वाचूनच अपिलाचा निकाल कशा प्रकारें करावयाचा याविषयीं त्याचें मत जवळ जवळ बनलेलें असतें. अपिलाच्या तक्रारी ऐकण्यास सुरवात होताच "कागदपत्र वाचले आहेत, कोणत्या मुद्यावर आपला भर आहे, तेवढ्यापुरतें जें काहीं सांगणें असेल तें सांगा" असें हे न्यायाधीश वकिलांना सांगतात. यामुळें वकिलांचीं लांबलचक तक्रारी भाषणें संपुष्टात येऊन अपिलांचे निकाल फार थोड्या वेळात हे न्यायाधीश करूं शकतात.

## आदरातिथ्यप्रवीण मुसलमान न्यायाधीश

हे मुंबई विश्वविद्यालयाचे कायद्याचे पदवीधर असून एका जिल्ह्याच्या शहरीं गव्हर्मेंट प्लीडर व पब्लिक प्रासिक्यूटर होते मध्यंतरीं ज्याचे जज्जाच्या जागेवर वकील वर्गापैकीं काहीं वकिलांच्या नेमणुका कराव्या असा मुंबई सरकारचा हुकूम निघाला. त्याला अनुसरून मुंबई इलाख्यातील दोन चार वकिलांच्या असि. जज्जाच्या जागेवर नेमणुका होऊन बढती होत होत ते जिल्हा न्यायाधिशाच्या हुद्यापर्यंत चढले यापैकीं एक हे मुसलमान गृहस्थ होते पूर्वाश्रमाचे हे वकीलच असल्यामुळें यांच्या ठिकाणीं वकिलांविषयीं विशेष सहानुभूति होती व ते वकिलांशीं मिळून मिसळून वागत असत काहीं महत्त्वाच्या खटल्यात हे जातीचे मुसलमान असल्यानें काहीं पक्षकारांनीं वकिलपत्रें देऊन अपिलांचीं व अन्य कामें चालविण्या करिता मुंबईचे मुसलमान बॅरिस्टर आणल्याचीं काहीं उदाहरणें घडलीं अशा रीतीनें मुंबईचे बॅरिस्टर आले म्हणजे घुळ्याच्या वकील मंडळींपैकीं काहींना अल्पोपाहारा-करिता बोलावण्याचा प्रघात त्यांनीं सुरू केला. या प्रसंगीं मुंबईच्या बॅरिस्टराचा व येथील आमंत्रित वकिलांचा ते आदरातिथ्यपूर्वक समाचार घेत. खाद्यपेय पदार्थ ते स्वत वकिलांना देत असत. आपण एक मोठे हुद्याचे अधिकारी आहोंत, असा अहंकार त्यांनीं आपले मनात कधीं बाळगिला नाहीं व आपण स्वत. खाद्यपेयादि पदार्थ देणें हें त्यांनीं कधीं कमीपणाचें मानिलें नाहीं, त्यांच्या कारकीर्दीत एकदा त्यांच्या प्रांतांतील मुंबईच्या हायकोर्टांतील वकील, ( जे पुढें हायकोर्टाचे न्यायाधीश झाले, ) ते या जिल्ह्याचे शहरीं कांहीं सरकारी कामानिमित्त आले असतां, त्यांचे पाहुणे म्हणून त्यांच्याकडे उतरले होते. या प्रसंगीं या न्यायाधिशांनीं एक मोठ्या थाटाची मेजवानी त्यांना दिली गावांतील कांहीं वकीलमंडळी व काहीं नागरिक यांना त्यांनीं मेजवानीकरितां बोलाविलें होतें. या प्रसंगीं त्यांनीं स्वत त्या मुलाकडून निमंत्रित पाहुण्यांना खाद्यपदार्थ वाढविले. ते म्हणाले कीं, अशा रीतीनें स्वत अगर मुलाकडून पाहुण्यांचा आदरसत्कार करणें हें मुसलमान समाजांत मोठें भूषणा-स्पद समजलें जातें व याच अनुसरून ही गोष्ट करण्यात कांहीं कमीपणा नाहे,

असें आम्ही समजत नाहीं. पाहुण्याचें आदरातिथ्य करणें हें सर्व जातींच्या लोकांत प्रशंसनीय मानिलें जातें, परंतु त्यांतल्या त्यांत मुसलमान जातींत ही गोष्ट विशेषत्वानें आढळून येते व त्याचा प्रत्यय या न्यायाधिशांचे कारकीर्दींत कांहीं वकील मंडळींना आला.

## जिल्हाजज्जाकडे पाहण्याची पक्षकारांची दृष्टि

जिल्हा न्यायाधिशाकडे पाहण्याची पक्षकाराची दृष्टि कोणत्या प्रकारची असते त्या गोष्टीकडे आम्ही आता वळतों. फर्स्टक्लास सबजज कोर्टांत चालणाऱ्या मोठया व महत्वाच्या दाव्यांत वकिलास वकिलपत्र दिल्यानंतर न्यायाधिशाकडे वळण कोणाचें आहे, हें हुडकून काढण्याच्या खटपटीस पक्षकार जसा लागतो, तसा जिल्हा न्यायाधिशापुढें चालणाऱ्या मोठया व महत्वाच्या दिवाणी अपिलांत अगर फौजदारी खटल्यांत न्यायाधिशाचें वळण कोणाकडे आहे, हें शोधण्याच्या मानगडींत तो पडत नाहीं. याचें कारण जिल्हा न्यायाधिशांत पक्षकाराकडून लांच घेऊन निवाडा करणारे जिल्हा न्यायाधीश नाहींच म्हटलें तरी चालेल. दिवाणी कामांत यश मिळविण्याचा हा प्रयत्न करण्यास मार्ग नसल्यामुळें एका निराळया मार्गाचा अवलंब पक्षकार आपल्या कामांत यश मिळविण्याकरितां करतात. चाळीस पन्नास वर्षांपूर्वीं जिल्हा न्यायाधिशाच्या जागेवर बहुधा इंग्रज असत. त्या काळीं महत्वाचीं मोठीं दिवाणी अपिलें व मोठमोठे फौजदारी खटले चालविण्याकरितां मुंबईचा इंग्रज बॅरिस्टर काम चालविण्याकरितां आणण्याचा प्रघात असे या प्रघाताप्रमाणें अनुसरून मि ब्रॅन्सन हे बॅरिस्टर अनेक सेशन्स खटले चालविण्याकरितां येत असत. याशिवाय काजी कबिरुद्दिन हे मुसलमान बॅरिस्टरहि सेशन्स खटले चालविण्यास येत. कोणता बॅरिस्टर आणावयाचा हें ठरवितांना पक्षकाराचा कल, ज्या जातीचा जज्ज असे त्याच जातीच्या बॅरिस्टराकडे तो खटला सोंपविण्याचा असे. ब्राह्मण जिल्हा न्यायाधीश असल्यास या कलान्वयें खटला चालविण्याकरितां मुंबईचा वकील अगर बॅरिस्टर आणण्याचा परिपाठ दिसून येत नसे. पार्शी अगर मुसलमान न्यायाधीश असल्यास शक्यतोंवर त्या जातीचा वकील अगर बॅरिस्टर आणावयाचा असा पक्षकाराचा कल असल्याचें आमच्या निदर्शनास आलें आहे. एका मोठया मारवाडी सावकारास फर्स्ट क्लास मॅजिस्ट्रेटनें खोटी प्रतिज्ञा व खोटा जमाखर्च केल्याचे आरोपावरून ६०० रु. दंड व दोन महिन्याची सक्त मजुरीची शिक्षा दिली. अपील ज्या जिल्हा न्यायाधिशापुढें चालावयाचें तो पारशी होता. अर्थातच या मारवाड्यानें मुंबईच्या एका पारशी बॅरिस्टरास १००० रु. रोजानें अपील चालविण्यासाठीं आणलें. अपील चालून न्यायाधिशानें खालच्या कोर्टानें केलेल्या ६०० रु. दंडाऐवजीं ८०० रु. दंड केला व सक्तमजुरीची शिक्षा रद्द करून ती कोर्ट उठेपर्यंत केली. सावकाराचा हेतु तुरुंगाच्या दरवाज्याच्या आंत जाण्याचें टाळण्याचा होता, तो साध्य झाला. पैशाची

त्यास पर्वाच नव्हती. त्यामुळें बॅरिस्टरास १००० रु. देऊन २०० रु. अधिक दंड त्यानें भरला.

ब्राह्मण न्यायाधीश असला म्हणजे मुंबईचा बॅरिस्टर आणण्याच्या बाबतीत पक्षकाराचा कल त्या ज्ञातीचाच बॅरिस्टर आणण्याचा आढळत नाहीं असें विधान आम्ही वर केलें आहे. तथापि आम्ही स्वतः पक्षकारांपैकीं एक असलेल्या एका अपिलांत आम्हास या प्रकाराहून अन्य प्रकार आढळून आला. वकील वर्गांपैकीं एका नामांकित वकिलाची असि० जज्ज म्हणून नेमणूक झाली होती. या अपिलाचे कामीं मुंबईचे एक ब्राह्मण बॅरिस्टर अपिलंटतर्फे काम चालविण्यास येणार आहेत असें आम्हास समजलें. काम चालविण्यासाठीं येणारे बॅरिस्टर विद्वान् खरे; परंतु मुंबई हायकोर्टांत नामांकित बॅरिस्टर म्हणून कधींच झळकले नाहींत. असें असता पक्षकारानें या बॅरिस्टरास आपलें काम चालविण्याकरितां का आणलें आहे याचें आम्हास गूढ वाटलें. परंतु थोडक्याच वेळांत हें गूढ उकललें. अपिल चालण्याच्या दिवशीं असि० जज्ज व हे बॅरिस्टर असे दोघे एकाच टांग्यांत बसून कोर्टांत आले. अपिलाची तक्रार ऐकून झाल्यावर त्या दिवशीं अन्य काम बंद ठेवून आमच्याकडे आलेल्या पाहुण्यास पोहोंचविण्यास स्टेशनवर जाणें आहे, असें सांगून असि० जज्ज व सदर बॅरिस्टर एका टांग्यांतून घरीं गेले. त्यानंतर चौकशी करतां असें समजलें कीं, या असि० जज्जाचा व बॅरिस्टराचा स्नेहसंबंध असल्यामुळें पक्षकारानें, न्यायाधिशानें अपिलाचा निवाडा आपल्यातर्फे करावा या हेतूनें या बॅरिस्टराना अपिलाचें काम चालविण्यास आणण्याचा खटाटोप केला. पक्षकाराची बॅरिस्टरला आणण्याची दृष्टि जरी वरील प्रकारची होती तरी न्यायाधिशानीं अपिलाचा निवाडा योग्य प्रकारें केला.

चार तपांच्या आमच्या वकिलीच्या कारकीर्दीत हिंदी न्यायाधिशांपैकीं बहुतेक एक पैशाचाहि पदराला खार लागूं नये अशा मनोवृत्तीचे आढळून आले. दिलदार अंतःकरणाचे व थोडाफार अधिक खर्च करण्याचा मनाचा उदारपणा फार थोड्या व्यक्तींत आढळून आला. एका ब्राह्मण जिल्हा न्यायाधिशानें गणेश चतुर्थीच्या दिवशीं वकील मंडळीस पानसुपारीस बोलाविलें व गणपतीचा प्रसाद म्हणून त्यांना चुरमुरे दिले. दुसऱ्या एका I. C. S. हिंदी जिल्हा जज्जानें वकील मंडळींना उपाहारासाठीं आपल्या बंगल्यावर बोलाविलें. उपाहाराकरिता मोफळाचें भरीत व भजीं हे दोन पदार्थ केले होते. साहेबबहादुरांच्या महार स्वयंपाक्यानें हे सर्व पदार्थ केले असल्यानें व त्या काळीं आहारग्रहणाच्या बाबतींत हल्लींप्रमाणें व्यापक वृत्ति झाली नसल्यानें वकील वर्गानें त्याचा अव्हेर केला. या न्यायाधिशांना श्रीखंड फार आवडत असे. त्यांचें कुटुंब इंग्रजी शिकलेलें व गायनकलेंत थोडेफार प्राविण्य संपादिलेलें होतें. परंतु श्रीखंड कसें करावें हें त्यांना अवगत नव्हतें. घरांत दररोजचा अर्धा शेर दुधाचा रतीब असे. या सर्व अडचणी टाळून आवडतें श्रीखंड अन्य मार्गानें मिळविण्याचा या जज्जसाहेबांनीं प्रयत्न केला. त्यांच्या एका विशेष

परिचित अशा बड्या वकिलास श्रीखंड तयार करून पाठविण्यास विनंति केली. तीवरून त्या न्यायाधिशाना आवडणारें श्रीखंड तयार करून देण्याची त्या वकिलांनी तजवीज केली. याच्या उलट वृत्तीचे दुसरे एक हिंदी न्यायाधीश आमच्या आढळण्यात आले. हे गृहस्थ बुद्धिमान् व कामांत हुशार होते. प्रारंभीं वकीलमंडळीशीं ते तुटकपणानें वागत. परंतु काहीं दिवसानंतर या त्यांच्या वृत्तींत फरक पडला. एका कार्तिकी पौर्णिमेच्या दिवशीं या न्यायाधिशांनीं दोन डबे खोबरेल आणून सर्व बंगलाभर शेंकडों पणत्या लावून आरास केली. हा चमत्कार पाहून कित्येक वकिलाना विस्मय वाटला. पुढे यांची बदली या जिल्ह्यांतून दुसऱ्या जिल्ह्यांत झाली. येथून जाण्यापूर्वी त्यानीं सर्व वकील मंडळीस फार मोठी थाटाची मेजवानी दिली. या प्रकारच्या वृत्तीचे सेकंड क्लास व फर्स्ट क्लास न्यायाधिशांत फारच थोडे लोक आढळले. एका ब्राह्मण न्यायाधिशाच्या कुटुंबाची दुसरी एक गोष्ट सांगण्यासारखी आहे. चैत्र महिन्यांत गौरीच्या हळदकुंकवाचा समारंभ करून सर्व वकिलाच्या कुटुंबाना हळदकुंकवास पाचारण केलें. थाटामाटाची बैठक घालून एका गादीवर सोन्यामोत्याच्या दागदागिन्यांनीं पुजलेल्या मालकीणबाई लोडास टेकून बसल्या होत्या. हळदकुंकवास आलेल्या वकिलाच्या बायकापैकीं कोणाचीहि विचारपूस त्यांनीं केली नाहीं. कारकुनाच्या बायकांकडून चार हरभऱ्याचे दाणे वकिलाच्या बायकाच्या पदरात टाकून बाईसाहेबांनीं त्यांची बोळवण केली. स्वतःच्या वैभवाचें व दागदागिन्याचें प्रदर्शन करण्यासाठीं हा समारंभ घडवून आणला गेला असा हळदकुंकवास जाणाऱ्या वकिलाच्या बायकाचा समज झाला. जिल्हा न्यायाधिशाच्या जागेवर आलेल्या एका इंग्रज अधिकाऱ्याच्या बायकोसंबंधीं कानावर आलेली हकीकत मनोरंजक आहे. पतीवर बाईसाहेब नाखूष असल्यास पति बाहेरून आले कीं, पंधरा वीस मिनिटें उन्हात उभें राहण्याची शिक्षा त्या फर्मावीत व हे न्यायाधीश ती शिक्षा निमूटपणें भोगून नंतर बंगल्यात प्रवेश करीत. येथपावेतों तालुका व जिल्हा न्यायाधिशापैकीं अनेक व्यक्तींची लक्षात ठेवण्यासारखीं काहीं स्मृतिचिन्हें जीं आम्हीं वर्णिलीं तीं वाचकास मनोरंजक वाटल्यावांचून राहणार नाहींत.

---

प्रकरण ७ वें

## मुंबई हायकोर्टाचे न्यायाधीश

## व

# हायकोर्टातील बॅरिस्टर व वकील

मुंबई येथील नामदार हायकोर्ट ही मुंबई इलाख्यातील सर्वांत श्रेष्ठ प्रतीची न्यायदान देणारी संस्था असून या संस्थेची न्यायदानाची एक विशिष्ट पद्धति आहे. आम्ही स्वत हायकोर्टात वकिलीचा धंदा केलेला नाहीं तथापि कनिष्ठ कोर्टांत चाललेल्या कामातील ठरावावर हायकोर्टात अपिलें दाखल करण्याची अनेक कामें आम्हास करावीं लागल्यामुळें हायकोर्टाची न्यायदान पद्धति, त्यात न्याय देणारे न्यायाधीश व हायकोर्टात काम करणारे बॅरिस्टर, वकील व सॉलिसिटर्स यांच्याशीं कामानिमित्त आमचा संबंध अनेक वेळा आल्यामुळें आम्हास याविषयींची जी माहिती आहे, ती माहिती प्रस्तुत स्थळीं नमूद करितों.

मुंबई हायकोर्टाच्या मुख्य दोन शाखा आहेत. एक अव्वल शाखा (Original side) व दुसरी अपेलेट साईड. याशिवाय निव्वळ पैशाच्या व्यवहारासंबंधीं जे वाद रक्कम रु. २००० चे आतील रकमेचे मुंबई शहरवासीयांत उत्पन्न होतात, त्याच्या निवाड्याचें काम करणारी स्मॉल कॉज कोर्ट नावाची एक न्यायदान देणारी अन्य संस्था आहे. स्मॉल कॉज कोर्टात काम करणारे पाच सहा न्यायाधीश असतात व त्यात एक मुख्य न्यायाधीश असतो. कित्येक वर्षेपावेतों मुख्य न्यायाधीशाच्या जागीं मुंबई हायकोर्टात वकिलीचा धंदा करणाऱ्या इंग्रज बॅरिस्टरची नेमणूक करण्याचा प्रघात होता. अलीकडे हा प्रघात बंद पडला असून हिंदी बॅरिस्टरची किंवा वकिलाची नेमणूक या जागेवर होऊं लागली आहे. मुख्य न्यायाधीशाशिवाय अन्य न्यायाधीश हे बहुतेक निरनिराळ्या शर्तींचे हिंदीच लोक असतात. तालुका अगर जिल्ह्याच्या ठिकाणच्या दिवाणी कोर्टाची काम करण्याची जी पद्धत, त्या पद्धतीप्रमाणेंच या कोर्टाचें काम सामान्यपणें चालतें.

## मुंबईच्या ऑरिजिनल साईडकडील वादाच्या निर्णयाची पद्धति

मुंबईच्या स्मॉल कॉज कोर्टाच्या अधिकारांतील वादाच्या पद्धतीहून ही पद्धति भिन्न प्रकारची असते. रक्कम रु. २००० पेक्षा अधिक रकमेचे दावे, त्याचप्रमाणें देवघेवीशिवाय अन्य स्वरूपाचे दावे यांची चौकशी करून निवाडा करण्याचा अधिकार हायकोर्टाच्या ओरिजिनल साईडचे न्यायाधीश करितात. मुंबई बेटाव्यतिरिक्त मुंबई

इलाख्यातील अन्य ठिकाणी जीं न्यायालयें आहेत, त्या न्यायालयात दाखल होणाऱ्या फिर्यादीस ज्याप्रमाणें कोर्ट-फी-स्टँप द्यावा लागतो तसा कोर्ट-फी-स्टँप द्यावा लागत नाहीं. ओरिजिनल साईडकडे दाखल होणाऱ्या फिर्यादी, सालिसिटरची परीक्षा उत्तीर्ण झालेला जो एक मोठा कायदेपंडिताचा वर्ग आहे त्यापैकीं सालिसिटरकडून तयार केल्या जाऊन दाखल होतात. या खटल्याच्या अखेर चौकशीपर्यंतचें सर्व काम पक्षकारातर्फे सालिसिटर हाच करितो. खटल्याची अखेर चौकशी न्यायाधिशापुढें सुरू झाली म्हणजे सॉलिसिटर त्या खटल्यातील पक्षकार, साक्षीदार यांच्या जबान्या घेण्याकरिता व सर्व पुरावा झाल्यानंतर न्यायाधिशापुढें तक्रारी सांगण्याकरिता बॅरिस्टरची नेमणूक करितो व सालिसिटरनें तयार करून दिलेल्या विस्तृत टिपणान्वयें बॅरिस्टर खटल्याचें काम अखेरपर्यंत चालवितो. हायकोर्टाची ओरिजिनल साईड ( अव्वल शाखा ) कशा रीतीनें अस्तित्वात आली, याचा थोडासा पूर्वेतिहास या स्थळीं नमूद करणें जरूर आहे.

इ. स. १८१८ सालात इंग्रजांची महाराष्ट्रावर राजकीय सत्ता प्रस्थापित होण्यापूर्वी अरबी समुद्राच्या किनाऱ्यालगतचें मुंबई बेट पोर्तुगीज राजसत्तेखालीं होतें. हें बेट पोर्तुगालच्या राजकन्येचें लग्न इंग्लंडच्या राजाशीं लागल्यावेळीं पोर्तुगीज राजानें इंग्लंडच्या राजास आंदण दिलें. अशा रीतीनें इंग्रजांची राजकीय सत्ता या बेटावर प्रस्थापित झाली. तेव्हा या बेटात राहणाऱ्या प्रजेत उत्पन्न होणाऱ्या वादाचा निवाडा करण्यास्तव न्यायालयें स्थापन करणें इंग्रजांना प्राप्त झालें तेव्हा इंग्लंड देशात ज्या प्रकारच्या न्यायदान देणाऱ्या संस्था त्या काळीं अस्तित्वात होत्या व जी न्यायदानपद्धति अस्तित्वात होती, त्याप्रमाणेंच येथें न्यायदान संस्था व न्यायदानपद्धति इंग्रजांनीं सुरू केली. कित्येक वर्षांनीं ज्या मराष्ट्र प्रदेशात मुंबई बेट आहे, त्या सर्व प्रदेशावर इंग्रजांची राजकीय सत्ता प्रस्थापित झाली. यानंतर ईस्ट इंडिया कंपनीनें मुंबई हायकोर्ट अस्तित्वात येण्यापूर्वी सदर दिवाणी अदालत या नावाची न्यायदान संस्था सुरू केली. या संस्थेची एक अव्वल शाखा ( Original side ) व दुसरी शाखा मुंबई शहराखेरीज अन्य ठिकाणच्या न्यायदानसंस्थांच्या ठरावावर केल्या जाणाऱ्या अपिलाचा निवाडा करणारी शाखा ( Appellate side ) अशा दोन शाखा निर्माण झाल्या. ईस्ट इंडिया कंपनीचे हातातील राज्यकारभार व्हिक्टोरिया राणीनें इंग्लंडची राणी व हिंदुस्थानची बादशाहीण या नात्यानें स्वत:कडे घेतल्यावर सदर दिवाणी अदालत ही न्यायसंस्था बंद करून इंग्लंडच्या पार्लमेंटानें मंजूर केलेल्या कायद्यान्वयें प्रस्तुतचा मुंबई हायकोर्टाची स्थापना झाली व या न्यायदान देणाऱ्या संस्थेंत पूर्वीप्रमाणेंच Original side व Appellate side अशा दोन शाखा अस्तित्वात आल्या.

हायकोर्टाची स्थापना झाल्यापासून त्यांत नेमणूक येणाऱ्या न्यायाधिशाविषयीं अल्प माहिती या स्थळीं देणें युक्त होईल. हायकोर्टाची स्थापना होण्यापूर्वी ईस्ट इंडिया कंपनीचे कारकीर्दीत सदर दिवाणी अदालत या नांवाची जी संस्था

होती, त्या संस्थेचे न्यायाधीश इंग्रज असत त्या काळीं हिंदी लोकांपैकीं कोणीं न्यायाधीश नेमल्याचें उदाहरण आढळत नाहीं हायकोर्टाची स्थापना झाल्यानंतरही या पूर्वपद्धतीस अनुसरून विलायतेंतील बॅरिस्टराची न्यायाधिशाचे जागीं नेमणूक करण्याचा प्रघात होता याशिवाय I C S पास झालेल्या गोऱ्या अधिकाऱ्या पैकीं जिल्हा न्यायाधिशाचें काम केलेल्यापैकीं काहीं इंग्रज 'सिव्हिलियनाची हायकोर्ट जज्जाच्या जागेवर नेमणूक करण्यात येत असे मुंबई हायकोर्ट जज्ज या नात्यानें पहिल्या हिंदी गृहस्थाची प्रथम नेमणूक करण्यात आली, ते गृहस्थ कै नानाभाई हरिदास हे होत त्यांच्या पश्चात् कै. न्यायमूर्ति तेलंग यांची नेमणूक सदर जागीं करण्यात आली. कै तेलंग यांचे पश्चात् न्यायमूर्ति रानड्यांना, त्यांच्या उत्तरवयात, हा मान मोठया मुष्किलीनें देण्यात आला महाराष्ट्र देश हा मराठयाकडून इंग्रजांनीं जिंकून घेतलेल्या प्रदेशापैकीं असल्यामुळें या प्रदेशातील लोकाविषयीं व त्यातल्या त्यात बुद्धिमान् ब्राह्मण वर्गातील लोकाविषयीं इंग्रज नोकरशाहीचें मन नेहमीं साशक असे इंग्रजी राज्याची स्थापना झाल्यानंतर इंग्रजाची नोकरी करावयाची नाहीं, अशा शपथा रत्नागिरींतील ब्राह्मण लोकांनीं घेतल्याचा उल्लेख लाच खाल्ल्याच्या आरोपावरून कमिशनमार्फत ज्या क्रॉफर्ड या नावाच्या बड्या इंग्रज अधिकाऱ्याची चौकशी करण्यात आली, त्यानें ही गोष्ट प्रसिद्ध केलेल्या एका ग्रंथात नमूद केली आहे, परंतु काल, परिस्थिति व जीवनास लागणाऱ्या द्रव्यप्राप्तीची अडचण यापुढें सर्व ब्राह्मणास हात टेकावे लागले व इंग्रजाची नोकरी करावयाची नाहीं या त्यांच्या शपथा दोन वर्षानंतर अतर्धान पावल्या इंग्रजी राज्याच्या सुरुवातीस त्याचें राज्य यंत्र चालविण्याकरिता दुय्यम दर्जाच्या इंग्रजी शिक्षण घेतलेल्या तरुण व होतकरू लोकांची त्याना फार जरूरी होती ब्राह्मण वर्गापैकीं दरेच लोक इंग्रजपूर्वकालात वेदाध्ययन, शास्त्राध्ययन, भिक्षुकी, उपाध्यायवृत्ति करून आपला चरितार्थ चालवीत या लोका पाशीं बुद्धीची वाण नव्हती संस्कृत भाषा व संस्कृत विद्या याच्यापासून चरितार्था साठीं लागणारें द्रव्य प्राप्त होण्याचा संभव दुरावत असे याचा अनुभव येताच या बुद्धिमान् वर्गातील अनेक लोकांनी दुय्यम शाळात शिक्षण घेऊन इंग्रजी भाषेचें ज्ञान आत्मसात् केलें यामुळें ब्रिटिश राजवटीच्या सुरुवातीस जीं निरनिराळीं खातीं, इंग्रजी व मुलकी चालण्यासाठीं निर्माण करण्यात आलीं, त्या सर्व खात्यात या तरुणाना भराभर नोकऱ्या मिळू लागल्या व इंग्रज राज्यकर्त्यांची राज्यकारभार चालविण्यास लायक लोक मिळण्याबाबतची एक मोठी अडचण दूर झाली या प्रमाणें स्वतःच्या स्वार्थासाठीं जरी इंग्रजराज्यकर्त्यांनीं या लोकांना आपल्या हाताशीं घेतलें, तरी या लोकांवर इंग्रज अधिकाऱ्यांचा विश्वास क्वचित् असे इंग्रजी राज्याच्या प्रारंभीच्या काळात Rules on Maratha Instutitions या हस्तलिखित ग्रंथात ग्रंथकर्त्यानें ब्राह्मण लोकांविषयीं अभिमान व्यक्त केला आहे तो खालीं दिलेला आहे

Brahmins it may well be said,—they are good servants but bad masters. As servants, when kept in their *(p.428)* proper station they are useful, active and intelligent. At present they are without method and wedded to their own practice, but much may be made of them in a few years, if strictly controlled in every respect All Brahmins spoken of generally are intriguing, false and cunning and where they have power, they are coolly unfeeling and systematically oppressive, those who have been in the military service of the late Government or Residents and visitors at Bajee-Rao's Durbar, are by far the worst people, I have ever had any intercourse with, they may all be considered discontented, and nothing but fear prevents their becoming treasonable and treacherous. The gross indecencies tolerated and encouraged among Brahmins and Brahmin females by Bajee Rao, are by no means general, and I never heard any person defend or even attempt to excuse such behaviour The Brahmin *(p. 429)* women, although their fidelity and chastity are too often more than questionable, are upon general comparison with other native women correct in their conduct and demeanour. They are rarely taught to read and write, but their more intelligent male relations, and their constant occupation in public, render them far more prudent than Mahrattas and Mohommedans.

—*" Notes on Mahratta Institutions."*

या उताऱ्यावरून ब्राह्मण वर्गाविषयीं इंग्रजांच्या मनांत कोणत्या प्रकारच्या कल्पना वसत होत्या, हें दिसून येतें. मुंबईचे एके काळचे गव्हर्नर सर रीचर्ड टेंपल यांनीं लिहिलेल्या एका ग्रंथांत मुंबई इलाख्यांत इंग्रजी राज्याचे शत्रू कोणकोणत्या जातींचे आहेत, याविषयींचा आपला अभिप्राय त्यानें नमूद करून त्यांच्याविषयीं इंग्रज राज्यकर्त्यांनीं फार सावधगिरी बाळगिली पाहिजे, असें मत व्यक्त करून ठेविलें आहे. या अभिप्रायांत इंग्रजी राज्याचे शत्रू म्हणून कोंकणस्थ, देशस्थ ब्राह्मण, कऱ्हाडे ब्राह्मण व मराठे या जातींचे लोक आहेत असें नमूद केलें आहे.

इंग्रजांची मनोवृत्ति महाराष्ट्रीय ब्राह्मण वर्गाविषयीं अशा प्रकारची असल्या-कारणानें कोणत्याहि महत्त्वाच्या जबाबदारीच्या जागेवर हिंदुस्थानांतील अन्य

प्रांतात त्याप्रमाणें हिंदी लोकांच्या नेमणुकी करण्यात आल्याचें आढळतें, त्याप्रमाणें मुंबई इलाख्यात ब्राह्मण वर्गापैकीं कोणाची जबाबदारीच्या जागेवर नेमणूक केल्याचें आढळून येत नाहीं. कै. न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे याची नेमणूक हायकोर्ट जज्जाच्या जागीं वास्तविक कै. तेलंग याचेपूर्वींच व्हावयास पाहिजे होती; कारण न्या. रानड्याची विद्वत्ता, अनेक विषयावरील ग्रंथाचें गाढ वाचन, व्यासंग व त्याचप्रमाणें कायद्याच्या शास्त्रांतील त्याची पारंगतता या विषयींची त्याची प्रसिद्धि सन १८९० सालापूर्वींच झालेली होती व मुंबई इलाख्यांतील बड्या अधिकाऱ्यांच्या मनांत त्याची बुद्धिमत्ता व विद्वत्ता याविषयीं परम आदर वसत होता. असें असूनहि न्यायाधिशाच्या जागीं त्याची नेमणूक केली न जाता बॅरिस्टर म्हणून थोडीं वर्षे काम केलेल्या तेलंगासारख्याची नेमणूक केली गेली. हुशारी, विद्वत्ता व कायद्याचें ज्ञान इत्यादि बाबतींत तेलंग हे रानड्यापेक्षा कांहीं कमी होते असे नाहीं. परंतु कै. न्या. रानडे हे जरी बरींच वर्षे सरकारी नोकरींत होते, तरी त्यांच्याविषयीं नोकरशाहीच्या गोटांत जो एक दूषित पूर्वग्रह वसत होता, त्यामुळें मुंबई हायकोर्टाच्या जज्जाच्या जागेवर त्यांची नेमणूक करण्यात धोका आहे, अशी त्यांना भीति वाटत होती. रानड्यांच्या पश्चात् हायकोर्ट वकिलांपैकीं कांहीं लोक प्रस्तुत त्या जागेवर त्या दर्जाचे असतांना नेमणूक केली जाते, त्या दृष्टीनें न्यायाधिशाच्या जागेवर नेमण्यास लायक असे कांहीं वकील हायकोर्टांत होते परंतु मुंबई इलाख्यात वरिष्ठ व जबाबदारीच्या जागा देण्याऱ्या बाबतींत इंग्रज सरकारची विशिष्ट ज्ञातींच्या विषयींची साशंक वृत्तीच नेहमीं आड आल्यावाचून राहात नसे. मुंबई हायकोर्टांत रानड्यांच्या पश्चात् हायकोर्टाच्या न्यायाधिशाच्या जागेवर जे कांहीं नामांकित कायदेपंडित होते, त्यांपैकीं एक कायदेपंडित दाजी आबाजी खरे बुद्धिमान् व कायद्यात पूर्ण निष्णात असे होते. परंतु त्यांचा व कै. लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांचा स्नेहसंबंध असल्यामुळें हे वकील जरी नेमस्त राजकारणी गटापैकीं होते, तरी मुंबई सरकारनें त्यांची हायकोर्ट जज्जाच्या जागेवर कधींहि नेमणूक केली नाहीं. गेल्या दहा बारा वर्षांपासून इंग्रज सरकारच्या या धोरणांत बरेंच स्थित्यंतर घडून आलें आहे. प्रस्तुत हिंदी कायदेपंडितांपैकीं कित्येकांच्या नेमणुका हायकोर्ट जज्जाच्या जागीं झाल्या आहेत व आज मितीस तरी हिंदी न्यायाधिशाचें प्रमाण इंग्रज न्यायाधिशापेक्षा अधिक आहे.

मुंबई हायकोर्टांचे मुख्य न्यायाधीश प्रारंभींच्या काळात कित्येक नामांकित इंग्रज बॅरिस्टर असत. मुख्य न्यायाधिशाच्या जागीं इंग्रजाचीच नेमणूक करावयाची हा परिपाठ मुंबई हायकोर्टांत आजपावेतों चालू आहे. इंग्रज मुख्य न्यायाधीश रजेवर गेला असता त्याच्या गैरहजेरींत हिंदी न्यायाधिशाची तात्पुरती मुख्य न्यायाधीश म्हणून नेमणूक झाल्याचीं कांहीं उदाहरणें आहेत. परंतु हिंदी कायदेपंडिताची मुख्य न्यायाधिशाच्या जागीं नेमणूक झाल्याचें उदाहरण आजपावेतों एकहि घडलेलें नाहीं. पंजाब प्रांतात आर्थर सर शादीलाल यांची मुख्य न्यायाधीश म्हणून नेमणूक कांहीं

वर्षांपूर्वी करण्यात आली होती. इंग्लंडातील ज्या बॅरिस्टरांना वकिलीचें काम विशेष नसतें व ज्यांना तिकडील एकाद्या बडया माणसाचा वशिला असतो अशापैकीं इंग्रज कायदेपंडिताची मुख्य न्यायाधीश म्हणून हिंदुस्थानांतील एकाद्या हायकोर्टांत नेमणूक होते. इंग्लंडातील पहिल्या श्रेणींतील जे बॅरिस्टर असतात, त्यांची वार्षिक प्राप्ती इतकी मोठी असते कीं त्यांना हिंदुस्थानातील हायकोर्टाच्या न्यायाधिशाच्या जागेवर येण्याचा मोह कधींच होणें शक्य नाहीं; यामुळें इंग्लंडातील नामांकित कायदेपंडित मुख्य न्यायाधीश म्हणून हिंदुस्थानांत कधीं आलेला आढळत नाहीं. परंतु इंग्रज नोकरशाहीचें हें धोरणहि यापुढें फार दिवस टिकणें शक्य दिसत नाहीं व थोडयाच काळात मुंबई हायकोर्टाचे सर्व न्यायाधीश हिंदी असल्याचें दृश्य दिसून येईल. ५० वर्षांपूर्वी हायकोर्टाच्या न्यायाधिशाच्या जागेवर गोऱ्या बॅरिस्टरांपैकीं सामान्य प्रतीच्या बॅरिस्टराची वजनदार व्यक्तीच्या वशिल्यानें नेमणूक झाल्याचीं काहीं उदाहरणें आढळतात. मुंबई हायकोर्टांत एक नामांकित बॅरिस्टर शिहाच्या शिकारीचे शोकी होते. त्यांचा एक सामान्य गोरा बॅरिस्टर स्नेही होता. हे दोघेहि एका प्रदेशात शिहाच्या शिकारीकरिता गेले असतां नामांकित बॅरिस्टर त्याच्या स्नेह्यास म्हणाला, "अरे मी तुला हायकोर्ट जजाची जागा देववितों तूं ती पत्करशील काय ?"

हा प्रश्न ऐकताच तो म्हणाला, "बरें आहे, माझी शिफारस करून जजाचे जागेवर नेमणूक करा ती जागा मी स्वीकारीन." याप्रमाणें बोलणें झाल्यावर नामांकित बॅरिस्टरानें मुंबई सरकारच्या बडया अधिकाऱ्याकडे वशिला लावून आपल्या स्नेह्याची हायकोर्ट जज म्हणून नेमणूक करविली. याप्रमाणें या गृहस्थाची नेमणूक झाल्यावर बरेच वर्षे हायकोर्टाचे न्यायाधीश या नात्यानें हे काम करीत असत. त्यानें आपल्या सबंध कारकीर्दीत चारपाचापेक्षा अधिक निवाडपत्रें (Judgments) लिहिलीं नाहींत. ते न्यायाधीश खुर्चीवर अपिलाच्या कामातील वकिलाच्या तक्रारी ऐकण्यास सुरवात झाली कीं, थोडयाच वेळात अरबी समुद्राच्या पश्चिमेकडील गार वारा लागून निद्रावश होऊन घोरूं लागत व जवळ बसलेल्या न्यायाधिशाला त्यांना जागें करावें लागे. असलीं काहीं वशिल्याचीं तट्टें त्या काळीं हायकोर्टाचे न्यायाधिशाच्या जागेवर नेमलीं जात असत. I C S ची परीक्षा पास झालेल्या गोऱ्या डिस्ट्रिक्ट जजाच्या अंगीं हायकोर्ट जज होण्याची पात्रता नसतांना अशा गृहस्थाची निवड वशिलेबाजीनें हायकोर्टाच्या जजाच्या जागेवर झाल्याचीं काहीं उदाहरणें आढळतात

आमच्या जिल्ह्यातील I. S C. ची परीक्षा पास झालेले एक गोरे न्यायाधीश इंग्लंडातील एका श्रीमंत व थोर घराण्यातले होते. त्यांचें कायद्याचें ज्ञान बेताचेंच होतें. दिवाणी अपिलें त्यांच्याकडे निकालाकरिता जीं नेमण्यात येत त्यात अपील अगदीं क्षुल्लक स्वरूपाचें असलें तरी वकिलांच्या तक्रारीचें टिपण करण्याचा त्यांचा दंडक असे. याप्रमाणें दोन्ही वकिलांच्या तक्रारींचीं ३।३, ४।४ पानें टिपणें ते लिहून घेत. अखेर कनिष्ठ कोर्टाचा ठराव ते कायम करीत. त्यांच्या येथील जजाच्या

जागेच्या कारकीर्दीत एकाहि ठराव त्यानीं फिरविल्याचें उदाहरण घडलें नाहीं. अशल्या प्रकारच्या या सामान्य गृहस्थाची हायकोर्ट जज्जाच्या जागेवर नेमणूक केली जाणें ही आश्चर्य करण्यासारखी गोष्ट तर खरीच; परंतु इंग्रजी राजवटींत ही गोष्ट वशिलेबाजीनें केली जात असे. आता भरतखंडास स्वातंत्र्य व स्वराज्य प्राप्त होऊन हिंदी लोकांच्या हातांत राज्यकारभाराचीं सूत्रें आलीं असलीं तरी हाच प्रकार पूर्वीप्रमाणें किंचित् अधिक प्रमाणातहि आढळून येतो. मानवी स्वभाव लक्षात घेता असले प्रकार हे अपरिहार्य आहेत असेंच शेवटीं म्हणावें लागतें.

## बॅरिस्टर, सॉलिसिटर्स व हायकोर्ट वकील

हायकोर्टाच्या अव्वल शाखेकडे व अपील शाखेकडे वकिली करणाऱ्या कायदेपंडितांत अनेक नामांकित कायदेपंडित होऊन गेले. अव्वल शाखेकडे दावे चालविणाऱ्या कायदेपंडितांत महाराष्ट्रीय कायदेपंडित क्वचित् आढळतात. प्रारंभीच्या काळात या शाखेकडे काम करणारे बरेच इंग्रज कायदेपंडित आढळून येत असत. परंतु अलीकडे या क्षेत्रांतून त्यांची जवळजवळ हकालपट्टी झाल्याचें दिसतें. या शाखेकडे काम करणारे बहुसंख्य कायदेपंडित गुजराथी, पारशी, मुसलमान या जातींपैकीं आढळतात. याचें कारण अव्वल शाखेकडील बहुतेक सर्व पक्षकार या जातींतील व्यापारी वर्गांपैकीं असतात व त्यांचीं सर्व कामें याच जातींच्या सॉलिसिटर्स-कडून चालविलीं जात असल्यामुळें दाव्याचे अखेर चौकशीचे वेळीं स्वज्ञातीच्या नामांकित कायदेपंडिताकडे हे सॉलिसिटर्स दावा चालविण्याचें काम सोंपवितात. हाय-कोर्टाच्या स्थापनेपासून तों आजतागायत ही स्थिति कायम आहे. अपील शाखेकडे मात्र याच्या अगदीं उलट प्रकार आढळून येतो. या शाखेकडे अपिलाचीं कामें चालविणारे बहुसंख्य वकील महाराष्ट्रीय आढळतात. याशिवाय कर्नाटकी व गुजरात प्रांतस्थ कायदेपंडित थोडे फार या शाखेकडे काम चालविणारे आहेत. हायकोर्ट हें इलाख्यांतील श्रेष्ठ प्रतीचें न्यायालय असल्याकारणानें हायकोर्टांतील बॅरिस्टर, सॉलिसिटर्स व वकील यांच्या ठिकाणीं श्रेष्ठ प्रतीचें कायद्याचें ज्ञान असावें लागतें. याशिवाय न्यायाधिशांचीं मनें आकर्षित करण्याची भाषाशैली व हातोटी यांचे ठिकाणीं असावी लागते. हायकोर्टांत काम करणारे बरेच लोक अशा प्रकारचे असतात. हायकोर्ट वकिलांच्या ठिकाणीं या गुणाशिवाय या कोर्टांत काम चाल-विणाऱ्या वकिलांच्या ठिकाणीं स्वतंत्र बाणा व निर्भयवृत्ति वास्तविक अधिक असा-वयास पाहिजे. परंतु आमचा स्वतःचा या बाबतींतला अनुभव विचित्र प्रकारचा आहे. सन १९०८ सालांत लोकमान्य टिळकावर खटला होऊन त्यांची मंडालेला रवानगी झाल्यावर मुंबई इलाख्यांतील निरनिराळ्या जिल्ह्यांच्या ठिकाणीं राजकारणांत त्यांना मदत करणारे जे दुय्यम पुढारी होते, त्यांच्यावर कांहीं तरी कुसपट काढून फौजदारी खटले करण्याचा उपक्रम नोकरशाहीनें सुरू केला. या जिल्ह्यांतील एक

टिळकांच्या अनुयायांवर एका छापखान्याचा प्रिंटर व पब्लिशर या नात्यानें राजद्रोही ग्रंथ छापून प्रसिद्ध केल्याबद्दल खटला केला. हा ग्रंथ म्हणजे 'एकश्लोकी' गीता हा होय. ग्रंथ लिहिणारा एक संन्यासी होता. त्या ग्रंथांत या संन्याशानें भगवद्गीतेंतील सर्व तत्त्वज्ञान त्या ग्रंथांतील खालील श्लोकांत आलें आहे, असें प्रतिपादन केलें आहे.

तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ॥
मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्य संशयः ॥ ७ ॥ (अ. ८, श्लो. ७)

कित्येक आध्यात्मिक कल्पनांचें विवेचन करीत असतांना स्वराज्य, स्वातंत्र्य, साम्राज्य इत्यादि शब्द या ग्रंथांत ग्रंथकारानें उपयोगांत आणिले होते. त्या काळीं मुंबई इलाख्यांत प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथांचें वाचन व तपासणी ओरिएंटल ट्रान्सलेटरच्या ऑफिसांतील सरकारी नोकराकडून केली जात असे. या ग्रंथाचें प्रथम वाचन या ऑफिसांतील एका पारशी गृहस्थानें करून त्यांतल्या अर्ध्याअधिक भागाचें त्यानें भाषांतर केलें होतें. उरलेल्या भागाचें भाषांतर एका B. A, LL. B. ची पदवी घेतलेल्या सारस्वत ब्राह्मणानें केलें होतें. हे सारस्वत गृहस्थ कांहीं वर्षांपूर्वी या जिल्ह्यांत जॉइंट सबजज्ज या अधिकारपदावर असतां त्यांचेकडून या ग्रंथाविषयींची वरील माहिती आम्हांस मिळाली. याप्रमाणें ग्रंथाचें भाषांतर झाल्यानंतर यांत राजद्रोह भरलेला आहे, असा ओरिएंटल ट्रान्सलेटरचा समज होऊन ग्रंथकर्ता संन्यासी व ग्रंथ ज्या छापखान्यांत छापला गेला त्याचे मुद्रक व प्रकाशक, टिळकांचे राजकीय अनुयायी यांचेवर राजद्रोहाचा खटला भरण्यांत आला. त्या वेळीं या जिल्ह्याचे डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट एक पारशी गृहस्थ होते. त्यांच्यापुढें हा खटला चालून ग्रंथकारावर राजद्रोहाचा आरोप व मुद्रक आणि प्रकाशक यांजवर वरील गुन्ह्याचे मदतगार म्हणून आरोप शाबीत धरून ग्रंथकर्त्यास एक वर्षाची साधी शिक्षा व मुद्रक-प्रकाशकास दोन महिन्यांची साधी शिक्षा फर्माविली. हा निवाडा डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनें एप्रिल व मे महिन्यांत उन्हाळ्याच्या सुट्टीनिमित्त हायकोर्ट बंद असतें, अशा सुमारास दिला. उन्हाळ्याच्या सुट्टीनिमित्त बहुतेक हायकोर्ट वकील बाहेर गांवीं जातात व आमचे अपील शाखेकडे काम करणारे नातेवाईक हेहि तेथें नसल्यानें कोणातरी अन्य अनुभविक वकिलास मुद्रक व प्रकाशकाचें वकिलपत्र देऊन त्यांची जामिनावर सुटका करण्याच्या खटपटीकरितां आम्ही मुंबईस गेलों. ते वेळीं नेमस्त पक्षांतील एक प्रख्यात वकील मुंबईसच असल्याचें समजलें व अशा खटल्यांतील ठरावावरील अपिलाचें काम त्यांचेकडे देणें युक्त, असें वाटून आम्ही त्यास भेटलों व सर्व कागदपत्र त्यांना दाखविले व मुद्रक आणि प्रकाशक यांचें वकिलपत्र आपण तावडतोब दाखल करून आरोपींची जामिनावर तावडतोब सुटका करावी अशी त्यांना विनंति केली. आश्चर्याची गोष्ट अशी कीं, त्यांनीं आम्हांस साफ सांगितलें कीं हें अपील मजकडे देऊं नका व मी तें घेणारहि नाहीं. हायकोर्टाच्या कोणा अन्य वकिलाकडून हें अपील

दाखल करुन घ्या अपील घेण्याचें नाकारताना त्याची चर्या व बोलण्याची पद्धत या सर्वांवरून हें एक महत्संकट त्याच्यावर आलें आहे व हें अपील घेणें म्हणजे राजद्रोहाचा गुन्हाच आपल्या हातून होत आहे की काय असें त्यांच्या चर्येवरून दिसलें. राजकारणात मतभेद असला, तथापि राजकारणातील विरुद्ध पक्षाच्या एकाद्या गृहस्थावर फौजदारी गुन्हा शाबीत होऊन त्यास शिक्षा झाली, तर वरिष्ठ कोर्टाकडे त्याच्या वतीनें अपील करणें हें वकिलीच्या धंद्याच्या शिष्टाचाराच्या विरुद्ध आहे, असें आम्हास वाटत नाहीं, तथापि या वकिलांनीं वकीलपत्र घेण्याचें नाकारल्यामुळें आमचें मन जरा कष्टी व खट्टू झालें. फिरून या वकिलाना या कामीं वकिलपत्र घेण्याचें नाकारू नये, अशी विनंति केली, तेव्हा त्यांनीं मुंबईस ते वेळीं असलेल्या दुसऱ्या एका वकिलीचा धंदा करण्यास नुकताच प्रारंभ केलेल्या एका वकिलाचें नाव आम्हास सुचवून त्याच्याकडे गेल्यास ते हें काम घेतील असें आम्हास सांगितलें त्यावरून आम्ही त्या गृहस्थाची भेट घेतली व अपिलाचे कामीं वकीलपत्र घेऊन अपीलअर्ज व जामीनअर्ज तयार करण्यास त्याना सांगितलें. त्यांनीं कोणत्याहि प्रकारच्या हरकती न दाखविता वकीलपत्र घेतलें व सर्व कागदपत्र ताबडतोब तयार केले आरोपीस जामिनावर सोडविण्याचा अर्ज एकाद्या नामांकित बॅरिस्टराकडून करवावा, असें आम्हीं ठरविलें होतें. त्या वेळीं फौजदारी काम चालविण्यात निष्णात असे एक नामांकित गोरे बॅरिस्टर मुंबईतच होते. त्याची भेट घेऊन जामीन अर्जाचें काम हायकोर्टाच्या न्यायाधिशापुढें चालवावें अशी विनंति केली. आमच्या कल्पनेपेक्षा फारच थोडी रकम घेऊन या बॅरिस्टरासह आम्ही अपील व जामीनअर्ज मंजूर करून घेण्याकरिता गेलों. बॅरिस्टराचे हातात त्यानें मागितलेली रकम आम्ही दिली, ते वेळीं एक चमत्कार दृष्टास पडला, तो हा कीं, ही रकम हातीं पडताच या बॅरिस्टरकडे चोप्याचे पैसे घेणें होते, तो बगल्याबाहेर बसला होता, त्यास त्यानें ती दिली हा बॅरिस्टर म्हणजे खो-यानें पैसे ओढणारा अशा पहिल्या श्रेणींतील कायदेपंडित होता. याप्रमाणें त्यानें संपत्ति मिळविली असूनहि घोड्याची घुणावळ देण्याइतकेहि त्याजपाशीं पैसे नसावे, याचें आम्हास आश्चर्य वाटलें. आमच्या बरोबरच्या हायकोर्ट वकिलाशीं यासंबंधीं आम्ही बोलत असता मदिरा व जुगार या पायीं या कायदेपंडिताचें मिळविलेलें द्रव्य खलास झालें असून प्रस्तुत त्याची स्थिति हलाखीची असल्याचें कळलें. हायकोर्टाच्या न्यायाधिशापुढें बॅरिस्टरानें जामीनअर्ज दाखल करताच न्यायाधिशानें आरोपीस जामिनावर सोडण्याचा हुकूम केला व तो हुकूम तारेनें जिल्हा मॅजिस्ट्रेटकडे कळविण्याची तजवीज केली. या सर्व हकिकतीवरून हायकोर्टा सारख्या श्रेष्ठ न्यायकोर्टात काम करणाऱ्या कायदपंडिताचा अशा प्रकारचा स्वतंत्र बाणा व निर्भयवृत्ति असावी, तशी दिसून येत नाहीं, ही शोचनीय गोष्ट समजली पाहिजे. याप्रमाणें या मुद्याविषयींची चर्चा केल्यानंतर या अपिलाचा अखेर निकाल काय झाला, हें प्रस्तुत स्थळीं नमूद करणें युक्त होईल. मुद्रक व प्रकाशक यांचेतर्फे दाखल केलेल्या अपिलाची अखेर चौकशी हायकोर्टात उघडल्यावर लवकरच झाली.

दोघा गोऱ्या न्यायाधिशापुढें हें अपील चौकशीसाठीं नेमण्यात आलें होतें. या दोघां न्यायाधिशांपैकीं एकाच्या मर्जीतले नुकतेच आलेले गोरे बॅरिस्टर यांना अपिलाचें काम चालविण्याकरिता नियोजित करण्यात आलें. अपिलाचे सुरुवातीसच एकश्लोकी गीतेतील मजकूर राजद्रोही स्वरूपाचा आहे, असें मानिलें तरी ग्रंथाच्या मुद्रकास व प्रकाशकास राजद्रोहाच्या गुन्ह्यास मदत करण्याचा आरोपीचा उद्देश होता, असें पुराव्यानें सिद्ध झाल्याशिवाय राजद्रोहाच्या गुन्ह्यास मदत केल्याबद्दल त्यास जबाबदार धरतां येत नाहीं, अशी त्यानें तक्रार केली. डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटपुढें खटला चालू असतां फिर्यादीतर्फे एकश्लोकी, गीताग्रंथ मुद्रक व प्रकाशक यांनें वाचला होता, असा पुरावा फिर्यादीतर्फे पुढें आणला गेला नव्हता. याशिवाय हा मुद्रक व प्रकाशक अन्य व्यवसाय करणार असून कायद्याप्रमाणें छापखाना चालविणाराला मुद्रक व प्रकाशक म्हणून डेक्लेरेशन करावें लागतें म्हणून त्यानें डेक्लेरेशन केलेलें आहे व छापल्या जाणाऱ्या मजकुराचें वाचन व तपासणी अन्य माणसाकडून केली जाते, इत्यादि मुद्दे या बॅरिस्टरानें पुढें मांडल्याकारणानें राजद्रोहास मदत करण्याचा आरोपीचा उद्देश फिर्यादीतर्फे शाबीत करण्यात आला नाहीं, असें नामदार हायकोर्टानें ठरवून आरोपीस निर्दोषी ठरविलें. हायकोर्टाचा हा निवाडा योग्य प्रकारचाच म्हटला पाहिजे. या खटल्यातील दुसरा आरोपी संन्यासी याची गत व एकश्लोकी गीता ग्रंथाची गत काय झाली, याविषयीची थोडी हकीकत प्रस्तुत स्थळीं देणें थोडें मनोरंजक होईल. मे महिन्याची सुटी संपून हायकोर्ट उघडल्यावर या खटल्यातील संन्याशाचें अपील आमच्या नातेवाईक वकिलाकडून दाखल केलें. संन्याशाअवाच्या दृष्टीनें जेलमध्यें राहाणें किंवा बाहेर राहाणें हें सरळें असल्याकारणानें त्याची जामिनावर सुटका करण्याचा प्रश्नच करण्यात आला नाहीं. हें अपील दाखल झाल्यानंतर थोड्याच दिवसात एक गोरा न्यायाधीश व कै. सर नारायण चंदावरकर यांच्यापुढें असेर चौकशीसाठीं निघालें. संन्याशातर्फे अपील चालविण्यासाठीं बॅरिस्टर न देतां तें आमच्या नातेवाईक वकिलांनीच चालविलें. हा ग्रंथ राजद्रोही असल्यामुळें ग्रंथलेखकावर राजद्रोहाचा खटला करावा, असा हुकूम ओरिएंटल ट्रॅन्सलेटरनें या ग्रंथाचें इंग्रजी भाषांतर वाचून दिला होता. ओरिएंटल ट्रॅन्सलेटरला मराठीचें ज्ञान नव्हतें व या ग्रंथाच्या वन्हाचहा भाषांतराचें काम करणाऱ्या पारशी गृहस्थाच, या ग्रंथातील मर्म समजण्यास लागणाऱ्या मराठी भाषेचें ज्ञान, कितपत होतें याची शंकाच आहे. अपिलाचा निकाल करणाऱ्या दोघा न्यायाधिशांपैकीं सर चंदावरकर हे न्यायाधीश मराठी जाणणारे होते. अपील चालवितांना आमच्या नातेवाइकांनीं राजद्रोही स्वरूपाचा आक्षेपार्ह मजकूर मूळ मराठी ग्रंथापासून वाचून दाखवून भाषांतर करणाराच्या मराठी भाषेच्या अज्ञानामुळें या मजकुराचें मर्म न समजतां त्याचें त्यानें चुकीचें भाषांतर कसें केलें आहे, हें आपल्या तक्रारींत विशद करून दाखविलें. याप्रमाणें संन्याशातर्फे तक्रार मांडण्यात आल्यावर या अपिलाचा तावडतोब निकाल न्यायाधिशांनीं वकिलाचा तक्रार संपताच तत्काळ सांगितला. मुद्रक व

प्रकाशक यांच्या अपिलाच्या कामीं ग्रंथांतील मजकूर राजद्रोही स्वरूपाचा आहे, असें गृहीत धरून त्या अपिलाचा निकाल केला गेला असल्यामुळें ग्रंथांतील मजकूर खरोखरच राजद्रोही स्वरूपाचा आहे कीं कसें या मुद्याचा निर्णय न करता संन्यासी आरोपीस दिलेल्या बारा महिन्यांच्या शिक्षेपैकीं त्यानें भोगलेली तीन महिने शिक्षा वजा करून बाकीची ९ महिन्यांची शिक्षा रद्द करण्यात येऊन संन्याशास बंधमुक्त करण्यांत यावें, असा निवाडा दिला. मूळ लेखाच्या भाषांतरावरून एखादें लिखाण राजद्रोही ठरविणें कसें धोक्याचें आहे याचें, हा खटला हें उत्कृष्ट उदाहरण आहे. या खटल्याचें अखेरपर्यंतचे शोकपर्यवसायी असें झालें! अखिल हिंदुधर्मीयांना पूज्य वाटणाऱ्या भगवद्गीतेंतील एका श्लोकाचें विस्तारपूर्वक विवेचन करणाऱ्या या ग्रंथाच्या छापखान्यांतील प्रती नोकरशाहींतील राजकर्तांत जप्त करण्यात येऊन डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटचे बंगल्यावर त्याची होळी करण्यात आली.

मुंबई इलाख्यांत राजद्रोहाच्या खटल्याची साथ सन १८९७ सालीं लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांच्यावर जो राजद्रोहाचा खटला प्रथम झाला तेव्हां पासून सुरू झाली. या खटल्याची चौकशी डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट व फर्स्ट क्लास मॅजिस्ट्रेट यांना जरी करण्याचा अधिकार असे, तरी हे खटले महत्त्वाचे असल्याकारणानें प्रारंभींच हे खटले नामदार हायकोर्टाकडेच चौकशीसाठीं वर्ग करण्यात आले. लो. टिळकांवर राजद्रोहाचा खटला झाला, त्या वेळीं महाराष्ट्रांतील शिकलेल्या लोकांची इतकी गाळण उडून गेली कीं, राजरोस अगर गुप्त रीतीनें या खटल्याचे कामीं लोकमान्यांचा बचाव करण्याकरितां एखाद्या नामांकित बॅरिस्टरास द्यावा लागण्यासाठीं उभारलेल्या द्रव्यनिधीस मदत करण्याचें धैर्य क्वचित् आढळून आलें. बंगाल्यांतल्या परप्रांतातील टिळकांचे स्नेही व अमृतबझार पत्रिकेचे संपादक बाबू मोतीलाल घोष यांनीं लोकमान्यांच्या बचावासाठीं द्रव्यनिधि गोळा करण्यास प्रारंभ केला. त्यानंतर महाराष्ट्रांतील कित्येक लोकांनीं राजद्रोहाचा आरोप आलेल्या इसमाच्या बचावार्थ द्रव्याची मदत देणें गैर नाहीं, असें समजून या निधीस आर्थिक साह्य केलें.

---

· प्रकरण ७ वें

# दाव्याची चौकशी व अखेर निकाल

कायदे-पंडितांच्या जगतांत 'Justice delayed is justice denied' अशी सर्वश्रुत उक्ति आहे. कोणत्याहि दाव्याचा निकाल करण्यास न्यायाधिशानें विलंब लावला तर त्याचा अर्थ त्या दाव्याच्या वादी-प्रतिवादीस न्याय देण्याचें

नाकारण्यासारखें होतें. ब्रिटिश सत्तेच्या पूर्वकालांत व त्यानंतरच्या ब्रिटिश राजवटींत न्याय देण्याचे कामीं फार विलंब लागे, असें तत्कालीन ऐतिहासिक साधनावरून दिसून येतें. मुसलमानी व मराठा राजवटींत वतनासंबंधीं वादाचे निवाडे होण्यास फार विलंब लागे, परंतु इतर वादाचे बाबतींत मात्र म्हणण्यासारखा विलंब होत नसे. याचें कारण निवाडे करणाऱ्या ग्रामपंचायती, त्यांच्याकडे निर्णयास येणाऱ्या वादाचा निकाल म्हणण्यासारखा विलंब न लावता करीत. इंग्रजी राजवटींत न्यायदानास फार विलंब लागतो, असे उद्गार अनेक सरकारी अधिकाऱ्यांनीं काढलेले आढळतात. पंचायतीपेक्षां ज्या इंग्रज न्यायाधिशाकडे वादाचे निवाडे करण्याचें काम असे, त्यास एतद्देशीय भाषाचें ज्ञान नसल्यामुळें व विशिष्ट पद्धतीनें निवाडा करण्याचें तंत्र कायद्याप्रमाणें ठरविलें गेलें असल्याकारणानें त्यास अनुसरून जरूर ती तजवीज करण्यास विलंब लागत असे. निरनिराळ्या प्रांतांत दिवाणी व फौजदारी अदालतींची त्याचप्रमाणें हायकोर्टाची व त्याच्या अधिकाराखालीं चालणाऱ्या जिल्हा व तालुक्याच्या न्यायाधिशाचीं कोर्टें स्थापन झाल्यावर न्यायदानास विलंब लागूं नये म्हणून कोणत्याहि वादाचा निर्णय होतां होईतों एक वर्षाचे आंत करण्यांत आला पाहिजे, असा निर्बंध कनिष्ठ कोर्टांवर हायकोर्टानें घातला. अशा निर्बंध अस्तित्वांत असूनहि वादग्रस्त दाव्याच्या निकालास दोन दोन तीन तीन वर्षें लागतात व फौजदारी खटल्यांतील अपिलांखेरीज दिवाणी कोर्टांचे न्यायनिवाड्यावर हायकोर्टांत केलेल्या अपिलाच्या निवाड्यास तीन तीन, चार चार वर्षें लागल्याचीं अनेक उदाहरणें आढळतात. अशा प्रकारचा विलंब लागल्यामुळें दिवाणी दाव्याच्या निवाड्यावरील अपिलांत घडून येणारे कांहीं चमत्कार यापुढें आम्ही दिले आहेत.

जिल्हा व तालुका कोर्टांत दिवाणी दावे दाखल झाल्यावर सिव्हिल प्रोसीजर कोडमध्यें नमूद केलेल्या पद्धतीनें त्या दाव्याचें काम चालवावें लागतें. दाव्याचे कामांत प्रतिवादीस समन्स लागलें म्हणजे तो हजर होऊन त्याची लेखी तक्रार कोर्टांत दाखल होण्यास चारपांच महिने लागतात. त्यानंतर दाव्यांतील वादग्रस्त मुद्दे न्यायाधीश निश्चित करतो. याप्रमाणें मुद्दे निश्चित झाल्यावर उभयता पक्षकाराचा लेखी पुरावा दाखल करण्यास कांहीं काळ लागतो. हा पुरावा दाखल झाल्यावर उभयतां पक्षकाराकडून त्यांच्यातर्फे जे साक्षीदार त्यांना यावयाचे असतात त्यांच्या याद्या दाखल होतात. या सर्व विधीस जवळ जवळ आठ नऊ महिने लागतात. त्यानंतर हायकोर्टाच्या निर्बंधाप्रमाणें निवाड्यास दोन तीन महिनेच शिल्लक राहत असल्यामुळें साक्षीदारांना साक्षी समन्सें काढण्याचे बाबतींत दक्षता घेण्यांत येते. त्यानंतर दाव्याचा निकाल तांतडीनें करण्यात येईल, अशा न्यायाधिशाचा तगादा सुरू होतो. साक्षीदारास समन्सें लागून ते हजर झाल्यावर मुकदम्याची चौकशी न झाल्यामुळें त्यांना पुढील तारखेस हजर राहण्याविषयीं ताकीद देण्यांत

येते. अशा तऱ्हेचा प्रकार दोन तीन चार चार वेळा घडल्यामुळें पक्षकारास अकारण खर्च करावा लागतो. तालुका न्यायाधिशाचे कोर्टात साक्षीदार हजर झाले म्हणजे सरकारी भत्त्याशिवाय त्याना खूष ठेवण्याकरितां त्यांचे जेवणखाण व चहापाणी व अलीकडे गांवोगांवीं सिनेमागृहें सुरू झाल्यामुळें साक्षीदाराना सिनेमा पाहण्याकरितां पक्षकारास न्यावें लागतें. यप्रमाणें साक्षीदाराच्या मुखसोयींची सर्व सोय करूनहि अशा प्रकार चार पांचदा घडला म्हणजे न्यायाधिशाचे अंगात मुकदम्याचा निवाडा तत्काल करण्याचें वारें संचारलें, म्हणजे दाव्याचे कामीं साक्षीदार हजर नाहींत म्हणून साक्षीपुरावा नसल्यानें न्यायाधीश तो दावा चौकशी न करितां काढून टाकतो. वास्तविक न्याय करणाऱ्या अधिकाऱ्यानीं हा सर्व प्रकार लक्षांत घेऊन दावा न काढतां मुकदम्याची चौकशी तारीख पुढें नेमून त्या तारखेस कोणत्याहि प्रकारची सबब न सांगतां पक्षकारानें त्याचे साक्षीदार हजर ठेवले पाहिजेत असें त्यास निक्षून सांगणें युक्त असतें. कित्येक सुज्ञ न्यायाधीश हा मार्ग अवलंबितात. परंतु कित्येक आडमुठे न्यायाधीश पक्षकारास 'कोर्ट फी स्टॅंप' व साक्षीसमन्सें व भत्ता यांप्रीत्यर्थ होणारा जबरदस्त पैशाचा खर्च याची यत्किंचित्‌हि पर्वा न करितां दावा काढून टाकतात. यप्रमाणें दावा काढून टाकला म्हणजे न्यायाधिशाचे हुकुमावर अपील करण्याचा फिरून पक्षकाराचे डोक्यावर खर्च पडतो या सर्व प्रकाराचा अर्थ प्रारंभीं आम्हीं जी उक्ति दिली आहे, त्या उक्तीप्रमाणें न्यायदान नाकारण्यासारखाच होतो. असल्या दाव्यांतील एकादा पक्षकार गरीब असला व अपील करण्यास लागणारें द्रव्य त्याला न मिळालें तर त्याची तक्रार खरी व न्याय्य असली तरी अपील न केल्यामुळें त्याचें आर्थिक नुकसान होऊन तो सपशेल बुडतो. अशा रीतीनें झालेल्या निवाड्यावर जिल्हा कोर्टांतील सुज्ञ न्यायाधीश कनिष्ठ कोर्टाचा हुकूम रद्द करून मुकदम्याची चौकशी करण्याकरितां तो परत कनिष्ठ कोर्टाकडे पाठवितो. परंतु जिल्हा न्यायाधीशहि आडमुठा असला तर तेथेंहि पक्षकारास न्याय मिळत नाहीं, व नामदार हायकोर्टाकडे पक्षकारास फिरून धाव घ्यावी लागते. अशा प्रकारची अनर्थ परंपरा ज्या पद्धतींतून निर्माण होते, ती सदोषच समजली पाहिजे. आम्हीं ज्या कोर्टांत काम करीत होतों, तेथीच वादग्रस्त दिवाणी दाव्याची संख्या फार वाढल्यामुळें एका जादा न्यायाधिशाची मुद्दाम नेमणूक करण्यांत आली व सांचलेल्या अशा दाव्याचा तत्काल निवाडा करण्याची त्यास आज्ञा देण्यांत आली. हे न्यायाधीश सुज्ञ असल्यामुळें त्यांनीं प्रथम दुवर्षी खटले त्यांच्याकडे निकालास आलेल्या दाव्याचे कामांतील वकिलास बोलावून असें सांगितलें कीं दाव्याच्या चौकशीच्या तारखेस कोण ताहि प्रकारची सबब न ऐकतां पक्षकार हजर ठेवतील त्या साक्षीदाराच्या जबान्या घेऊन दाव्याचे निवाडे मी करणार आहे. तरी पक्षकारांनीं व त्यांच्या वकिलांनीं याबद्दल दक्षता घेऊन साक्षीदार दाव्याचे चौकशीचे तारखेस हजर ठेवण्याची जबाबदारी घ्यावी. याप्रमाणें प्रथम न्यायाधिशानें वकिलास बजावून सांगून नंतर एका मुकदम्याची चौकशी पुरी झाली कीं दुसरे

दिवशीं कोर्ट डायरींत जे तीन चार मुकदमे चौकशीसाठीं नेमले असतील त्यांतील वकिलास बोलावून ज्या दाव्यांतील साक्षीदार हजर असतील, त्या दाव्याची चौकशी करण्यात येईल असें वकिलास सांगून पक्षकार व साक्षीदार बाबत हजर राहण्याविषयीं उभयता पक्षकाराच्या वकिलास ताकीद देण्यात येत असे. याप्रमाणें या न्यायाधिशानें प्रत्येक महिने काम करून कोणाचीहि तक्रार करता येणार नाहीं अशा पद्धतीनें अनेक दाव्यांचे निवाडे केले. अशा पद्धतीनें काम करणारे न्यायाधीश क्वचित् आढळतात.

न्यायदानाचे कामीं विलंब लागण्याचें कारण एकाद्या कोर्टांत दाखल होणाऱ्या वादग्रस्त दाव्यांची संख्या फार मोठी असून एकट्या न्यायाधिशास या सर्व दाव्यांचे निवाडे करण्याचें काम झेंपण्याबाहेरचें असतें हें होय.

दाव्याच्या निवाड्यास विलंब लागण्यास वकिलाकडूनहि हरकती उपस्थित होतात. आमच्या या जिल्ह्यात पक्षकारानें एकादें काम वकिलाकडे सोंपविलें म्हणजे वकिलास त्याचे मेहनतीबद्दल जी रक्कम देण्याचा करार पक्षकार करतो ती त्याचेकडून वकिलास ठराव करतेवेळीं मिळत नाहीं. बहुतेक सर्व पक्षकार होता होईल तों दाव्याच्या अखेर निकालाच्या तारखेपर्यंत वकिलाची फी देण्याची टाळाटाळ करीत असतात. कारण बहुतेकांचा समज वकील फुकट पैसे घेतात असा असतो. दाव्याचा निकाल आपल्या विरुद्ध झाला तर वकिलास दिलेले पैसे फुकट जातील या भीतीनें पक्षकार पैसे देत नाहींत. अशा दाव्याचे कामीं दाव्याचे चौकशीस सुरुवात होण्यापूर्वी करारप्रमाणें सर्व पैसे हातीं पडावे असें वकिलांचें धोरण असल्यामुळें, मुकदम्यांची चौकशी लांबविण्याचे प्रयत्न जाणून बुजून वकिलाकडून होतात. अखेर न्यायाधिशाकडून खटल्याची चौकशी लांबणीवर टाकणें शक्य नाहीं, असें दिसून आल्यावर पैसे हातीं न आले तरी खटल्याचें काम निरुपायास्तव चालविण्यास तो वकील तयार होतो. खटल्याच्या निवाड्यास विलंब लागण्याच्या या कारणाशिवाय कित्येक वेळा अन्य कोर्टांत वकील गुंतल्यामुळें अथवा आजारामुळें खटल्याच्या चौकशीस वकिलाकडून विलंब केला जातो. याशिवाय या विलंबाचें आणखी एक कारण कोणत्या प्रकारचें असतें याविषयीं येथील एका वकिलानें पुण्याच्या एका नामांकित व धूर्त वकिलाची हकीकत आम्हास सांगितली ती येथें आम्ही नमूद करतों.

दाव्याची चौकशी सुरू झाली असतां प्रतिपक्षाकडून कोणत्या प्रकारचा पुरावा येणार आहे, हें माहीत पडल्यावर त्या पुराव्याच्या दृष्टीनें आपल्या पक्षकारातर्फे जो पुरावा द्यावयाचा त्याचा विचार करून जरूर ती तजवीज करण्याकरिता महत्त्वाच्या मुकदम्याच्या कामीं चौकशीचे तारखेस पक्षकार मयत झाल्याची हातात तार पडण्याची तजवीज करावयाची. अशा रीतीनें मुकदम्याची चौकशी तारीख पुढें ढकलावयाची जरूर ती तजवीज केल्यावर एक दोन महिन्यानंतर पक्षकार मेल्याची तार कोणी त्याचे वाईटावर असणाऱ्या इसमानें खोटी दिली, सबब मुकदम्याची

चौकशी तारीख नेमण्यात यावी असा अर्ज करून आपला इष्ट हेतु साध्य करून घ्यावयाचा. अशा प्रकारच्या युक्त्या करणारे वकील फारच क्वचित् असतात. . .

वादग्रस्त दाव्याचे निवाडे करण्याचें काम आणखी एका कारणाकरिता कांहीं वकिलांकडून लांबणीवर टाकण्याचे प्रयत्न होतात. एकाद्या न्यायाधिशापुढें अखेर निकालाकरिता महत्त्वाचा व वादग्रस्त दावा नेमला गेला, त्याचा योग्य प्रकारें निवाडा करण्याची पात्रता न्यायाधिशाचे ठिकाणीं नसली, तर तो मुकदमा चालू असता न्यायाधिशाच्या त्या हुकमावर तपासणी अर्ज मंजूर करण्यात येतो अशा एकाद्या बाबीसंबंधीं न्यायाधिशाकडे अर्ज द्यावयाचा, या अर्जावर न्यायाधिशानें केलेला हुकूम पक्षकाराच्या हिताचा नसल्यानें पसंत न पडला तर त्या अर्जाची व त्यावरील हुकमाची सहीशिक्क्याची नक्कल घेऊन हायकोर्टांत तपासणी अर्ज दाखल करून तो मंजूर करून घेण्याची तजवीज करावयाची. याप्रमाणें तपासणीअर्ज मंजूर होऊन नामदार हायकोर्टाकडे कागदपत्र गेले म्हणजे वर्ष दोन वर्षेपावेतों त्या मुकदम्याची चौकशी स्थगित होते. नर्मदेतील गोट्याप्रमाणें एका अल्पबुद्धी न्यायाधिशापुढें नेमण्यात आलेल्या खटल्याचे कामीं या पद्धतीनें मुकदम्याचा अखेर निकाल दोन वर्षे लांबविण्यात आला. अखेर हायकोर्टांतून तपासणी अर्जाचा निकाल होऊन दाव्याचे कागद अव्वल कोर्टाकडे परत आले. तथापि त्या न्यायाधिशापुढें हा दावा चालू होता, त्या न्यायाधिशाची बदली न होता तो कायमच होता. वकिला-नें केलेली ही चलती निष्फळ ठरून पक्षकाराच्या दुर्दैवानें त्या दाव्याचा निवाडा त्या पक्षकाराविरुद्ध झाला. पक्षकाराच्या हिताकरिता अशा प्रकारच्या चलत्या वकिलांना निरुपायास्तव कराव्या लागतात, व कांहीं वेळा त्या यशस्वी होऊन पक्षकाराचा फायदाहि होतो.

या भागाचे प्रारंभीं दाव्याचे निवाडे होण्यास विलंब झाला असता कांहीं चमत्कार कसे घडून येतात असें जें आम्हीं विधान केलें होतें, त्याचीं एकदोन ठळक उदाहरणें येथें नमूद करतों. तीं उदाहरणें लक्षात घेतलीं असता त्या पक्ष-काराचा अधिक आर्थिक लाभ होतो ते कदाचित् असें म्हणतील कीं अशा प्रकारचा विलंब लागला तर त्याचा अर्थ "Justice delayed is justice gained." असा केला तर तो गैर होणार नाहीं.

नागपूर कोर्टांत एका हिंदु एकत्र कुटुंबांतील विधवेनें कुटुंबांतील सहभागी-दारांच्या संमतीवाचून दत्तक घेतला व त्याचेकडून वडिलोपार्जित एकत्र कुटुंबाच्या मालकीच्या स्थावर-जंगम मिळकतीची त्याच्या हिश्श्याची मिळकत मिळण्याबद्दल दावा केला. पूर्व स्मृतींतील वचनास अनुसरून सहभागिदारांच्या संमतीवाचून विधवे-नें दत्तक घेतल्यामुळें तो कायदेशीर होत नाहीं, व त्या दत्तकास वडिलोपार्जित मिळकतीची वांटणी करून हिस्सा मागतां येत नाहीं असें ठरवून कनिष्ठ कोर्टानें त्याचा दावा रद्द केला. या दाव्याचा निकाल त्या कोर्टानें करण्यापूर्वी अशा स्वरूपा-च्या दुसऱ्या एका दाव्याचा दुसऱ्या एका कनिष्ठ कोर्टानें निवाडा केला होता. त्या

निवाड्यावर पक्षकारानें नागपूर हायकोर्टांत अपील दाखल केलें होतें. त्याची चौकशी होऊन त्याचा निवाडा हायकोर्टानें प्रारंभीं नमूद केलेल्या दाव्याच्या निवाड्यानंतर दिला. हायकोर्टानें असें ठरविलें कीं सहभागिदाराच्या संमतीवाचून विधवेनें जरी दत्तक घेतला तरी तो पूर्णपणें कायदेशीर असून त्याला दत्तक मुलगा या नात्यानें हिस्सा मागता येतो. याप्रमाणें हायकोर्टाचा निवाडा होऊन तो कायद्याच्या पुस्तकात प्रसिद्ध झाल्यावर ज्या दत्तकाच्या विरुद्ध कनिष्ठ कोर्टानें निवाडा केला होता, त्यानें आपली कंबर अपील करण्यास कसली व डिस्ट्रिक्ट कोर्टांत निवाड्यावर अपील दाखल केलें. हायकोर्टाचा निवाडा मान्य न करण्याचा कल डिस्ट्रिक्ट जज्ज याचा असल्यामुळें त्यानीं कनिष्ठ कोर्टाचा ठराव कायम केला. तरी पक्षकारानीं निराश न होता डिस्ट्रिक्ट जज्ज याचे ठरावावर हायकोर्टांत अपील दाखल केलें. दरम्यान नागपूर हायकोर्टानें दत्तक कायदेशीर ठरविण्याचा जो निवाडा दिला होता, त्यावर प्रिव्हीकौन्सिलकडे अपील दाखल झालें. एकदोन वर्षांनंतर प्रिव्हीकौन्सिलनें हायकोर्टाचा निवाडा कायदेशीर आहे, असें ठरविलें.

याप्रमाणें प्रिव्हीकौन्सिलचा निवाडा होऊन तो प्रसिद्ध झाल्यावर, डिस्ट्रिक्ट जज्जाचे ठरावावर नागपूर हायकोर्टानें केलेलें अपील अखेर चौकशीसाठीं निघालें, व डिस्ट्रिक्ट जज्जाचा ठराव रद्द करून हायकोर्टानें एकत्रित कुटुंबातील विधवेनें सहभागिदाराची संमती न घेता दत्तविधान केलें असलें तरी तें पूर्ण कायदेशीर असून अशा दत्तकास वडिलोपार्जित एकत्रित कुटुंबाच्या मिळकतींचा हिस्सा पृथक् करून मागण्याकरिता वाटणीचा दावा करिता येतो.

मुंबई हायकोर्टाच्या न्यायाधिशानें एक तत्व अनेक वर्षें मान्य करून त्या तत्वास अनुसरून निवाडे करण्याची प्रथा बरेच दिवस पाडली होती. हें तत्व म्हणजे "हिंदु एकत्रित कुटुंबातील सहभागीदार संततीवाचून मृत पावला व त्याची मिळकत त्याच्या माऊवदांस हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें वारसा हक्कानें मिळाली तर सहभागीदाराच्या माहेनें दत्तक घेतला तरी त्यास दत्तक या नात्यानें अन्य भागिदारास वारसा हक्कानें मिळालेली मिळकत कायद्याप्रमाणें परत घेतां येत नाहीं. या नामदार हायकोर्टाच्या तत्वावर अलीकडे कांहीं वर्षें नागपूर हायकोर्टानें कित्येक वर्षें स्वीकारलेली प्रथा सोडून याशी लागली. गेल्या पाच दहा वर्षांत या मुद्यासंबंधीं हायकोर्टाचे झालेले निवाडे लक्षात घेता ही गोष्ट स्पष्टपणें दिसून येते. हिंदु कायद्याच्या अनुयायाच्या मिळकतीच्या वारसा व अन्य हक्कांबद्दल एके वेळीं मान्य करण्यात आलेल्या तत्वाचा त्याग करून तीं बेकायदेशीर ठरवून त्यांचेऐवजीं नवीन तत्वें मान्य करण्याचे बाबतींत ज्या घडामोडी आतां दर्शविल्याप्रमाणें घडून आल्या त्याचा परिणाम रंकाचे राव व रावाचे रंक होण्यात झाला असें या निवाड्यामुळें ज्या पक्षकारांवर परिणाम घडून आले त्याची बरवर तपासणी केली असता सहज दिसून येण्यासारखें आहे. वादग्रस्त दाव्यांचा निवाडा करून घेण्याकरिता कोर्टाकडे दाद मागणें याच सामान्य प्रतीचे लोक एक प्रकारची सोडत समजतात. त्याचप्रमाणें

'Litigation is a gamble' अशी इंग्रजींत एक म्हण आहे. यांत बराच सत्यांश आहे असेंहि म्हणावें लागतें. दाव्याचे अखेर निकालाच्या दृष्टीनें दाव्याची चौकशी सुरू झाली म्हणजे ज्या कित्येक महत्त्वाच्या गोष्टी कराव्या लागतात त्या संबंधाची थोडी विस्तृत चर्चा या प्रकरणात करणें अवश्य आहे. दाव्याचा निर्णय ज्या न्यायाधिशाकडून केला जातो, त्याचेपुढें उभयतां वादीप्रतिवादींकडून ज्या तक्रारी दाखल केल्या जातात, त्यावरून काढण्यात आलेल्या मुद्यांच्या शाबितीवर हा निर्णय अवलंबून असतो. या दृष्टीनें विचार केला असता न्यायाधीश उभयतां पक्षकारांच्या तक्रारीवरून जे मुद्दे काढतो ती दाव्यातील एक महत्त्वाची बाब समजली पाहिजे. उभयतां पक्षकारांच्या वकिलानीं मुद्यांचें सूक्ष्म निरीक्षण करून न्यायाधिशानें मुद्दे बरोबर काढले आहेत किंवा नाहीं, त्याचप्रमाणें ते सिद्ध करण्याची जबाबदारी म्हणजे पुरावा करण्याचा बोजा कायद्याप्रमाणें ज्या पक्षकारावर टाकावयाचा तसा तो टाकला आहे किंवा नाहीं हें पाहण्याची खबरदारी घेतली पाहिजे. कोर्टाचा कल एकाद्या पक्षकाराविरुद्ध असल्या-मुळें मुद्दे काढण्याचे कामीं न्यायाधिशानें बेकायदेशीरपणा केला असल्यास अथवा एकादा मुद्दा शाबीत करावयाचा बोजा भलत्याच पक्षकारावर टाकला असल्यास त्या-बाबत आपला अर्ज कोर्ट मान्य करणार नाहीं असें माहीत असूनहि तसा अर्ज कोर्टात दाखल करावा. न्यायाधिशानें अर्ज अमान्य केल्यास त्या अर्जाचा उपयोग दाव्याचा निकाल विरुद्ध झाल्यास अपील कोर्टात फार होतो. कित्येक वेळा अपील कोर्टात न्यायाधिशानें मुद्दे योग्य प्रकारें काढले नाहींत अशी तक्रार केल्यास अपील कोर्टाचें असें म्हणणें पडतें कीं मुद्यांचे बाबतीत ज्याअर्थी तक्रारी अर्ज देण्यात आला नाहीं त्याअर्थी ही तक्रार कायद्याप्रमाणें करता येत नाहीं. असें मत अपील कोर्टानें प्रदर्शित केलें म्हणजे पक्षकाराचें नुकसान झाल्याखेरीज राहात नाहीं. आता दर्शवि-लेल्या कारणाकरितां वर नमूद केल्याप्रमाणें खबरदारी घेणें अत्यंत जरूर असतें.

दाव्याचे चौकशीचे वेळीं जो पुरावा पक्षकार देतात त्याचा विचार करून न्यायाधीश दाव्याचा निर्णय करतो. यासंबंधींचें विस्तृत विवेचन करण्यापूर्वी प्रारंभींच एक गोष्ट नमूद करावयाची ती ही कीं, बहुतेक दाव्यात लेखी पुरावा महत्त्वाचा समजला जाऊन त्याच्या आधारें दाव्याचा निकाल न्यायाधीश करतात. तोंडी पुराव्यास इतकें महत्त्व कधींच नसतें. ज्या दाव्याचे कामीं लेखी पुरावा विश्वसनीय असा दिला जातो त्या दाव्याचे कामीं लेखी पुराव्याशीं सुसंगत नसणारा तोंडी पुरावा कितीहि दाखल झाला तरी त्याचा काहीं एक उपयोग होत नाहीं व त्यावर न्यायाधीश भरवसा ठेवीत नाहीं. त्याचप्रमाणें तोंडी पुराव्याचे बाबतींत लक्षात ठेवावयाची गोष्ट अशी कीं एखाद्या पक्षकारानें मुद्दे शाबित करण्याकरिता लेखी व तोंडी पुरावा दिला व तो तोंडी पुरावा लेखी पुराव्याशीं सुसंगत असला तर तोंडी पुराव्यात साक्षिदारानें काहीं खोट्या गोष्टी सांगितल्या तरी तो पुरावा विश्व-सनीय मानला जातो. प्रस्तुत पुरावा हा शब्द जो अर्थ व्यक्त करण्याकरितां वापरतात तोच अर्थ व्यक्त करण्याकरितां आपल्या स्मृतिग्रंथात प्रमाण हा शब्द वापरला जात

असे. याज्ञवल्क्यस्मृतीचे दुसरे अध्यायाचे २२ व्या श्लोकात प्रमाणाची व्याख्या खालीलप्रमाणे आढळते.

प्रमाणं लिखितं भुक्तिः साक्षिणश्चेति कीर्तितम्
एषामन्यतमाभावे दिव्यान्यतममुच्यते ॥ २२ ॥

पुरावा अथवा प्रमाणाचे प्रकार दोन. मानवी प्राण्यास परमेश्वराने पंच कर्मेंद्रियें व पंच ज्ञानेंद्रियें दिलीं आहेत. जगातील निरनिराळ्या वस्तूंचें ज्ञान मानवी प्राण्यास पंचकर्मेंद्रियामार्फत होत असतें. अशे जें ज्ञान त्याला प्राप्त होतें, त्या विषयीची माहिती प्रतिज्ञेवर न्यायाधिशासमोर त्या माणसानें सांगणें, यास तोंडी पुरावा असें म्हणतात. या पुराव्याच्या एका प्रकाराहून पुराव्याचा दुसरा प्रकार म्हणजे लेखी पुरावा हा होय. कोणत्याहि व्यवहाराबद्दल तो त्या वेळीं केला जातो त्या वेळीं त्या व्यवहारासंबंधाचे लेख तयार केले गेले असल्यास या लेखास लेखी पुरावा ही संज्ञा आहे. कांहीं व्यवहाराचे बाबतींत इंग्रजी राजवटींत त्या व्यवहाराचा लेखच केला गेला पाहिजे, असा निर्बंध असे. लेख केला गेला नसल्यास तो व्यवहार बेकायदेशीर ठरे. या निर्बंधास अनुसरून व्यवहारासंबंधाचे जे लेख केले जातात त्यास लेखी पुरावा असें म्हणतात व तो विश्वसनीय मानला जातो. या दोन प्रकारच्या पुराव्याशिवाय आणखी एक पुराव्याचा तिसरा प्रकार आहे. तो प्रकार म्हटला म्हणजे भोगवटा हा होय. एखाद्या स्थावर अगर जंगम मिळकतीबद्दल वाद उपस्थित झाल्यास मिळकत एखाद्या व्यक्तीचे ताब्यात व उपभोगात अनेक वर्षांपासून आहे, ही गोष्ट ज्या साक्षिदारानें पाहिली असेल त्यानें ती गोष्ट न्यायाधिशापुढें सांगितल्यास त्यास भोगवट्याचा पुरावा असें म्हणतात. कोणत्याहि वादातील पक्षकार आपली तक्रार सिद्ध करण्याकरिता अशा प्रकारचा जो पुरावा आणतात, तो लक्षात घेऊन न्यायाधीश त्या वादाचा निर्णय करतो. प्रस्तुत स्थळीं ही गोष्ट नमूद करणें जरूर आहे कीं, वर नमूद केलेल्या निरनिराळ्या पुराव्याच्या प्रकारास मानुषी प्रमाण असें म्हणतात. ब्रिटिश राजवटीपूर्वी महाराष्ट्रात दाव्याचे निवाडे दैवी प्रमाणाच्या आधारावर करण्याचा प्रघात होता. पाश्चात्य देशातील इंग्लंड, फ्रान्स इ. देशात भरतखंडातील दैवी प्रमाणासारखीं प्रमाणें मान्य करून दाव्याचा निकाल करण्याचा प्रघात होता मनु, याज्ञवल्क्य व अन्य स्मृतींत दैवी प्रमाणाचे प्रकार वर्णिले आहेत. दैवी प्रमाणाचे प्रकारास च दिव्य ही संज्ञा आहे. प्रस्तुत स्थळीं या दैवी प्रमाणाचें सविस्तर वर्णन एका लेखात आलेलें आम्हीं येथें उद्धृत करतों.

मनुस्मृतीचे ८ वे अध्यायाचे १०८ ते ११६ श्लोकांत ह्यासंबंधीं विवेचन आलें आहे :—

यस्य दृश्येत सप्ताहादुक्तवाक्यस्य साक्षिण. ॥
रोगोऽग्निर्ज्ञातिमरणमृणं दाप्यो दमं च सः ॥ १०८ ॥

असाक्षिकेषु त्वर्थेषु मिथो विवदमानयोः ॥
अविन्दन्तत्त्वतः सत्यं शपथेनापि लम्भयेत् ॥ १०९ ॥
महर्षिभिश्च देवैश्च कार्यार्थं शपथाः कृताः ॥
वसिष्ठश्चापि शपथं शेपे वै यवने नृपे ॥ ११० ॥
न वृथा शपथं कुर्यात्स्वल्पेऽप्यर्थे नरो बुधः ॥
वृथाहि शपथं कुर्वन्प्रेत्य चेह च नश्यति ॥ १११ ॥
कामिनीषु विवाहेषु गवां भक्ष्ये तथेन्धने ॥
ब्राह्मणाभ्युपपत्तौ च शपथे नास्ति पातकं ॥ ११२ ॥
सत्येन शापयेद्विप्रं क्षत्रियं वाहनायुधैः ॥
गोबीजकाञ्चनैर्वैश्यं शूद्रं सर्वैस्तु पातकैः ॥ ११३ ॥
अग्निं वाहारयेदेयमप्सु चैनं निमज्जयेत् ॥
पुत्रदारस्य वाप्येनं शिरांसि स्पर्शयेत्पृथक् ॥ ११४ ॥
यमिद्धो न दहत्यग्निरापो नोन्मज्जयन्ति च ॥
न चार्तिमृच्छति क्षिप्रं स ज्ञेयः शपथे शुचिः ॥ ११५ ॥
वत्सस्य ह्यभिशप्तस्य पुरा भ्रात्रा यवीयसा ॥
नाग्निर्ददाह रोमापि सत्येन जगतः स्पृशः ॥ ११६ ॥

अर्थ :—ज्यानें साक्ष दिली आहे, अशा पुरुषास सात दिवसांत जर कांहीं व्याधि जडली किंवा त्याचें गृह दग्ध झालें अथवा पुत्रादि निकटसंबंधी एकाकी मरण पावला तर देवानेंच त्याचें मिथ्या भाषण सिद्ध केलें आहे, असें जाणून धनकोचें ऋण व राज्याचा दंड त्याच्यापासून घ्यावा. ज्यामध्यें साक्षी नाहींत अशा व्यवहारांत परस्पर वाद करणाऱ्या दोघांतील खरा कोण याचा निर्णय करतां येईनासा झाल्यास न्यायाधिशानें त्यांस पुढील शपथा घालून सत्य जाणावें. सप्तर्षि व इंद्रादि देव यांनीं संदिग्ध कार्याच्या निर्णयासाठीं शपथा घेतल्या आहेत. यानें शंभर पुत्र खाल्ले असा विश्वमित्रानें आरोप केला असतां आपण शुद्ध आहोंत हें व्यक्त करण्याकरितां वसिष्ठानेंहि यवन पुत्र जो सुदामा त्याच्यापुढें शपथ घेतली आहे. सुज्ञ पुरुषानें अल्पशा कारणाकरितां शपथ घेऊं नये. कारण व्यर्थ शपथ घेणारा पुरुष या लोकीं व परलोकींहि नाश पावतो. ज्यास पुष्कळ स्त्रिया आहेत अशा पुरुषानें तूंच मला अतिशय प्रिय आहेस असें प्रत्येकीस खोटेंच जरी सांगितलें तरी त्यांत दोष नाहीं. त्याचप्रमाणें विवाहप्रसंगीं (मी दुसरी स्त्री करणार नाहीं इ.) गाईंच्या गवतासारख्या भक्ष्याकरितां, अग्निहोत्राकरितां, इंधनादिकरितां व ब्राह्मणाच्या रक्षणाकरितां शपथ वाहण्यांत कांहीं दोष नाहीं. ब्राह्मणाकडून सत्यशब्दाचा उच्चार करवून शपथ घेववावी. क्षत्रियाकडून वाहन व आयुध यांची शपथ घेववावी व शूद्रास मडा

सर्व पातकें लागोत, अशी शपथ घेणेस सांगावें. (ब्राह्मणादिकांनीं मात्रें सत्यादि निष्फल होवोत असें म्हणावें.) किंवा शूद्रादिकाकडून अग्नि आणवावा. (त्याचा प्रकार असा:—२०० तोळे भार लोखंडाचा आठ अंगुळें लांब असा एक तुकडा घेऊन तो लाल करावा व तो शूद्राच्या हातांत देऊन त्यास सात पावलें चालवावें.) किंवा जळवा इत्यादि प्राणी ज्यांत नाहींत अशा जळांत त्यास बुडवावें पुत्र व स्त्रिया यांच्या मस्तकास पृथक् पृथक् स्पर्श करवावा ज्यास प्रदीप्त अग्नि जाळीत नाहीं, पाणी वर उडवीत नाहीं व ज्यास मोठी पीडा प्राप्त होत नाहीं, तो शपथ करितांना अति शुद्ध होतो असें समजावें. कारण पूर्वी एका वत्स नामक ऋषीस त्याच्या धाकन्या सावत्र भावानें तू ब्राह्मण नाहींस, शूद्राचा पुत्र आहेस असें म्हटलें असतां मी शूद्र नाहीं, असें म्हणून आपल्या शुद्धीकरितां त्यानें अग्नीमध्यें प्रवेश केला. पण सर्व जगाच्या शुभाशुभकर्तव्यास हेरप्रमाणें पाहणाऱ्या अग्नीनें सत्यामुळें त्याचा एक केंसहि जाळिला नाहीं.

याज्ञवल्क्यस्मृतीचे ९७ ते ११५ श्लोकांत तुला, अग्नि, जळ, विष आणि कोप ह्या निराळ्या पांच प्रकारच्या दिव्यांचें साग्र वर्णन दिलें आहे. नारदस्मृतींतील पहिले अध्यायाचे २३६ ते ३४८ श्लोकांत दिलेलें दिव्यांचें वर्णन याज्ञवल्क्यस्मृतींतील वर्णनापेक्षांहि फार बारीक आणि साग्र आहे. याज्ञवल्क्यस्मृतींत सांगितलेल्या दिव्यांचे प्रकाराखेरीज तांदूळ आणि सुवर्णाचे तुकड्यांचे दिव्यांच्या प्रकारांचें वर्णन नारदस्मृतींत केलें आहे. रवा काढण्याचें जें दिव्य आहे, तें नारदस्मृतींत वर्णिलेलेंच दिव्य होय.

ह्या दिव्याचें साग्र वर्णन मिताक्षरटीकेंत दिलें आहे, तें असें. ज्यास रवा ही संज्ञा आहे त्यास तप्तमाषविधि ही संज्ञा होती. हे विधी दोन प्रकारचे होते.

### प्रकार पहिला

सोन्याचें, रुप्याचें, तांब्याचें किंवा मातीचें सोळा अंगुळें विस्तीर्ण व चार अंगुळें खोल मडळ (वर्तुळपात्र) करावें त्यांत तीस पळप्रमाण घृत किंवा तेल घालावें. त्याला चांगलें तापवावें व तें तापून कडकडू लागलें म्हणजे त्यांत सोन्याचा उडीद (किंवा एक माषा) भार तुकडा टाकावा. नंतर दिव्य करणारानें आंगठा व त्याच्या जवळचीं एकदोन बोटें यांनीं त्या तप्त माषाला वर उचलावें. त्याला उचलीत असतांना जो हात झाडीत नाहीं, किंवा ज्याच्या हातावर फोड येत नाहींत, ज्याच्या हातांचीं बोटें निर्विकार असतात तो धर्मतः शुद्ध होतो.

### प्रकार दुसरा

सोन्याच्या, रुप्याच्या, तांब्याच्या, लोखंडाच्या किंवा मातीच्या पात्रांत गाईचें घृत घालून पवित्र पुरुषानें तें अग्नीवर तापवावें. नंतर त्यांत सोन्याची, रुप्याची, तांब्याची किंवा लोखंडाची चांगली शुद्ध केलेली व पाण्यानें एकदां धुतलेली मुद्रिका टाकावी. त्यापूर्वी पात्रांत तापून सळसळत असलेल्या तुपांत ओलें पान सोडून तें चरर् असा आवाज करितें किंवा नाहीं तें पहावें. नंतर परम पवित्र या मंत्रानें अभि-

मंत्रण करावें. मंत्राचा अर्थ असा —हे घृता, तू यज्ञकर्मांमध्यें परम पवित्र व अमृत आहेस. वास्तव हे पवित्र करणाऱ्या घृता, तूं पाप्याला जाळ. पवित्र पुरुषाला बर्फासारखा शीत हो. असो. ह्यानंतर उपोषण करून, स्नान करून, ओलेत्यानें आलेल्या शोध्यास ती घृतातील मुद्रिका आंगठ्याजवळच्या बोटानें काढावयास सांगावें. नतर परीक्षकानीं आंगठ्याजवळचें बोट पहावें. त्यावर फोड आलेले नसल्यास दिव्य करणारा शुद्ध आहे, व ते असल्यास तो अशुद्ध आहे, असे समजावें.

आपस्तंबस्मृतीचे प्रश्न २, खंड २९, श्लोक ६ मध्यें दिव्याचें अवलबन केव्हा करावें तें सांगितलें आहे नारदस्मृतीचा २४९ वा श्लोक महत्त्वाचा आहे जेव्हा एखादा भयकर गुन्हा झाला असेल तेव्हा राजानें दिव्य करवावें. परतु या व्यतिरिक्त पक्षकारास अगर साक्षीदारास न्यायी राजानें शपथा मात्र द्याव्या असा त्या श्लोकाचा आशय आहे. ह्यावरूनहि दिव्याचा उपयोग क्वचित् प्रसंगीं केला जात असे, असें सिद्ध होतें.

आता आपले निदर्शनास आणलेल्या स्मृतित्रयांतील श्लोकांवरून दिव्य आणि याज्ञवल्क्य स्मृति (मराठी भाषांतर बापटकृत पान १७५ ) शपथ करूनहि ज्याच्या-वर लवकरच काहीं राजकृत किंवा दैवकृत सकट प्राप्त होत नाहीं तो शुद्ध आहे असें जाणावें, त्याची अवधी, कार्याचें लाघव अथवा गौरव असेल त्या मानानें एका दिवसापासून पाच दिवसांपर्यंत ठरवावी. यावरून शपथा पुराव्याचे दृष्टीनें एकाच वर्गांत पडतात, हें स्पष्ट झालें आहे. नियम नेमण्याचे प्रघातासंबंधीं मी जो उल्लेख केला आहे त्याच प्रकारचा उल्लेख मनुस्मृतींतील पहिले श्लोकात आलेला आहे. हे सर्व प्रकार मनुस्मृतीचे कालापासून परपरागत न्यायनिर्णय करणाऱ्या संस्थांवरोवरच आपले समाजात अस्तित्वात आहेत, हें निर्विवाद [redacted] होत आहे. इकडीच्या काळीं सुधारलेल्या समजले जाणाऱ्या राष्ट्रांतहि शके १४०० ते १७०० चे दरम्यान दिव्य करण्याचा प्रघात सुरू होता पॉप्युलर सायक्लोपीडियामध्यें व्हॉ १०, पृ १८६ त असा उल्लेख आहे —

" Besides this ordeal—ordeal of water ( found in Prussia in the 17th and in the neighbouring countries in the 1st half of the 18th century ) there was also the weighing of witches It deserves to be mentioned as a singular instance that as lately as 1728 several witches were weighed at Szegedin in Hungary With the exception of these few relics of ordeals in the end of the 15th and the beginning of the 16th century are to be regarded as the closing period of them in Europe "

ह्या उताऱ्यावरूनहि त्या काळात दिव्य करण्याचा प्रघात पाश्चात्य देशात अस्तित्वांत होता असें ठरतें दिव्याचे युक्तायुक्तेबद्दल प्रस्तुत स्थळीं विचार करण्याचें

कारण नाहीं. आता जें विवेचन केलें आहे त्यावरूनहि आजचे विषयाचे दुसरे मुद्यासंबंधीं मीं जो सिद्धान्त ठरविला आहे, त्यासहि चांगल्या प्रकारची बळकटी येते. येथपावेतों दैवी प्रमाणाचे प्रकार अस्तित्वात होते व ज्याचा दाव्याच्या निर्णयाकरिता आश्रय केला जात असे, त्याचें वर्णन केल्यावर प्रस्तुत स्थळीं न्यायाधिशासमोर साक्षी देण्याकरिता येणाऱ्या साक्षिदारास ब्रिटिश राजवटीपूर्वी कोणत्या प्रकारच्या शपथा देण्यात येत असत व साक्षीदाराच्या जबान्या कोठें घेण्यात येत असत, याचें किंचित् दिग्दर्शन प्रस्तुत स्थळीं आम्हीं करतों प्रत्येक गावच्या देवालयात एक दगडी शिला बसविलेली असते. या शिळेस धर्मशिला असें म्हणतात. साक्षीदाराला या शिळेवर उभा करून शपथ देण्यात आल्यावर तो जी हकीकत सांगे तीं पुरावा म्हणून समजण्यात येत असे. धर्मशिलेशिवाय, कृष्णा, गोदावरी इ. नद्यात साक्षिदारास उभा करून शपथ देण्यात येत असे, व तो जी हकीकत सांगे तो पुरावा म्हणून समजला जात असे. त्या काळीं निरनिराळ्या प्रकारच्या ज्या शपथा साक्षिदारास घेण्यास सांगत त्याचें एका लेखातील वर्णन आम्हीं येथें उद्धृत करतो.

" साक्षिदाराच्या साक्षी घेण्यापूर्वी त्यास कोणत्या प्रकारच्या शपथा देत असत, याचे कांहीं नमुने सांगतों. त्यावरून त्या काळीं लोकाची धर्मश्रद्धा कशा प्रकारची होती व त्या धर्मश्रद्धेचा उपयोग सत्यान्वेषणाचे कामीं कशा रीतीनें करीत असत, हें दिसून येतें. कित्येक वेळा साक्षिदारास प्रथम नदींत घालून मग त्यास सत्य असेल तें सांगा असें सांगण्याचा प्रघात असे. परिशिष्ट लेख नंबर ५ मध्यें मौजे मजकूरचे वतुते बोलावून आणून श्रीचे देवालयीं नेऊन त्यास शपथ घालून विचारणें असा उल्लेख आहे. वाराणशीस गोहत्येचें पातक व ब्रह्महत्येचें पातक लागेल, अशा प्रकारची सर्वसाधारण शपथ देण्याचा प्रघातहि होता. परिशिष्ट लेख नंबर १२ मध्यें बारा बलुते बोलावूनें आणून थळ, कजबे उंबरज येथें श्रीकृष्णासंगमीं पाटील, कुळकर्णी, चौगुले ऐसे कृष्णेमध्यें घ ऊन त्याचे माथां शपथ घालून विचारणें असा उल्लेख आहे. परिशिष्ट लेख नंबर ४२ मध्यें सत्यान्वेषणाकरिता कोणकोणत्या शपथा व तरतुदी करण्यात आल्या होत्या, हें महजरांतील शब्दांच आपणास सांगतों. वाद पाटिलकी वतनाबद्दल होता—

" पिंपरीस जाऊन पाच महिने बैसोन गोते हरदो जणाच्या तकरीरा व कित्येक पाते मनास आणावयाचे ते आणले शेवट गोताजवळी गावीचेच सहीस राजी झाले त्यावरून गोते मौजेमजकुरास सही लिहिली कीं समस्त गोत व दहाजण बलुते व मे स्तवर श्रीदेवाचे विहिरींत आंघोळी करून तुळशीच्या माळा गळ्यां घालून आपले ऐरा हातीं धरून तुमचे माथां मांगीमहारीचें अशुद्ध असें चामारकुंड व ढोरकुंड व रंगारकुंड ओढून सात मंदले ओढून त्यांत उभें राहाणें श्रीदेवाचें रंगशिळेवर उभे राहाणें तुम्हांस गोहत्या ब्रह्महत्या असे ती व गुरुद्रोही, मात्रागमन, सुरापान तुमचे पूर्वज स्वर्गीं वाट पहात आहेत कीं पुत्र सत्य वदोन उद्धार करील किंवा खोटें बोलोन नरकीं बुडवील. धर्मे आपल्या पिता उद्धारिला. श्री रघुनाथें पितयाची भाक सत्य

केली तेव्हां तुम्ही आपल्या पूर्वजाचा उद्धार करून सत्य वदोन नेमस्त करून हरदो जणाचें वडीलपण तें लेहोन पाठविणें सर्हीचें प्रतउत्तर लेहोन पाठविणें." आता पर्यंत शपथेचे जे नमुने दिले त्या सर्वांत हें नमुनेदार उदाहरण आहे.

वरील उताऱ्यात ज्या प्रकारच्या शपथांचें वर्णन केलें आहे त्या शिवाय शपथेचा एक प्रकार प्रसिद्ध झालेल्या इतिहास साधनात आढळून आलेला येथें आम्ही नमूद करतों. इ. स. १७०७ सालांत चिपळूण येथील कुळकर्णी घराण्याच्या दोन भावात मिळकतीच्या वाट्यासंबधीं वाद उत्पन्न झाला. त्याचा निवाडा चिपळूण येथाल ग्रामसभेनें केला. या वादात एका भावाचें असें म्हणणें होतें कीं त्याच्या भावानें गुप्तपणें कांहीं रक्कम काढून ठेवली आहे त्यात मला हिस्सा मिळावा. भावाचें असें म्हणणें होतें कीं मी अशी रक्कम कांहीं ठेवलेली नाहीं यावर रक्कम गुप्तपणें काढून ठेवलेली सिद्ध करण्यास पुरावा नसल्यानें त्या भावानें रकमेपैकीं निम्मा हिस्सा मागितला होता, त्यानें समासदास असें सांगितलें कीं भी गाईची शपथ घेऊन ही गोष्ट आपणास सांगतों याप्रमाणें गाईची शपथ घेण्याची त्यानें इच्छा दर्शविल्यावर समासदांनीं या गोष्टीचा निवाडा गाईची शपथ न घेता होणें इष्ट आहे, कारण त्या काळीं गाईची शपथ घ्यावयाची म्हणजे शपथ घेणारानें गाईच्या मानेवर सुरी धरून साक्ष द्यावयाची असा प्रकार प्रचलीत होता. वादाचा निर्णय करणाऱ्या पंचानीं या भावास असें सांगितलें कीं आपल्या मराठा धर्माप्रमाणें अशा प्रकारची शपथ घेणें तुला योग्य नाहीं गाय हें फार प्राचीन काळापासून दैवत मानलें गेलें आहे व अशा देवतेच्या मानेवर सुरी धरणें म्हणजे त्या दैवताची अवहेलना करण्यासारखी आहे. ही गोष्ट महाराष्ट्र अथवा मराठा धर्माप्रमाणें पापकर्म आहे. सबब तू शपथ न घेता आपली तक्रार स्वखुषीनें सोडून दे पंचांनीं केलेल्या या उपदेशाचा सुपरिणाम त्या भावाच्या मनावर होऊन त्यानें गुप्त धनापैकीं निम्मा वाटा मिळावा, अशी जी तक्रार केली होती, ती सोडून दिली व पंचांनीं बाकीच्या मिळकतीचे वाटे कायद्याप्रमाणे करून दिले मानुषी प्रमाण असता दैवी प्रमाण म्हणजे दिव्य करण्याची मागणी उभयता वाद्यांपैकीं कोणी एकानें केल्यास ती मान्य करण्यात येऊ नये, हें तत्व एका पुरातन निवाड्यात नमूद करून वादाचा निकाल केल्याचें उदाहरण प्रस्तुत स्थळीं आम्ही नमूद करतों सातारा जिल्ह्याच्या खटाव परगण्यात दरुम या नावाचें एक खेडें आहे दुर्गादेवीचा दुष्काळ पडल्यावर हें गाव ओस पडलें गावांतील लोक पोट भरण्या करिता अन्य प्रदेशात निघून गेले दुष्काळ संपल्यानंतर गावातील लोक परत येऊ लागले या गावचा वतनदार पाटील एक गवळी होता तो परत आल्यावर त्याचें पाटीलकी वतन दुसऱ्या एका इसमानें बळकावलें होतें तेव्हां त्यानें देशक सभेपुढें आपली पाटिलकी बळकावून बसलेल्या माणसाकडून ती आपणास परत मिळावी अशा बद्दल फिर्याद केली. याप्रमाणें फिर्याद केल्यावर खटाव परगण्यातील निरनिराळ्या ठिकाणच्या वतनदार, पाटील, देशमुख, देशपांडे यांची सभा बोलाविण्यांत आली. या सभेपुढें वतनदार गवळी पाटलानें त्याची पाटिलकी असल्याबद्दल गावांतील

लोकांचा पुरावा दिला. या पुराव्यावरून पाटिलकी गवळ्याची असल्याबद्दल देशक सभेची खात्री झाली. यावर पाटिलकी बळकावून बसलेल्या माणसानें पाटिलकी माझी असल्याबद्दल मी दिव्य करतों असें देशक सभेस सांगितलें. तेव्हां सभासदानीं "दिवस असता दिवा नाहीं, गोही असता खा नाहीं" असें त्यास सांगितलें व दिव्य करण्याची परवानगी दिली नाहीं व पाटिलकी वतन गवळ्याच्या मालकीचें आहे, असा निवाडा दिला. याज्ञवल्क्य स्मृतींतील जें वचन मागें दिलें आहे त्या वचनातील आशय मराठी म्हणींत रूढ झाला असून सर्वसाधारण लोकांस हें तत्त्व माहीत झालें होतें. आजपावेतों जीं इतिहाससाधनें प्रसिद्ध झालीं आहेत, त्यांत दरुज गावच्या पाटीलकी वतनाच्या निवाड्याइतका जुना निवाडा प्रसिद्ध झालेला नाहीं.

ब्रिटिश राजवट सुरू झाल्यानंतर तत्पूर्वी अस्तित्वात असलेल्या या सर्व गोष्टी अंतर्धान पावल्या. ब्रिटिश राजवटींतील कायद्यान्वयें दिव्यास मान्यता दिली गेली नाहीं. यामुळें वादाचे निवाड्याचे कामीं दिव्य करण्याचा प्रघात अजिबात बंद पडला. दिव्याप्रमाणें ब्रिटिश राजवटीपूर्वीच्या साक्षिदारास द्यावयाच्या शपथाहि बंद पडल्या. 'परमेश्वरस्मरण करून खरें सांगेन, खोटें सांगणार नाहीं' ही एकच शपथ निरनिराळ्या न्यायालयापुढें येणाऱ्या साक्षिदारांना फौजदारी व दिवाणी कोर्टांत देण्याचा प्रघात सुरू झाला. साक्षिदारास द्यावयाच्या शपथेबाबत इंडियन ओथ्स् (शपथेचा) ॲक्ट अमलांत आला या कायद्यान्वयें पूर्वकालच्या प्रघातांपैकीं एका प्रघातास मात्र मान्यता देण्यात आली. कोणत्याहि खटल्यात उभयतां पक्षकारांनीं 'स्पेशल ओथ' (विशिष्ट प्रकारची शपथ) घेऊन आपलें म्हणणें खरें आहे असें न्यायाधिशास सांगितल्यास उभयता पक्षकारातर्फे कांहीं एक पुरावा न घेतां विशिष्ट प्रकारची शपथ जो पक्षकार घेईल त्याचेतर्फे दाव्याचा निवाडा करण्यास यावा असें या कायद्याच्या कलमान्वयें ठरविलें गेलें. विशिष्ट प्रकारच्या शपथेचे कांहीं प्रकार येथें नमूद करतों.

गाईचें शेंपूट हातांत धरून, भगवद्गीता ग्रंथ हातांत घेऊन, पक्षकाराच्या इष्ट देवतेच्या नावाचा उच्चार करून पक्षकारानें त्याच्या म्हणण्याप्रमाणें खरा मजकूर सांगणें, अशा प्रकारच्या विशिष्ट शपथा प्रचलीत आहेत. खानदेश जिल्ह्यांत रोहे-गावांतील शेतकरी वगैरे लोकांत ज्वारी हातांत घेऊन शपथेवर मजकूर सांगणें, या प्रकारास ज्वारीची शपथ म्हणण्याचा प्रघात आहे. ज्वारी हातांत घेऊन खोटा मजकूर सांगणें हें महत्पाप समजलें जातें व या कारणामुळें ज्वारीची शपथ घेऊन खोटा मजकूर सांगण्यास सहसा कोणी तयार होत नाहीं. निरनिराळ्या प्रांतांतील लोकांच्या समजुतीअन्वयें विशिष्ट प्रकारच्या शपथेचे निरनिराळे प्रकार आढळून येतात.

दिवाणी अगर फौजदारी कोर्टांत जे साक्षिदार पुरावा देण्याकरितां येतात त्यांपैकीं फौजदारी कोर्टाकडे ज्या गुन्ह्याचा निवाडा करण्यात येतो त्या कामीं प्रतिशेषर साक्षी देणाऱ्या लोकांपैकीं बरेच लोक, मग ते कोणत्याहि जातीचे असोत, सत्य सांगणारे असतात. याचें कारण गुन्ह्याचा तपास व पूर्वचौकशी पोलिस अधिकाऱ्या-

करून केली जात असल्यामुळें खोटी साक्ष देणारा साक्षीदार क्वचित् आढळतो. दिवाणी कोर्टांकडून ज्या दाव्यांचे निवाडे केले जातात, त्या दाव्याचे कामीं पुढें येणाऱ्या साक्षीदाराचे बाबतींत आतां सांगितलेला हा नियम आढळून येत नाहीं. या दाव्याचे कामीं साक्ष देण्यास येणाऱ्या साक्षीदाराचें वर्गीकरण स्थूल मानानें खालीं दर्शविल्याप्रमाणें करण्यास प्रत्यवाय नाहीं.

(१) खेड्यांतील अशिक्षित साक्षिदारांत सत्य सांगणाऱ्या साक्षिदारांचें प्रमाण बरेंच आढळून येतें.

(२) *सुशिक्षित साक्षिदारांत सत्य सांगणारांचें प्रमाण शेतकरी व अडाणी* साक्षिदारापेक्षां बरेंच कमी आढळून येतें.

(३) वरील दोन प्रकारच्या साक्षिदारांशिवाय गांवोगांवीं कांहीं लोकांचा धंदा वाटेल त्या दाव्यांत पैसे घेऊन साक्ष देण्याचा असतो. अशा प्रकारच्या साक्षिदारांना सत्यासत्यतेची चाड बिलकूल नसते. कित्येक दाव्यांत पक्षकारानें वकिलास त्याचें काम चालविण्याबद्दल मेहनताना म्हणून द्यावयाच्या रकमेपेक्षां दुप्पट तिप्पट रकम अशा साक्षिदारास पक्षकार देतात; असा अनुभव आला आहे. कोर्टांतील काम करणाऱ्या वकिलांना अशा प्रकारच्या साक्षिदारांची माहिती असते व त्याणास वकिलाकडून होणाऱ्या उलटतपासणींत हे साक्षिदार सपशेल खोटे ठरतात व न्यायाधीश त्यांचेवर बिलकूल विश्वास ठेवीत नाहींत. *अशी जरी वस्तुस्थिति असली* तथापि पक्षकारांना खोट्या दाव्याचे समर्थनार्थ असल्या साक्षिदारांना पैसे देण्याचा मोह आवरत नाहीं.

सुशिक्षित साक्षीदार दाव्याचे कामीं साक्षी देण्यास आल्यास तो जो तोंडी पुरावा देतो, तो त्याच्या स्वार्थाच्या आड येणारा नसला तर त्याची साक्ष सर्वसाधारणपणें सत्य मानण्यास हरकत नाहीं. परंतु त्याच्या स्वार्थास धोका येईल असा पुरावा त्यास द्यावा लागल्यास तो परमेश्वराची शपथ घेऊन खोटें सांगण्यास कचरत नाहीं. सुशिक्षित साक्षिदारांच्या वर्गापैकीं व्यापारधंदा करणारे जे साक्षीदार असतात ते सर्वसाधारणपणें सत्य हकीकत सांगतातच असें नाहीं. जी गोष्ट सांगितली *असतां त्याचें आर्थिक नुकसान होण्याचा संभव असतो तेथें ते हटकून खोटें बोलल्या*-खेरीज राहात नाहींत. सावकारीचे धंदा करणारे साक्षीदार कुळाकडून व्याज दीड, दोन, तीन रुपये शेंकडापर्यंत घेतात. प्रामिसरी नोटींत अथवा रोख्यांत व्याजाचा दर रुपया शेंकडाचे नमूद केलेला असतो. असे सावकार प्रतिशेकर रुपया शेंकड्यापेक्षां अधिक व्याज घेतलें नाहीं असें बिनदिक्कत खोटें सांगतात. असे सावकार त्यांच्या व्यवहारासंबंधीं जे जमाखर्च ठेवतात त्यांत व्याजाची घेतलेली रकम खरी नमूद केलेली नसते. हे सावकार दोन प्रकारच्या वह्या ठेवतात. कोर्टांत व इन्कम्टॅक्स अधिकाऱ्याकडे व्याज रुपया दरापेक्षां अधिक घेतलें दिसून येणार नाहीं, अशा प्रकारच्या जमाखर्चाच्या वह्या निराळ्या ठेवून खरा व्यवहार ज्यांत नमूद केला आहे, अशा जमाखर्चाच्या वह्या निराळ्या ठेवून त्या कोणाच्या हातास पड-

णार नाहींत अशी खबरदारी घेतात. कित्येक सावकार कुळाकडून आलेला वसूल जमाखर्चाच्या वहींत जमा न करितां खाऊन जातात. आठ आणे दरापासून तों रुपया दरापावेतों व्याज कुळाकडून घेणारे व प्रामाणिकपणानें व्यवहाराचे जमाखर्च ठेवणारे सावकार शेंकडा ५-६ पेक्षा अधिक आढळून येत नाहींत. सावकारी हा धंदा आहे व तो करणारा ब्राह्मण, वाणी, कुणबी, शेतकरी अगर अन्य कोणत्याहि जातीचा असो, त्या सर्वांत आता नमूद केलेला दोष आढळून येतो. ब्राह्मण व मारवाडी सावकार लबाड्या करणारे असतात असा सर्वसाधारण समज आहे. परंतु या जातीच्या सावकाराइतकेच लबाड्या करणारे सावकार अन्य जातींत आढळून येतात. या बाबतींत विशेष लक्षांत ठेवण्यासारखी एक गोष्ट अशी कीं परमेश्वराची शपथ घेऊन खोटें सांगण्याची तुम्हास दिक्कत कशी वाटत नाहीं असें विचारलें असता ते असें म्हणतात कीं आमचा पैसा कोणत्या व्याजाच्या दरानें द्यावा हें ठरविण्याचा व त्याप्रमाणें व्याज घेण्याचा आमचा हक्क आहे. सरकार कायदा करून या आमच्या हक्कावर अतिक्रमण करितें सबब शपथ घेऊन खोटें सांगणें यांत कांहीं पाप आहे, असें आम्ही मानीत नाहीं.

प्रस्तुत मनिलेंडर्स ॲक्ट सावकारीचा धंदा करणाऱ्यास लागू असलेला कायदा अमलांत आला आहे. कर्जाऊ पैसे घेणाऱ्या कुळाची सावकाराकडून नागवणूक होऊं नये म्हणून हा कायदा सरकारनें केला. सरकारचा हा हेतु एका बाजूस राहून कुळाकडून घेण्यात येणाऱ्या व्याजाच्या योगानें होणारी नागवणूक पूर्वीपेक्षा भलतीच वाढली आहे. शंभर रुपये कर्जाऊ घेणाऱ्या कुळाकडून सावकार एकपासून तीन रुपये दरानें बारा महिन्याचें व्याज अगोदरच कापून घेऊन बाकीची रक्कम कुळाच्या हातात ठेवतो व रक्कम रुपये १०० ची प्रामिसरी नोट अगर कर्जरोखा कुळाकडून करून घेतो. हा नवीन कायदा केला, ते वेळीं सर्व प्रांतात खेडोपाडीं गावोगावीं अनेक कर्ज काढणारे लोक फार पूर्वीपासून आहेत व अशा लोकाना जरूर तें कर्ज मिळण्याची स्वरुप सोय सरकारनें आगाऊ न करिता एकदम हा कायदा अंमलात आणला. त्यामुळें कुळाची नागवणूक फारच मोठ्या प्रमाणात सुरू आहे. येथपावेतों केलेल्या विवेचनात न्यायाधिशापुढें साक्ष देण्याकरिता येणाऱ्या लोकांविषयींचा जो अनुभव आम्हास आला तो नमूद केला आहे. दाव्याची चौकशी सुरू झाली म्हणजे ज्या एका महत्त्वाच्या गोष्टीची खबरदारी घ्यावी लागते, ती म्हटली म्हणजे साक्षिदाराची उलटतपासणी करणें ही होय. एखाद्या पक्षकारानें आपल्यातर्फे साक्षीदार दिला असल्यास कोर्टापुढें त्या साक्षिदारास वकील जे सवाल विचारतात त्यास सरतपासणी असें म्हणतात. याप्रमाणें साक्षिदाराची सरतपासणी झाली म्हणजे विरुद्ध बाजूचा वकील त्या साक्षीदारास जे सवाल विचारतो त्याला उलटतपासणी असें म्हणतात. उलटतपासणी संपल्यावर साक्षिदाराची जबानी ज्या पक्षकारातर्फे होते त्याच्या वकिलानें त्यास विचारलेल्या सवालास फेरतपासणी असें म्हणतात. या तीन प्रकारच्या तपासणींत अत्यंत महत्त्वाची व दाव्याच्या निर्णयावर परिणाम करणारी

सरतपासणी म्हणजे उलटतपासणी ही होय. या उलटतपासणीविषयीं प्रस्तुत स्थळीं थोडी फार चर्चा करणें अगत्याचें आहे. वकिलीचा धंदा करणाऱ्या विद्यार्थ्यानें कायद्याची पदवी विश्वविद्यालयीन परीक्षेत उत्तीर्ण होऊन मिळविली असली, तथापि वकिलीचा धंदा करण्यास लागणारें खरें ज्ञान तो धंदा करण्यास त्यानें प्रारंभ केल्यावरच त्याला प्राप्त होत असतें. कायद्याची पदवी मिळविल्यानें त्याला जें ज्ञान प्राप्त होतें तें पुस्तकीज्ञान असतें. या ज्ञानाचा व्यवहारात कसा उपयोग करावयाचा याचें शिक्षण वकिलीचा धंदा सुरू केल्यानंतर दिवाणी कोर्टातील निरनिराळे दावे चालविण्याची संधि त्यास प्राप्त झाल्यानंतर या धंद्याचें खरें ज्ञान त्यास प्राप्त होऊं लागतें. अशा प्रकारचें जें ज्ञान त्याला प्राप्त होतें त्यांतील अत्यंत महत्त्वाचें ज्ञान म्हणजे उलटतपासणी करण्याची कला हें होय. अगदीं नवशिक्या वकिलास उलटतपासणी करण्याचें ध्येय व ती करण्याची पद्धत याची कल्पना बिलकुल नसते अशा नवशिका वकील उलटतपासणी करताना सरतपासणी करणाऱ्या वकिलानें साक्षिदारास विचारलेले प्रश्नच फिरून त्या साक्षिदारास विचारतो व साक्षीदार सरतपासणींत दिलेलींच उत्तरें फिरून देतो. अशा प्रकारची उलटतपासणी निष्फळ ठरते. कोणताहि साक्षीदार न्यायाधिशापुढें कांहीं विशिष्ट गोष्टी आपल्या जबानींत सांगण्याकरितांच येत असतो व हीं उत्तरें त्याचीं कायमचींच ठरलेलीं असतात. एखाद्या घटनेविषयीं साक्षीदार जी हकीकत सांगतो ती हकीकत उलटतपासणी करतांना घटनेचा काळ, स्थळ व घटना घडली ते वेळीं ती घटना पहाणारे अन्य लोक यासंबंधाची माहिती बारकाईनें उलटतपासणी करणाऱ्या वकिलानें साक्षीदाराकडून काढून घेणें जरूर असतें. दाव्याचे कामीं अशा घटनांची हकीकत सांगणारे अन्य साक्षीदार न्यायाधिशापुढें येतात. त्यांच्या उलटतपासणींत या संबंधाची माहिती उलटतपासणी करणाऱ्या वकिलानें काढून घेतली म्हणजे एकाच मुद्यासंबंधीं निरनिराळे साक्षीदार उलटतपासणींत जी हकीकत सांगतात ती परस्परविरोधी स्वरूपाची आढळल्यास साक्षिदारांच्या जबान्या खोट्या असून भरवशास पात्र नाहींत असें ठरतें. याशिवाय दाव्याचे कामीं साक्ष देण्याकरितां येणारे साक्षीदार यांचा व ज्या पक्षकारातर्फे ते साक्ष देण्यास येतात त्याचा संबंध कोणत्या प्रकारचा आहे या गोष्टीहि उलटतपासणी करणाऱ्या वकिलानें काढून घ्यावयाच्या असतात. नातें, स्नेह व आर्थिक संबंध या विषयींचे प्रश्न उलटतपासणी करणाऱ्या वकिलानें साक्षीदारास विचारले म्हणजे निव्वळ सत्य हकीकत सांगण्याकरिता न्यायाधिशापुढें साक्षीदार आला नाहीं, अशाविषयीं न्यायाधिशाची खात्री झाली, तर तो साक्षीदार विश्वासास पात्र नाहीं असें ठरतें. या व अशा प्रकारच्या अन्य. कित्येक गोष्टी उलटतपासणी करणाऱ्या वकिलास उलटतपासणींत काढून घेतां येतात. दाव्याचे कामीं अशा एखादा विशिष्ट स्वरूपाचा मुद्दा काढण्यात आला असला की त्या विशिष्ट मुद्याविषयींची माहिती त्या मुद्याविषयींचें ज्ञान ज्या ग्रंथात दिलेलें असतें त्याची माहिती त्या ग्रंथाच्या आधारें प्रथम वकिलानें करून घेणें जरूर असतें. अशा प्रकारची माहिती

त्यानें करून घेतली नसल्यास उलटतपासणी करणाऱ्या वकिलाची उलटतपासणी निष्फळ ठरते. सरकारवर केलेल्या एका दाव्याचे कामीं दोन तीनशें वर्षांपूर्वीचा एक फारशी लेख पुराव्यांत दाखल करण्यांत आला होता. या लेखाचें वाचन करून त्याचा बरोबर अर्थ करण्याकरितां डेक्कन कॉलेजच्या फारशी व अरबी जाणणाऱ्या मुसलमान प्रोफेसराची साक्ष झाली व त्यानें आपल्या जबानींत सरकारच्या म्हणण्यास पोषक असा अर्थ त्या लेखाचा सांगितला. यानंतर सदर साक्षीदाराची उलटतपासणी विरुद्ध बाजूच्या वकिलांनीं करावयाची त्यांस फारशी भाषा अवगत नव्हती. यामुळें त्यांचेकडून प्रोफेसराची उलटतपासणी समाधानकारक रीतीनें झाली नाहीं व त्यांच्या पक्षकारास अनुकूल असें उलटतपासणींत कांहींच निष्पन्न झालें नाहीं. या वादाची चौकशी ज्या न्यायाधिशापुढें चालली होती ते सिंधप्रांतातला असून पर्शियन भाषा व लिपि उत्कृष्टपणें जाणणारा होता व मुंबई विश्वविद्यालयाची कायद्याची पदवीहि त्यानें संपादन केलेली होती. या दाव्याचे कामीं सरकारतर्फे साक्ष देण्यास आलेले डेक्कन कॉलेजचे प्रोफेसर व विरुद्ध बाजूचे वकील या दोघांनाहि न्यायाधीश फारशी भाषा व लिपि उत्कृष्ट जाणणारे आहेत हें माहीत नव्हतें. सरकारतर्फे प्रोफेसराची साक्ष व्हावयाची आहे हें न्यायाधिशाला खटल्याच्या चौकशीस सुरवात होण्यापूर्वीच माहीत असल्यामुळें न्यायाधिशांनीं हा लेख काळजीपुरस्सर वाचून ठेवून त्याचा बरोबर अर्थ लावला होता. प्रोफेसरांची सरतपासणी, उलटतपासणी व फेरतपासणी झाल्यावर न्यायाधिशानीं प्रोफेसरांना कोर्टातर्फे सवाल विचारण्यास सुरवात केली व अर्ध्या तासाचे आत प्रोफेसरांनीं सरतपासणींत सांगितलेला अर्थ चुकीचा आहे असें प्रोफेसराच्या तोंडून वदविलें. या एका उदाहरणावरून ज्या मुद्यांविषयीं उलटतपासणी करावयाची त्यांचेसंबंधाचे ज्ञान कोणत्या प्रकारचें उलटतपासणी करणारापाशीं असावें लागतें हें दिसून येईल. उलटतपासणी हा एक स्वतंत्र विषय असून त्यावर अनेक लोकांनीं ग्रंथ केलेले आहेत; परंतु प्रस्तुत या ग्रंथाचा हा मुख्य विषय नसल्याकारणानें यासंबंधाचें अधिक दिग्दर्शन करण्याचें प्रयोजन नाहीं.

दाव्याचे कामीं प्रारंभीं दर्शविल्याप्रमाणें दाव्याच्या निकालावर परिणाम करणारा हा लेखी पुरावा असतो हें आम्ही नमूद केलेंच आहे. हा पुरावा वेळेवर कोर्टांत दाखल करण्याची खबरदारी वकिलानें न घेतल्यास पक्षकाराचें कसें नुकसान होतें याचें आम्हीं पूर्वीच दिग्दर्शन केलें आहे.

आतांपर्यंत दर्शविल्याप्रमाणें दाव्याच्या चौकशीचें काम कोर्टापुढें समाप्त झाल्यावर उभयतां पक्षकारांतर्फे वकिलांना आपापल्या पक्षकारातर्फे तक्रारी कोर्टापुढें मांडाव्या लागतात. कित्येकांचा असा समज आहे कीं इंग्रजी मार्फत सफाईदार भाषण केल्यानें पक्षकाराची बाजू यशस्वी ठरते. परंतु हा समज अत्यंत चुकीचा आहे. दाव्याचे कामीं झालेल्या पुराव्यावरून काढण्यांत आलेले मुद्दे कसे सिद्ध

होतात. वादिप्रतिवादींची न्यायाधिशाची खात्री करून देणें यांतच वकिलाची खरी करामत असते. पित्येक दाव्यांत निव्वळ कांहीं मुद्दे कायद्याचे असतात, त्या कायद्यांच्या मुद्यासंबंधीं आप या पक्षकाराचे पोषक असे हायकोर्टानें केलेल्या निवाड्याचे आधार न्यायाधिशास दाखवून त्याची खात्री करून दिली म्हणजे त्या वकिलाची बाजू यशस्वी होते. एके काळीं सफाईदार इंग्रजी भाषा बोलणें ही मोठी महत्त्वाची गोष्ट समजली जात असे. जिल्हा कोर्टांतील न्यायाधीश, वकील व पक्षकार यांना मराठी भाषा अवगत असते. असें असतां दाव्याचे चौकशीचे वेळीं इंग्रजी भाषेंत तक्रार सांगण्याची वास्तविक कांहीं जरूरी नसते. परंतु इंग्रजी भाषेंत भाषण केल्यानें दाव्याचे कामांतील पक्षकार व दाव्याचें काम चालू असतां तें ऐकण्याकरितां कोर्टांत बसलेले अन्य लोक यांचे मनावर आपल्या स्वतःच्या विद्वत्तेची छाप बसविण्याकरितां इंग्रजी भाषेंत भाषण करण्याच्या पद्धतीचें वकील अवलंबन करीत. प्रस्तुत मराठी भाषेचें वाजवी स्थान पटकावणाऱ्या इंग्रजी भाषेचें उच्चाटन होत असून मराठी भाषेस तिचा वाजवी हक्क व मान प्राप्त होऊं लागला आहे.

---

प्रकरण ८ वें

## १ वकील, वकिलवर्ग
## व
## वकिलीचा धंदा

# वकील शब्दाची उत्पत्ति व पूर्वेतिहास

महाराष्ट्रांत मराठ्यांची राजसत्ता लयास जाऊन इंग्रजांचें राज्य इ. स. १८१८ त स्थापन झाल्यानंतर या प्रांतातील लोक समाजापैकीं व्यक्तिव्यक्तींत उत्पन्न होणाऱ्या वादाचा निर्णय करण्याकरितां दिवाणी कोर्टें इंग्रजांनीं स्थापन केलीं व दिवाणी कोर्टें, वकील, वकिलवर्ग व वकिलीचा धंदा यांचा उदय झाला. मुंबईचे गव्हर्नर व त्यांचे कौन्सिलर यांनीं १८२७ सालांत दिवाणी कोर्टें, न्याय देणारे, न्यायाधिकारी व अन्य दुय्यम प्रकारचे अधिकारी यांबाबत इ. स. १८२७ सालचा रेग्युलेशन २ रा मंजूर करून अमलांत आणला. त्याचा उल्लेख मागें केलाच आहे. या कायद्यानें वकिलीच्या धंद्यास जन्म दिला व या कायद्याबरोबरच वकिलीचा धंदा करणारा वर्ग ब्रिटिश रियासतीच्या पूर्वी अस्तित्वांत नसलेला उदयास आला.

वकील हा शब्द मराठी भाषेंतील नसून तो अरबी भाषेतील आहे, व या शब्दाचा प्रवेश भरतखंडात मुसलमानी राजसत्तेबरोबर झाला. वायव्य सरहद्दीवरून मुसलमानांच्या स्वाऱ्या हिंदुस्थानवर नवव्या दहाव्या शतकांत होण्यास प्रारंभ झाला. याप्रमाणें कांहीं स्वाऱ्या झाल्यावर त्यांची राजकीय सत्ता उत्तर हिंदुस्थानांत अकराव्या शतकापासून प्रस्थापित झाली. पूर्वकालीन हस्तिनापूर ही जी पांडवांची राजधानी तिजला दिल्ली हें नामाभिधान प्राप्त झालें व त्या कालानंतर हिंदुस्थानात जीं निरनिराळीं मुसलमान राजघराणीं झालीं त्यांची राजधानी दिल्ली शहरच राहिली.

याप्रमाणें मुसलमानधर्मी लोकांची राजसत्ता उत्तर हिंदुस्थानांत प्रस्थापित झाल्यानंतर या राज्यकर्त्यांबरोबर मुसलमानी कायदा, चालीरीति, शिष्टाचार, अरबी व फारशी भाषा यांचा प्रवेश हिंदुस्थानात झाला. मुसलमानी विवाहाच्या कायद्यानुसार मुसलमान वधूवरांचा विवाहाचा करार काजीसमोर नोंदला जात असे. विवाहाच्या कराराचा लेख लिहिला गेल्यावर वधूवराच्या त्या लेखावर सह्या केल्या जातात. याप्रमाणें या लेखावर सह्या झाल्यावर वधूवरांच्यातर्फे दोन गृहस्थांच्या सह्या केल्या जात. या सह्या करणाऱ्या गृहस्थास वकील ही संज्ञा आहे व याच अर्थानें मुसलमानी समाजात हा शब्द, इंग्रजी राज्य स्थापन होण्यापूर्वी मुख्यतः रूढ होता. मुसलमानी कायद्यान्वयें प्रजेंत उत्पन्न होणाऱ्या वादाचा निवाडा करण्याचें काम काजीकडे असे. काजीपुढें वादाची चौकशी केली जात असतां प्रस्तुत न्यायाचे कोर्टांत ज्याप्रमाणें पक्षकारातर्फे काम चालविण्याकरितां दोन वकील असतात, तशा प्रकारच्या वकिलांकडून वादाच्या चौकशीचे वेळीं काम चालविलें जात असे, असें विधान करण्यास प्रस्तुत जीं इतिहाससाधनें उपलब्ध झालीं आहेत, त्यांत कांहीं पुरावा उपलब्ध झालेला नाहीं. इंग्रजी राजसत्ता स्थापन होण्यापूर्वी एका राजाच्या दरबारीं दुसऱ्या राजाचा अधिकारी, या दोन्ही राजांच्या दरम्यानचा व्यवहार करणारा जो अधिकारी असे त्याला वकील ही संज्ञा होती व इंग्रजपूर्वकालीन ऐतिहासिक वाङ्मयात या शब्दाचा उल्लेख अनेक ठिकाणीं आढळतो.

हिंदुधर्मशास्त्राचें संस्कृत भाषेंतील श्रुतिस्मृति वाङ्मय फार प्राचीन काळापासून उपलब्ध झालें आहे त्यात वकील या प्रस्तुत अर्थानें समजल्या जाणाऱ्या व्यक्तीचा उल्लेख आढळत नाहीं. सर्वांत प्राचीन असा मनुस्मृतिग्रंथ ख्रिस्ती शकाच्या पूर्वी ३०० वर्षें ते नंतर २०० वर्षें या दरम्यानच्या काळात रचिला गेला, ही गोष्ट मान्य झाली आहे. या ग्रंथात प्रजेंतील उत्पन्न होणाऱ्या वादांचा निर्णय कोणत्या धर्मान्वयें ( कायद्यान्वयें ) करावा, त्याचप्रमाणें तो कोणी व कोणत्या पद्धतीनें करावा, याविषयीं विस्तृत विवेचन आढळतें. परंतु ज्या दोन व्यक्तींमध्यें वाद उपस्थित झाला असेल, त्यांच्यातर्फे त्यांचे प्रतिनिधि म्हणून हजर होऊन वादाचें काम न्यायाधिशापुढें चालवावें, अशा प्रकारचा उल्लेख कोठें आढळत नाहीं. हिंदूंच्या धार्मिक कृत्यांत हिंदुधर्मशास्त्रकारांनीं प्रतिनिधित्वाचें तत्त्व मान्य केलें आहे. एखादें धार्मिक कृत्य करावयाचें असल्यास यजमानानें विधिपूर्वक संकल्प सोडून तें कृत्य त्याच्या

मतीनें उपाध्यायाच्या द्वारें करण्याची पद्धत ठेवण्यांत आली आहे; परंतु ही सवलत खर्च व्यक्तींत उत्पन्न होणाऱ्या वादाचा निर्णय न्यायाधिशाकडून घेणें जात असतां वाद चालणाऱ्या पक्षकार व दण्डाज ज्ञात्यानें आढळत नाहीं.

मनुस्मृतीनंतर अनेक अन्य स्मृतिग्रंथ व स्मृतिवरील टीकाग्रंथ भरतखंडांत रचिले जाऊन प्रसिद्धहि झाले आहेत परंतु या सर्व ग्रंथांत हल्लींच्या वकिलाप्रमाणें न्यायाधिशाकडून वादनिर्णयाचें काम केलें जात असतां वकिलाप्रमाणें पक्षकाराचें काम करणाऱ्या गृहस्थाची नेमणूक करण्याबद्दलचे उल्लेख कोठें आढळत नाहींत. तथापि या बाबतींत एखाद्या तज्ज्ञ विद्वानाचा अभिप्राय मिळाल्यास या मुद्याच्या चर्चेच्या दृष्टीनें उपयुक्त होईल असें वाटल्यावरून वाई प्राज्ञपाठशाळेचे व धर्मकोश कार्यालयाचे प्रमुख तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांना या मुद्याविषयीं अभिप्राय कळविण्याबद्दल पत्र लिहिलें. त्यांनीं या मुद्यासंबंधानें जो अभिप्राय आम्हास कळविला आहे, तो जसाच्या तसाच आम्ही खालीं देतों:—

"शुक्रनीतीमध्ये व्यवहारानभिज्ञ मनुष्यानें वाद चालविण्याकरिता (वादी किंवा प्रतिवादी यांच्यातर्फे, प्रतिनिधि तज्ज्ञ असा नेमावा" असें म्हटलें आहे. धर्मकोश व्यवहारकांड पृ. १३५ पहा.) हा प्रतिनिधि म्हणजे वकील असें म्हणण्यास हरकत नाहीं. कौटिल्य अर्थशास्त्रांत "निसृष्ट व्यवहार" म्हणून व्यवहाराधिकारी सांगितला आहे. मुखत्यार किंवा वकील असे दोन्ही अर्थ याचे होतात (व्यवहारकांड पृ. ५५१ पाहा.) बृहस्पतिस्मृतींत निसृष्टार्थ ही संज्ञा वरील अर्थीच योजलेली दिसते. (पृ. ५६२ पाहा.) संनियुक्त किंवा नियोगकृत म्हणजे नेमलेला; असा परार्थवादी, वादी प्रतिवादींनीं वादाकरिता नेमावयाचा असतो, असें कात्यायन स्मृतिवरून दिसतें. (पृ. ११६ व्य. कांड) संनियुक्त किंवा नियोगकृत म्हणजे नेमलेला. परार्थवादी म्हणजे दुसऱ्याकरिता वाद करणारा. हा वकीलच असावा असें निश्चित म्हणता येत नाहीं, मुखत्यारहि असूं शकेल. परंतु नारदस्मृतीच्या असहायभाष्यांत पाटलीपुत्र येथें घडलेली एक गोष्ट (उपाख्यान) सांगितली आहे. यांत वादीप्रतिवादीतर्फे नेमलेल्या दोन वकिलांचा स्पष्ट निर्देश आहे. ते दोघे वकील न्यायसभेंत स्मृतिशास्त्रांच्या आधारें आपापले पक्ष समर्थित करीत आहेत. या वकिलांचीं नांवें अनुक्रमें स्मार्तधुर्धर व स्मार्तशेखर अशीं आहेत. स्मार्त याचा भावार्थ येथें स्मृतिशास्त्राच्या आधारें पक्ष मांडणारा किंवा खंडण करणारा असा दिसतो. वर उद्धृत केलेल्या शुक्रनीतींत वकिलाची फी निर्दिष्ट केलेली आहे. (वरील असहायभाष्य धर्मकोश, व्यवहारकांड पृ. ६९२ व ६९४ यावर पाहा.) वरील असहायभाष्य अस्सल स्वरूपांत विद्यमान नाहीं. असहाय हा सगळ्यांत जुना असा स्मृतीचा टीकाकार होय. मेधातिथी विज्ञानेश्वर हे त्याच्या नंतरचे धर्मकोशांत उद्धृत केलेले असहायभाष्य कल्याणभट्ट नावाच्या कल्याचक्या अलीकडच्या पंडितानें स्वतःची मखलाशी करून मूळ स्वरूप बदलून टाकलेलें भाष्य आहे."

शास्त्रीबोवाचा हा अभिप्राय लक्षात घेता इग्रजी राज्याची स्थापना झाल्या नंतर ज्या प्रकारचा धदेवाईक वकीलवर्ग अस्तित्वात आला, तशा प्रकारचा वकील वर्ग इ स १८१८ सालापूर्वी महाराष्ट्रात कधीं काळीं अस्तित्वात होता असें विधान करणें सलास धरून होणार नाहीं

हिंदुधर्मशास्त्राचा इतिहास लिहिणारे सुप्रसिद्ध डॉ काणे यानीं स्मृत्यादि ग्रथाचे आलोडन करून वकीलवर्ग व वकिलीचा धदा करणारे लोक ब्रिटिश राजवटीपूर्वी अस्तित्वात होते कीं कसें याची चर्चा करून खालील अभिप्राय व्यक्त केला आहे तो महत्त्वाचा असल्याकारणानें आम्ही येथें उद्धृत करतों.

An interesting question arises whether lawyers as an institution existed in ancient India The answer must be that so far as the Smritis are concerned there is nothing to show that any class of persons whose profession was the same as that of modern counsel solicitors or legal practitioners, and who were regulated by the State existed This does not preclude the idea that persons well-versed in law of the Smritis and the procedure of the courts were appointed (Niyukta) to represent a party and place his case before the court The procedure prescribed by Nar, Br and Kat reaches a very high level of technicalities and skilled help must often have been required in litigation In the com of Asahaya as edited by Kalyanabhatta on Nar (rnadana 4) there is an instructive story from which it appears that persons who had studied the Smritis helped parties in return for a monetary consideration to raise contentions before the court But there also the helper comes forward saying that he is a very old friend of the family and has been appointed by the party to represent him So he corresponded to what is called a recongnized agent of the Indian Civil Procedure Order III r 2 (Act of 1908) in Sukra IV 5 114-117 some important rules are given 394 the person who is appointed to represent a party should get as his wages 1 16 1/20 1/40 1/80 or 1/160 part of the amount in dispute, that the wages become less and less as the claim in dispute, becomes higher or if several persons employ one representative one

who knows dharmashastra and the procedure of lawsuits should be appointed as respresentative and not any one who is deficient in these; if the representative takes wages without knowing these he should be punished by the King. A representative is to be appointed by the party and not by the king at his will; if the representative allows the matter entrusted to him to fail owing to his greed he is liable to be fined. 395 In the 'Questions of Milinda' (S. B. E. Vol. 36 p. 238) there is a passage about certain bhikkhus in the 'City of Righteousness' (dhammanagara) who are styled 'dhammapanikas' (dealers in dharma) and are described as follows : ' (bhikkhus) who *is the spirit and the letter in its arguments and explanations,* its reasons and examples teach and repeat, utters forth and recapitulate the threefold word of the Buddha; such bhikkhus are called, O King, lawyers in the blessed one's city of Righteousness; and on page 239 there are 'dhammasetthino (bankers of dharma), which word reminds of the sresthin in the Mricchakatik. The dhammapanikas probably correspond to such lawyers as Smartadurdhara mentioned above The rules of Sukra make a near approach to the modern institution of the Bar and the fees prescribed by Sukra are similar to those allowed by the Bombay Regulation II of 1827 and by Schedule III to the Bombay Pleaders' Act (Bombay Act XVII of 1920).

महाराष्ट्रात इ स. १८१८ साली इंग्रजी राज्याची स्थापना झाल्यानंतर जी न्यायनिवाडा करण्याची पद्धत मागील भागांत वर्णन केल्याप्रमाणें उदयास आली, तसि अनुसरून सुरुवातसि नमूद केल्याप्रमाणें वकीलवर्ग जन्मास आला. मुंबई बेट हें मूळ पोर्तुगीजांच्या मालकीचें होतें. पोर्तुगीज राजकन्या कॅथेराइना ब्रगँझा हिचा विवाह इंग्लंडच्या दुसऱ्या चार्लस राजाबरोबर झाल्यावेळीं हें बेट इंग्लंडच्या राजास इ. स. १६६२ सालात आंदण मिळालें व तें त्यानें इ. स. १६६८ त ई. इं. कंपनीस भाड्यानें दिलें. तेव्हापासून तेथें इंग्रजांची राजसत्ता प्रस्थापित झाली. याप्रमाणें त्या प्रदेशात इंग्रजांची राजसत्ता प्रस्थापित झाल्यावर तेथें इंग्लंड देशातील प्रचलित असलेली न्यायदान–पद्धति, न्यायालयें व प्रजेंतील वादाचे निवाडे करणारे

न्यायाधीश यांच्यापुढें वादाचा निवाडा करण्याचें काम चालू असतां उभयतां वाद्यांतर्फे तक्रारी मांडणारा वकीलवर्ग अस्तित्वात आला होता. याप्रमाणें मुंबई बेटांत प्रस्थापित झालेल्या न्यायदानपद्धतीप्रमाणें हुबेहूब पद्धत पेशव्यांकडून जिंकलेल्या प्रदेशांत इंग्रज राज्यकर्त्यांनीं सुरू न करिता निराळी पद्धत सुरू केली. या पद्धतींत मुंबई बेटातील सॉलिसिटर्सऐवजीं सन १८२७ च्या २ न्या रेग्युलेशन अन्वयें वकील या संज्ञेनें प्रस्तुत जो वर्ग ओळखिला जातो, तो निर्माण केला. इंग्रजांनीं स्थापन केलेल्या नूतन न्यायदान--पद्धती अन्वयें कोणत्याहि वादाचा निर्णय करावयाचा म्हणजे त्या वादांतील पक्षकाराच्या तक्रारी योग्य प्रकारें न्यायाधिशापुढें मांडून वादाचा निर्णय करण्याचे कामीं न्यायाधिशास मदत करण्याकरिता वकिलासारख्या व्यक्तीची आवश्यकता होती. या दृष्टीनें वरील कायद्यात वकिलाची नेमणूक करणें व वकिलानें पक्षकारातर्फे हजर होऊन वादाचें काम चालविणें या संबंधाची युक्त कलमें या कायद्यात समाविष्ट करण्यात आलीं. येथपर्यंत केलेल्या विवेचनावरून वकील, वकीलवर्ग व वकिलाचा धंदा ब्रिटिश राजसत्तेपूर्वीं अस्तित्वात नसून एव्हापासूनच तो प्रथमतः अस्तित्वात आला, ही गोष्ट जरी खरी असली, तथापि व्यक्तीव्यक्तींत उत्पन्न होणाऱ्या वादाचा निवाडा करून घेण्याकरिता ब्रिटिश राजवटीपूर्वी जी पद्धत अस्तित्वात होती, तींत उभयतां वादींस वादनिर्णयाच्या कामीं, तत्कालीन कायद्याचें ज्ञान असणाऱ्या लोकांकडून मदत मिळत असे व अशा लोकांच्या सल्ल्याचा वादनिर्णयाच्या कामीं उपयोग होत असे. ब्रिटिश राजवटीच्या काळापूर्वी मराठी राजसत्तेच्या काळातील जीं इतिहाससाधनें प्रस्तुत उपलब्ध झालीं आहेत, त्याच्या परीक्षणावरून निदर्शनास येणाऱ्या एका महत्त्वाच्या बाबीचा उल्लेख प्रस्तुत स्थळीं करणें जरूर आहे. त्या कालीं वतनासारख्या मूल्यवान् मानण्यात येणाऱ्या मिळकतीसंबंधाचे वाद उपस्थित झाले असतां वाद सांगणाऱ्या दोन व्यक्तींपैकीं एखादी व्यक्ति निर्धन अगर दुबळी असली तर तिच्यातर्फे द्रव्य खर्च करून वाद सांगण्याचें काम एखादा सधन व बुद्धिमान इसम, मिळकतीपैकीं कांहीं हिस्सा मोबदला घेऊन त्याचेतर्फे वाद चालवीत असे. याप्रकारें निर्धन व दुबळ्या व्यक्तीच्या वतीनें काम चालविणाऱ्या व्यक्तीस 'पाठिराखा' असें म्हणत. वाद यशस्वीपणें सांगण्याच्या कामीं हा पाठिराखा ज्या खटाटोपी करावयाच्या त्या करी व जरूर तर सरकारदरबारातील मोठमोठ्या अधिकाऱ्यास जरूर तें द्रव्यहि देऊन त्या वादात यश मिळवी. छत्रपति राजाराम महाराजांच्या कालीं प्रसिद्धीस आलेले रामचंद्र नीलकंठ अमात्य यांनीं मोठमोठ्या व मूल्यवान् वतनमिळकतींचे हिस्से पाठीराखेपणा करून संपादन केल्याबद्दलचे कागदपत्र प्रसिद्ध झाले आहेत. याचें एक उदाहरण मराठ्याचे इतिहासाचीं साधनें, खंड ८, लेखांक ४२, तारीख ४ आक्टोबर सन १६९१ सालचें आढळतें. या लेखास नेमपत्र असें म्हटलें आहे. या लेखाचा आशय ध्यानांत घेतला असतां नेमपत्र म्हणजेच करारपत्र असें दिसून येतें. कृष्णाजी मुलगो इत्यादि लोकांच्या मालकीचें १६ गांवचें देसकुळकरण व गावकुळकरण होतें,

या सर्व लोकांची स्थिति अत्यंत गरिबीची होती. त्यामुळें हें वतन विठाजी काशी अधर्मण इत्यादि लोकांनी जबरदस्तीनें त्यांचे ताब्यांतून घेऊन या वतनाचा उपभोग ते घेत असत याबद्दलचे पंचाचे निवाडे कृष्णाजी बुलगो इत्यादि लोकांस्वा तर्फे झाले असूनहि त्यांचे प्रतिपक्षी सरकारदरबारांतील मोठमोठया लोकांस लाच देऊन आपलेतर्फे वादाचा निवाडा करून घेऊन जबरदस्तीनें वतनाचा उपभोग घेत ही हकीकत रामचंद्र नीलकंठ अमात्य यांस बुलगो मजकुरांनीं निवेदन केली. बुलगो व अमात्य यांच्यात खालीलप्रमाणें नेमपत्र झालें· "रामचंद्र नीलकंठ यांसी बोलिले जे, स्वामीनें या गोष्टीस मन घालून देशकुळकरण व गावकुळकरण व ज्योतिष ऐसें द्यावें ऐसा तह झाला ..... गांवकुळकरणें व ज्योतिषें पधरा व देश कुळकर्ण हे निमे आपले संतोषें देतों. आपली पाटी व साहेता पुरवावी......हे गोष्टीस राजश्री रामचंद्र नीलकंठ यांनीं मान्य केलें."

या प्रकारें करार करून अनेक गरीब व विपन्नावस्थेंतील वतनदारांनीं, त्यांच्या वतनाचा जोरावारीनें उपभोग घेणाऱ्या प्रतिपक्षाकडून वतन मिळविल्याचीं कित्येक उदाहरणें त्या कालचीं उपलब्ध झालीं आहेत. अशा प्रकारचा पाठिराखेपणा करून निर्धन व दुबळ्या व्यक्तींच्या तर्फे वाद सागणें ही गोष्ट कायद्याच्या व न्यायाच्या विरुद्ध त्या काळीं समजली जात नसे. इग्लंडांतील पूर्वे व प्रस्तुत कायद्यान्वयें पाठिराखेपणा करून मिळकतीचा हिस्सा मोबदला म्हणून मिळविणें या प्रकारास ( चॅंपर्टी ॲंड मेन्टेनन्स ) असें म्हणतात. प्रस्तुत कालीं हिंदुस्थानांत इंग्रजी कायद्याचें हें तत्त्व मान्य करण्यांत येत नाहीं कित्येक गरीब लोकांना द्रव्याच्या अभावीं त्यांची मूल्यवान् मिळकत एकाद्या जबरदस्त व्यक्तीनें बळकाविली, तर जरूर तें द्रव्य खर्च करून ती परत मिळविण्याची ऐपत नसते. अशा व्यक्तींची फिर्याद कोर्टांत दाखल करून ती मिळकत त्या व्यक्तीस परत मिळवून दिल्यावर त्या मिळकतीपैकीं कांहीं भाग मोबदला घेतला तर हा व्यवहार इग्रजी कायद्यान्वयें जरी बेकायदेशीर मानला जातो, तरी हिंदुस्थानात प्रस्तुत कालीं बेकायदेशीर मानला जात नाहीं. प्रिव्हीकौन्सिलचे या सबधाचे निवाडे प्रसिद्ध आहेत

मागें दर्शविल्याप्रमाणें इग्रज राज्यकर्त्यांनीं इ स १८२७ सालांत जे अनेक रेग्युलेशन्स मंजूर केले त्यांत वकीलासबंधाचा १८२७ चा २ रा रेग्युलेशन मजूर केला त्यांतील वकिलासबंधाचीं कलमें पुढील विवेचनांत आलीं आहेत तथापि वकील या नात्यानें वाद करणाऱ्या व्यक्तींच्या तर्फे हजर होऊन त्या वादाचें काम न्यायाधिशापुढें चालविण्याकरिता लागणारी पात्रता वकिलांत आहे कीं नाहीं, हें ठरविण्याची योजना त्या कालीं अमलांत आणली गेली नव्हती. परीक्षा देऊन तींत उत्तीर्ण होणाऱ्या व्यक्तीस वकिली करण्याची परवानगी देण्याची पद्धति हा कायदा झाल्यानतर बरेच वर्षांनीं अमलात आली ही गोष्ट जरी खरी असली, तरी ज्याला न्यायाधिशापुढें वादाचे कामीं तक्रार सांगण्याकरिता पक्षकारातर्फे पुढें यावयाचें, तें काम करण्याची पात्रता त्याच्यात आहे किंवा नाहीं याची तपासणी करून

नंतर वकिली करण्याची परवानगी दिली जात असली पाहिजे, असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. वरिष्ठ प्रकारचे न्यायाधीश त्या काळीं गोरे इंग्रज असत. त्यांना मराठीचें ज्ञान यथातथाच असे. त्यांच्या मदतीकरितां मराठी व इंग्रजी जाणणारा एतद्देशीय शिरस्तेदार असे. गोरा न्यायाधीश व शिरस्तेदार यांचे समक्ष वकिलीचा धंदा करूं इच्छिणाऱ्या उमेदवाराची पात्रता ठरविली जाई जुन्या पिढीतील एका वकिलांनीं आम्हांस सांगितलेली त्या काळची एक प्रचलित दंतकथा अशी आहे कीं कोणा एका श्रीमान् गृहस्थाकडे एक हुषार शागीर्द होता, त्यानें वकिलीचा धंदा करण्याचें ठरविलें व शिरस्तेदाराशीं संधान बांधून तो गोऱ्या साहेबापुढें परीक्षेकरिता उभा राहिला. साहेबानें उमेदवारास वकीलपत्रास स्टँप कितीचा लागतो, असा प्रश्न केला, परंतु उमेदवाराला ही गोष्टहि माहिती नव्हती. उमेदवार आँ आँ करूं लागला. तेव्हां शिरस्तेदारानें साहेबास सुनावलें, आठ आण्याचा स्टँप लागतो, असें उमेदवार म्हणत आहे. शिरस्तेदारानें याप्रमाणें सुनावणी करताच साहेबानें त्या शागीर्द उमेदवारास वकिली करण्याची परवानगी दिली. ही परवानगी मिळाल्यानंतर शागीर्द उमेदवारानें हुषार व जाणते कारकून नोकरीस ठेवून वकिलीचा धंदा सुरू केला व थोड्याच काळांत आघाडी मारून द्रव्यहि पुष्कळ मिळविलें. ही त्या काळची जरी सत्यकथा असली, तरी त्या काळचे सर्वच वकील अशाच पद्धतीनें झाले असें म्हणता येत नाहीं. इ. स. १८२७ सालापासून तों मुंबईच्या हायकोर्टाची स्थापना होईपर्यंत वकिलीची परीक्षा वकील होऊं इच्छिणाऱ्या उमेदवारास द्यावी लागत असे, असें दिसत नाहीं. मुंबई हायकोर्टास बादशहाकडून जी सनद देण्यात आली त्या सनदेअन्वयें हाय-कोर्टानें वकिलीचा धंदा करणा या उमेदवाराची लायकी ठरविण्याकरितां सालोसाल परीक्षा घ्याव्या, असें ठरवून दिलें. या ठरावान्वयें जिल्हा व हायकोर्ट अशा वकिलांच्या दोन निरनिराळ्या परीक्षा घेण्यास हायकोर्टानें प्रारंभ केला. तेव्हांपासून प्रस्तुत ज्या प्रकारचा वकीलवर्ग आहे तशा प्रकारचा वकीलवर्ग अस्तित्वांत आला. प्रारंभीं ही परीक्षा देशी मार्फत घेतली जात असावी असें वाटतें कारण १९१२ सालापर्यंत इंग्रजी न जाणणारे जुने मराठी वकील अनेक ठिकाणच्या कोर्टांत वकिली करीत असलेले दिसत होते. जिल्हा आणि हायकोर्ट वकिलीची परीक्षा इंग्रजींत इ. स. १८७५।७६ त सुरू झाल्यापासून इंग्रजी जाणणारे वकील ठिकठिकाणच्या कोर्टांत वकिलीचा धंदा करूं लागले. गेल्या ५०।६० वर्षांचा वकिलीच्या धंद्याचा इतिहास मुंबई इलाख्यापुरता पाहिला असतां सन १८९० सालापावेतों वकिलीच्या परीक्षा देऊन वकिलीचा धंदा करण्याकडे मुंबई इलाख्यांतील शिकलेल्या लोकांनीं विशेष लक्ष नसे. मुंबई विश्वविद्यालयाची प्रवेश परीक्षा पास झाल्यानंतर ज्यांची विश्वविद्यालयीन शिक्षण घेण्याची आर्थिक पात्रता नसे अशा वर्गापैकीं सुशिक्षित लोक खाजगी रीतीनें अभ्यास करून या दोहींपैकीं कोणती तरी एक परीक्षा पास होऊन वकिलीचा धंदा करीत. सन १८८० सालापासून विश्वविद्यालयाच्या परीक्षेस बसणाऱ्या उमेदवाराच्या संख्येंत वाढ झाली. अल्प द्रव्य खर्च करून बऱ्या प्रकारचें द्रव्य मिळविण्याचा हा

एक प्रतिष्ठित धंदा आहे, असें अनेकाच वाटू लागून या परीक्षांस बसणाऱ्या उमेदवारांची संख्या सालोसाल वाढत गेली. सन १८९० चे सुमारास जिल्हा व हायकोर्ट वकिलीच्या परीक्षेस बसणाऱ्या उमेदवारांची संख्या ३०० पेक्षां अधिक नव्हती परंतु इ. स. १८९७ साली जिल्हा कोर्टाच्या वकिलीच्या परीक्षेस बसणाऱ्या उमेदवारांची संख्या ८०० होती व यांपैकीं १६ उमेदवार उत्तीर्ण झाले. •

याप्रमाणें परीक्षेस बसून उत्तीर्ण होणाऱ्या लोकांत बहुसंख्य उमेदवार ब्राह्मण असत याचें कारण ब्राह्मण ज्ञाती शिवाय अन्य जातींत इंग्रजी शिक्षणाचा प्रसार म्हणण्यासारखा झाला नव्हता. याप्रमाणें उत्तीर्ण झालेले उमेदवार तालुका कोर्टांत व जिल्हा कोर्टांत वकिलीचा धंदा करण्याच्या सनदा मुंबई हायकोर्टाकडून घेऊन त्यांना पसंत असलेल्या ठिकाणीं स्थायिक होत. पाश्चात्य शिक्षणसंस्था व विश्वविद्यालयीन शिक्षण देणाऱ्या संस्था इंग्रज सरकारनें स्थापन केल्यावर सुरुवातीस या संस्थांत शिक्षण घेण्याकरितां दाखल होणारे बहुतेक तरुण ब्राह्मण व पांढरपेशा वर्गांपैकीं असत. यामुळें या लोकांपैकीं वकिलीची परीक्षा व विश्वविद्यालयीन एल्एल. बी. ची परीक्षा उत्तीर्ण होणारे लोक या वर्गांपैकींच असत. परंतु जिल्ह्याचे व तालुक्याच्या ठिकाणीं दुय्यम शिक्षण देणाऱ्या संस्थांची स्थापना होऊन त्यांचा जसजसा प्रसार होत चालला, तसतसा अन्य जातींत शिक्षणाचा प्रसार होत जाऊन प्रस्तुत निरनिराळ्या जिल्ह्यांच्या व तालुक्यांच्या ठिकाणीं मारवाडी, माळी, शिंपी, सोनार, न्हावी, माळी इत्यादि ज्ञातींतील तरुण कायद्याच्या परीक्षा देऊन वकिलीच्या धंद्यांत पडले आहेत. यामुळें वकिलीच्या कामाची विभागणी ज्ञातितत्त्वावर होण्यास प्रारंभ झाला. ज्या ज्ञातीचा वकील त्या ज्ञातीचे लोक वकिलीचीं कामें आपल्या ज्ञातिबांधवाकडे देऊं लागले आहेत. यामुळें कित्येक ब्राह्मण वकिलांचीं कामें त्यांचेकडे येण्याचें बंद पडलें आहे. प्रारंभीं या प्रवृत्तीचा ब्राह्मण वकिलांच्या कामावर जरी अनिष्ट परिणाम झाला, तरी थोड्याच काळांत ज्ञातिबांधवाकडे वकिलीचीं कामें देण्याच्या प्रवृत्तीस आळा पडण्यास सुरुवात झाली. स्वज्ञातीच्या वकिलाकडे वकिलीचीं कामें देणाऱ्या लोकांनीं स्वतःचा मतलब साधण्याचा डाव सुरू केला. स्वज्ञातीच्या वकिलाकडे काम देण्याच्या औदार्याचा देखावा दाखवून कमी वकिली देऊन आपलीं कामें करून घेण्यास सुरुवात केली.

वकिलीच्या धंद्यात पडणारे ब्राह्मणाखेरीज अन्य जातीचे वकील स्वज्ञातीचा पक्षकार जे देईल ते पैसे घेऊन त्यांचीं कामें करूं लागले. याचा अनिष्ट परिणाम थोडक्याच दिवसांत या वकिलांच्या प्रत्ययास येऊं लागला. वकिलीच्या कामाच्या बाकया थकूं लागून त्या देण्याविषयींचा तगादा स्वज्ञातीच्या पक्षकाराकडे करणें या वकिलांस अडचणीचें भासूं लागलें. याचें अखेर पर्यवसान स्वज्ञातीच्या पक्षकारांचीं कामें घेणें फायद्याचें नसल्यानें कामें अव्हेरण्यांत झालें. प्रारंभीं ब्राह्मण वकिलांच्या वकिलीच्या धंद्यावर जरी अनिष्ट परिणाम घडला असला, तरी भविष्य काळीं जें काम पक्षकारास वकीलामार्फत यशस्वी व्हावें अशी इच्छा असेल तें

काम करण्याची पात्रता ज्या वकिलात असेल, त्याच्याकडे तो जातिभाव लक्षात न घेतां सोंपविण्याची प्रवृत्ति पक्षकारात रूढ झाल्याखेरीज राहणार नाहीं.

वकिलीची परीक्षा पास झाल्यानंतर वकीलवर्गात दाखल होणारास मुंबई हायकोर्टाकडून वकिलीचा धंदा करण्याची सनद घ्यावी लागते. त्याशिवाय त्यास वकिलीचा धंदा करता येत नाहीं. तालुका अगर जिल्हा कोर्टात ज्याला वकिली करावयाची असेल त्यानें हायकोर्टाकडे अर्ज केल्यावर रक्कम रुपये पांच त्याचेकडून घेऊन त्याला सनद मिळत असे. हायकोर्टानें सुरू केलेल्या डिस्ट्रिक्ट प्लीडर व हायकोर्ट प्लीडर या परीक्षेत अथवा मुंबई विश्वविद्यालयाच्या एल्‌एल्‌. बी. च्या परीक्षेत उत्तीर्ण झालेल्या इसमास याप्रमाणें हायकोर्टाकडून सनद मिळत असे. हायकोर्ट वकिलाची परीक्षा पास झालेल्या इसमास तालुका, जिल्हा व मुंबईचें हायकोर्ट यात वकिलीचा धंदा करितां येत असे. मात्र त्यानें रक्कम रुपये ५०० भरून हायकोर्टाचा धंदा करण्याची सनद मिळविली असली पाहिजे. हायकोर्टानें सुरू केलेल्या डिस्ट्रिक्ट प्लीडरच्या परीक्षेत पास झालेल्या इसमास फक्त जिल्हा अगर तालुका कोर्टातच वकिली करता येत असे. प्रस्तुत डिस्ट्रिक्ट कोर्ट व हायकोर्ट प्लीडरच्या परीक्षा मुंबई हायकोर्टानें बंद केल्या असून मुंबई विश्वविद्यालयाच्या परीक्षेत पास होणारास वकिलीच्या सनदा देण्याचा प्रघात सुरू केला आहे. वकिलीची सनद देण्याचें सन १८२७ सालच्या २ ऱ्या रेग्युलेशनचीं महत्त्वाचीं कलमें प्रस्तुत स्थळीं देणें जरूर आहे.

सन १८२७ च्या २ ऱ्या रेग्युलेशन अन्वयें वकिलाचा हुद्दा मिळविण्याची इच्छा धारण करणाऱ्या व्यक्तीचे ठायीं कोणत्या लायकीची आवश्यकता आहे; सदरहू हुद्दा देण्याचा अधिकार कोणाचा आहे, तो कोणत्या पद्धतीनें देण्यात येतो व हा हुद्दा देण्यांत आलेल्या व्यक्तींचें कर्तव्य व जबाबदाऱ्या इत्यादि मुद्द्यांचें थोडक्यांत दिग्दर्शन करणें प्रस्तुत स्थळीं अवश्य आहे. प्रारंभींच आम्हीं असें नमूद करितों कीं, सन १८२७ च्या दुसऱ्या रेग्युलेशन नंतर मुंबई इलाख्यात वकिलीच्या संबंधानें वेळोवेळीं कांहीं वर्षांच्या अंतरानें जरी तीन कायदे झाले तरी २७ च्या रेग्युलेशन अन्वयें निश्चित झालेल्या वरील मुद्द्यांचे बाबतींत म्हणण्यासारखा फेरफार झालेला नाहीं. वकिलास दिलेली सनद रद्द करण्याचा जो हायकोर्टाचा अधिकार आहे त्या बाबतींत मात्र एक महत्त्वाचा फरक झाला असून तो यापुढील विवेचनात नमूद केला आहे. १८२७ च्या २ ऱ्या रेग्युलेशनचीं ४७ ते ५२ कलमें वकिलासंबंधींचीं आहेत.

४७ व्या कलमात नेटिव्हज् (एतद्देशीय) अगर अन्य लोकांपैकीं, पक्षकारातर्फे काम चालविण्याकरितां कोर्टापुढें चाललेल्या वादात प्लीडर (वकील) म्हणून हजर राहण्याची परवानगी देण्यांत यावी. ४८ व्या कलमात ज्यानें वकील या नात्यानें काम करण्याची लायकी संपादन केली आहे व ज्याचें वर्तन चांगल्या प्रकारचें (Exceptionable Character) आहे अशा माणसाची वकील म्हणून

नेमणूक करण्यांत यावी. सदर दिवाणी अदालतीनें आपल्या शिक्याचा लेख करून अशा माणसास वकिली करण्याची परवानगी द्यावी ४९ व्या कलमात जिल्हा जज्जानें त्याच्या अधिकारातील कोणत्या कोर्टांत वकील या नात्यानें काम करावयाचें हें त्या वकिलास ठरवून द्यावें ५० व्या कलमात कोणत्याहि कामांत वकिलानें पक्षकाराकडून घेतलेलें वकीलपत्र अथवा मुखत्यारपत्र हजर करून पक्षकाराचें काम चालवावें वकीलपत्र घेण्यापूर्वी वकिलानें आठ आणे रिटेनिंग फी (बयाणा) पक्षकाराकडून घ्यावा याप्रमाणें पक्षकारानें बयाण्याची रक्कम वकिलास न दिल्यास त्याचेवर पक्षकारातर्फे हजर होऊन तें काम चालविण्याची कोणत्याहि प्रकारची जबाबदारी नाहीं बयाण्याची रक्कम दिल्यावर वकिलानें त्या कामात हजर होऊन काम चालवावें ५१ व्या कलमात पक्षकाराकडून घेतलेले कागदपत्र त्यास परत दिल्यावर त्याजकडून पावती घ्यावी ५२ व्या कलमांत वकिलास काम चालविण्याचा मोबदला म्हणून दाव्यातील विषयाची किंमत रक्कम रु २००० पावेतों शेंकडा ३ टक्के, २००० ते १०,००० पावेतों शेंकडा २ टक्के याप्रमाणें रक्कम घ्यावी अपिलाचे कामीं याचप्रमाणें वकिलानें कामाचा मोबदला घेत जावा काम चालविण्याच्या मोबदल्याबद्दल स्वतंत्र करार पक्षकाराबरोबर वकिलास करण्यास हरकत नाहीं, असें सांगितलें आहे

अशा प्रकारचा स्वतंत्र करार पक्षकारानें वकिलाबरोबर केला असला, तरी कोर्टानें दाव्याच्या खर्चाच्या आकारणींत वकिलाची फी म्हणून खर्चाबद्दल करारात नमूद असलेल्या रकमेपेक्षा अधिक रक्कम दिली तर ती रक्कम पक्षकाराकडून घेण्याचा वकिलास अधिकार आहे मात्र पक्षकारानें ती रक्कम त्याच्या प्रतिपक्षाकडून वसूल करून घेतली असली पाहिजे

याप्रमाणें वकिलासंबंधीं महत्त्वाचीं कलमें या रेग्युलेशनमध्यें नमूद आहेत सदर दिवाणी अदालतीनें वकिलाची नेमणूक ज्या लेखा वर्ये करावयाची त्याचा नमुना या रेग्युलेशनचे शेवटीं देण्यात आला आहे या लेखास 'सनद' ही संज्ञा आहे वकिलास द्यावयाच्या सनदेंत जोंपावेतों वकिलाची वर्तणूक चांगली (Good character) राहील व तो आपलें काम दक्षतेनें करील तोंपावेतों त्याला वकील या नात्यानें काम करता येईल असें नमूद केलेलें असतें डिसेंबर १८९७ सालच्या आम्हांस हायकोर्टानें दिलेल्या सनदेंत १८२७ चा २ रा रेग्युलेशन व १८४६ चा १ ला ॲक्ट याअन्वयें तुम्हास वकिली करण्याची परवानगी देण्यात आली असून जोंपावेतों तुमचें वर्तन चांगलें (Good character) असेल व तुम्ही आपलें काम दक्षतेनें व प्रामाणिकपणानें करीत राहाल तोंपावेतों ही परवानगी काढून घेण्यांत येणार नाहीं, असा मजकूर आहे आमच्या समवेत वकिली करणाऱ्या एका वकिलास सन १९३८ च्या फेब्रुवारी महिन्यात जी सनद देण्यांत आली आहे, तींत 'सन १९२० च्या नांवें प्लीडर्स ॲक्ट अन्वयें सनद देण्यांत येते कीं' असें नमूद असून तुम्हास वकिली करण्याची सनदेअन्वयें जी परवानगी देण्यात आली

आहे, ती योग्य कारणाशिवाय ( Reasonable cause ) काढून घेण्यात येणार नाहीं, असें नमूद करण्यांत आलें आहे. वकिलासंबंधाचे सन १८२७ च्या २ च्या रेग्युलेशन अन्वयें जीं कलमें मंजूर करण्यात आलीं, त्यात त्या रेग्युलेशननंतर सन १८४६ चा ॲक्ट नं. १ (ईस्ट इंडिया कंपनीच्या वकिलास मिळावयाच्या मोबदल्याबाबतचा ॲक्ट ) कोर्टांत वकिलीचा धंदा करणा या व सन १८५३ चा ॲक्ट नं. २० ( ईस्ट इंडिया कंपनीच्या कोर्टातील वकिलीसंबंधाचा ॲक्ट ) हे दोन्ही कायदे जरी मंजूर करण्यांत आले, तरी सन १८२७ च्या रेग्युलेशन अन्वयें निश्चित झालेल्या वकिलासंबंधींच्या कलमात म्हणण्यासारखा फेरफार झाला नाहीं. अगदीं अलीकडील म्हणजे सन १९२० सालात मुंबई इलाख्यातील वकिलासंबंधींचा १७ वा कायदा मंजूर करण्यात येऊन सध्या तो अमलात आहे. या कायद्यान्वयें सन १८२७ चा रेग्युलेशन २ त्याचप्रमाणें १८४६ चा ॲक्ट नं. १ व १८५३ चा ॲक्ट २० हे सर्व कायदे रद्द करण्यात आले आहेत.

## सनद रद्द करण्याचा अधिकार

वकिली करण्याची सनद वर दर्शविल्याप्रमाणें नामदार हायकोर्टाकडून वकिलवर्गांत प्रवेश होण्यास्तव मिळवावी लागते व या सनदेंत नमूद केल्याप्रमाणें वागणें वकिलास प्राप्त असतें. एखाद्या वकिलाची वर्तणूक १८२७ च्या रेग्युलेशनप्रमाणें देण्यात आलेल्या अथवा सन १९२० सालच्या १७ व्या ॲक्टाअन्वयें देण्यात आलेल्या सनदेनुसार न झाली तर त्या वकिलाची सनद रद्द करण्याचा अधिकार नामदार हायकोर्टास आहे. हिंदुस्थानातील अलीकडील प्रचलित राजकीय चळवळीचे योगानें या निरनिराळ्या प्रकारच्या सनदातील शब्दयोजनेनुसार वकिलाच्या सनदा रद्द करण्याबाबत हायकोर्टाकडे तक्रारी येऊन त्याबाबत मुंबई हायकोर्टाचे व अन्य हायकोर्टांचे निवाडे प्रसिद्ध झाले आहेत. सन १८२७ च्या २ च्या रेग्युलेशन अन्वयें दिलेल्या सनदेंत Good behaviour असे जे शब्द वापरण्यात आले आहेत, त्या शब्दाच्या दृष्टीनें राजद्रोही स्वरूपाच्या चळवळींत एखादा वकील सामील असल्यास त्याची सनद रद्द करण्याचा अधिकार नामदार हायकोर्टास प्राप्त होतो की काय हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. यासंबंधी नामदार हायकोर्टानें केलेले निवाडे कोणत्या स्वरूपाचे आहेत याचें दिग्दर्शन करण्यापूर्वी एक महत्त्वाचा मुद्दा लक्षात घेण्यासारखा असा पुढें येतो कीं, प्रत्येक देशांतील मानवास त्याचा देश परकीयांच्या सत्तेखालीं असल्यास त्यास स्वातंत्र्य प्राप्त करून देणें आपलें पवित्र कर्तव्य आहे, असें वाटतें. या पवित्र वाटणाऱ्या कर्तव्यानुसार त्यानें स्वदेशाच्या स्वातंत्र्यास्तव राज्यकर्त्यांच्या दृष्टीनें राजद्रोही ठरलेल्या चळवळींत भाग घेणें हें प्रत्येक राष्ट्रांतील मानवीप्राण्याचे जे जन्मसिद्ध हक्क म्हणून मानले जातात, त्याच्या विरुद्ध नव्हे या कारणानें न्याय्यच समजलें पाहिजे. हा मुद्दा लक्षांत घेतां Good behaviour या शब्दाचा अर्थ संकुचित दृष्टीनें केला जातो

कामा नये. या दृष्टीनें राजद्रोही चळवळींत भाग घेणाऱ्या वकिलाच्या सनदा रद्द करणें हें न्याय्य ठरणार नाहीं. पूर्वीच्या सनदेंतील Good behaviour हे शब्द काढून टाकण्यात येऊन प्रस्तुत देण्यात येणाऱ्या सनदेंत Reasonable cause (योग्य कारण) शिवाय अन्य कारणाकरिता सनद रद्द करण्यात येणार नाहीं ही जी शब्दयोजना करण्यांत आली आहे ती वर दर्शविलेली अडचण सनद रद्द करण्याच्या बाबतींत येऊं नये म्हणून नवीन कायद्यात हेतुपुरस्सर घातलेली दिसते. या फेरफारामुळें एखादा वकील चांगल्या वर्तणुकीचा असूनहि त्यानें कायदेभंग, असहकार अशा प्रकारच्या राजकीय चळवळींत भाग घेतला तर त्याची सनद रद्द करण्यास न्यायाधिशास योग्य कारण वाटल्यास त्याची सनद तो रद्द करूं शकेल. कायदेभंगाच्या चळवळींत भाग घेणारे कांहीं वकील व कांहीं बॅरिस्टर यांच्यासंबंधीं तक्रारी करणारे अर्ज नामदार हायकोर्टांत दाखल झाले व या बाबतींत मुंबई व अन्य ठिकाणच्या हायकोर्टांनीं आपले निवाडे दिले आहेत. या निवाड्यांचे बाबतींत नामदार हायकोर्टानें दिलेल्या सनदेअन्वयें वकिलीचें काम करणारे वकील व बॅरिस्टरची परीक्षा पास झालेले कायदेपंडित यांच्यात या मुद्याच्या दृष्टीनें फरक आहे. बॅरिस्टरची परीक्षा पास झालेल्या कायदेपंडितास हायकोर्टांत काम चालविण्याचा अधिकार नामदार हायकोर्टापुढें त्यानें हजर होऊन वकिली करण्याची परवानगी मिळावी या विधीनें होतो. यास इंग्रजींत Call to the Bar असें म्हणतात. अशा तऱ्हेनें बॅरिस्टरच्या धंद्यात प्रवेश झालेल्या बॅरिस्टरास वकिलीचा धंदा करण्याची प्राप्त झालेली परवानगी हायकोर्टास काढून घेण्याचा अधिकार प्राप्त होत नाहीं. कारण बॅरिस्टरला वकिलीचें काम करण्याची परवानगी दिली जाते ते वेळीं त्याच्यावर कोणतेच निर्बंध घालण्यांत आलेले नसतात. या कारणामुळें वकिलीचा धंदा करणाऱ्या बॅरिस्टरास धंदा करण्याची असलेली परवानगी हायकोर्टानें काढून घेतल्याचीं उदाहरणें क्वचित् आढळतात. बॅरिस्टर सावरकर हे बॅरिस्टरीची परीक्षा विलायतेंत उत्तीर्ण झाले. त्यानंतर त्यांच्यावर जॅक्सनच्या खुनाचा आरोप येऊन त्यांना शिक्षा झाली. यामुळें बॅरिस्टरीचा धंदा करण्याचा त्यांच्या बाबतींत प्रश्नच उपस्थित झाला नाहीं परंतु बॅरिस्टरच्या नोंदींतून त्यांचें नांव कमी करण्यात आलें. राजद्रोहाच्या चळवळींत सामील असल्याचा संशय ज्या एका बॅरिस्टरसंबंधीं तो विलायतेस अभ्यास करीत असताना आला होता, त्यानें नामदार हायकोर्ट मुंबई यांच्यापुढें हजर होऊन त्या धंद्यात प्रवेश मिळण्याविषयीं विनंति केली. व ती विनंति हायकोर्टानें त्याचेवर कांहीं बंधनें घालून मान्य केली. इंग्लंडातील बॅरिस्टर लोकांवर राजकीय चळवळीचे बाबतींत जवळजवळ कोणत्याच प्रकारचीं बंधनें नसावीं असें दिसतें. स्वराज्य व स्वातंत्र्य मिळविण्याची आयरिश लोकांची जी प्रचंड राजकीय चळवळ कांहीं वर्षांपूर्वी सुरू होती, त्या वेळीं त्या लोकांत दोन पक्ष निर्माण झाले होते. अल्स्टर या नांवानें प्रसिद्ध असलेल्या भागात राहणाऱ्या लोकांचें राज्य स्वतंत्र असावें असा या प्रांतातील लोकांचा एक पक्ष होता. या पक्षाचे अध्वर्यु सर एडवर्ड कार्सन या नांवाचे एक प्रसिद्ध कायदेपंडित

होते. ते अल्स्टरला स्वतंत्र स्वराज्य असावें असें म्हणणाऱ्या पक्षाचे पुढारी होते. हें ध्येय साध्य करण्यासाठी त्यांनीं सैन्यभरती, दारुगोळ्याची जमवाजमव इत्यादि गोष्टी युद्ध करण्यासाठी राजरोस रीतीनें केल्या, परंतु इंग्लंडातील कोणत्याहि न्याय देणाऱ्या वरिष्ठ संस्थेनें या त्यांच्या चळवळीबद्दल त्यास प्रायश्चित्त देण्याचा कांहीं एक प्रयत्न केला नाहीं. इंग्लंड देशातील बॅरिस्टरीचा धंदा करणाऱ्या लोकांच्या स्वातंत्र्याचें हें एक उत्कृष्ट उदाहरण आहे.

## वकिलीच्या धंद्यांत प्रवेश
## व
## वकिलीचीं कामें मिळविण्याचे मार्ग

मागें दर्शविल्याप्रमाणें परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर परीक्षा पास झालेला गृहस्थ वकिलाची सनद मिळवितो. त्यानंतर कोणत्या तरी जिल्ह्याच्या अगर तालुक्याचे ठिकाणीं तो धंदा करण्याकरिता स्थायिक होतो. धंदा सुरू करताच कामें येऊन आर्थिक प्राप्ति होणें ही गोष्ट फार थोड्यांच्या नशिबीं असते. कित्येक दिवस नवीन वकिलास कांहीं प्राप्ती न होता रखडावें लागतें व धंद्यात शिरण्यापूर्वी चांगल्या प्रकारची आर्थिक प्राप्ती होण्याचीं रम्य स्वप्नें आकाशातील ढगाप्रमाणें विलीन पावतात. ज्या जिल्ह्याच्या शहरीं चार तपापूर्वी आम्ही वकिलीचा धंदा करण्यासाठीं आलों, तें शहर एका सधन जिल्ह्यातील असल्या कारणानें पन्नास पाऊणशें रुपये सहज मिळतील अशी निराधार कल्पना आमचे मनांत वसत होती, म्हणून या शहरीं येतेवेळीं एक ब्राह्मण जेवून खाऊन दरमहा रु. ६ पगारावर आम्हीं बरोबर आणिला. प्रथम आम्ही तालुक्याच्या ठिकाणीं वकिली करणाऱ्या आमच्या वडील बंधूंच्या स्नेहाच्या ओळखीचे एक पेन्शननिवृत्त मामलेदार यांचेवर शिफारसपत्र आणिलें व २।३ दिवस आम्ही त्यांचे येथेंच मुक्काम केला.- थोड्याबहुत खटपटीनें दरमहा रुपये १० ची एक जागा भाड्यानें घेतली व त्या ठिकाणीं आम्ही वास्तव्य करूं लागलों. दररोज जेवण करून ११॥ वाजता कोर्टात जाण्याचा प्रघात आम्हीं सुरू केला. त्या काळचे बरेचसे नवीन वकील बुटासुटाचा स्वीकार करण्याचा संप्रदाय अस्तित्वात होता. परंतु ही गोष्ट आम्हास मानवत नसल्यामुळें उपरणें, कोट, फेटा व पगडी इत्यादि अशा पोशाखाचा आम्ही आश्रय केला. याप्रमाणें रोज कोर्टांत जावयाचें व ३॥-४ चे सुमारास घरीं परत यावयाचें. काम कांहींच नसल्यामुळें जीवित कंटाळवाणें वाटूं लागलें म्हणून आम्ही या शहरातील एका वाचनालयाचे सभासद झालों व दुपारचा वेळ ग्रंथवाचनांत घालवूं लागलों. या शहरीं एक नामांकित क्लब आहे. या क्लबाचे न्यायाधीश, आसि. कलेक्टर, प्रांत, जिल्हा पोलिस सुपरिंटेंडेंट असे बहुतेक सरकारी अधिकारी सभासद असत. या लोकांच्या ओळखी करून घेऊन

वकिलीचें काम मिळविण्यात कांहीं लाभ व्हावा या उद्देशानें वकिलीचा नवीन धंदा कर- णारे कित्येक वकीलहि या क्लबाचे सभासद होत असत. परंतु आम्हीं या क्लबाचे सभासद झालों नाहीं. पन्नास वर्षांपूर्वी क्लबांतील सभासदांचा मुख्य खेळ टेनिस हा असे. पत्त्याचे ब्रीजचा जन्म त्या वेळीं या क्लबांत झाला नव्हता. या खेळाशिवाय क्लबांतील पोक्त व वयोवृद्ध मंडळी यांचा गप्पागोष्टींचा अड्डा असे. क्लबांत प्रवेश केल्यानें वकिलीच्या धंद्यात प्रगति होईल ही कल्पना भ्रामक वाटून क्लबाचे सभासद होण्याची कल्पना आमचे मनांत कधींच आली नाहीं. दोन चार महिन्यांच्या अनुभवाअंतीं किमान खर्च भागविण्यास लागणारी ४०।५० रु. (दरमहा) प्राप्ति होणें दुरापास्त आहे, असें अनुभवास आल्यावर आम्हीं ब्राह्मणास रजा दिली व १० रुपये भाड्याचें घर सोडून देऊन दरमहा ५ रु. भाड्याची एक जागा मिळविली व दोवेळचा स्वयंपाक स्वतः करून भोजन करावयाचें असें ठरविलें व तें लगेच अमलांतहि आणिलें. नूतन वकिलाचा धंदा करणारास वकिलीचें काम मिळवून देण्याच्या कामीं टाऊट ( वकिलाचा दलाल ) चा उपयोग करणारे कांहीं नूतन वकील त्या काळीं या शहरात होते. परंतु हे लोक व्यसनी व हलक्या दर्जाचे असल्या कारणानें या दलालाच्या कडून काम मिळविणें श्रेयस्कर नव्हतें. तथापि या मार्गाचा आश्रय सर्वत्र ठिकाणीं केला जातो व काम मिळविण्याचा तो एक मार्ग आहे ही गोष्ट नाकारता यावयाची नाहीं. तालुक्याचे ठिकाणीं व अन्यत्र वकिलाची दलाली करणारे कित्येक प्रतिष्ठित लोक असतात व त्यांच्या मार्फतीनें सुरवातीस कामें मिळवून वकिलीच्या धंद्याच्या आघाडीवर कांहीं वकील आल्याचें आम्हास माहीत आहेत. याप्रमाणें प्रतिष्ठित दलालामार्फत प्रथम कामें मिळवून तो वकील त्याच्या अंगच्या हुषारीनें यशस्वी झाला व त्याची नामां- कित वकील म्हणून प्रख्याती झाली म्हणजे मोठमोठ्या मानगडींच्या दाव्याचें काम पक्षकार आपोआप त्याचेकडे सोंपविण्यास सुरुवात करतात. याप्रमाणें वकिलीच्या कामाचा त्याचा जम बसल्यावर आरंभींचे प्रतिष्ठित टाउटांना ( दलालांना ) तो राम राम ठोकतो व आपल्या दाराशीं त्यास उभें राहू देत नाहीं. असो हा एक काम मिळविण्याचा मार्ग आहे. मुंबईच्या स्मॉल कॉज कोर्टांत वकिली करणारे २००।३०० वकील आहेत, त्यापैकीं बहुतेक सर्व वकिलांकडे टाऊटमार्फत कामें येतात. स्मॉल कॉज कोर्टाच्या इमारतींत "No tout allowed to enter" अशा पाट्या लाविल्या आहेत. परंतु स्मॉलकॉज कोर्टाच्या कंपाउंडच्या बाहेरच हे टाउट्स आपला धंदा करितात. काळबादेवी रस्त्यावर दोन चार मजली एक मोठी चाळ आहे व दोन तिनशें वकिलांच्या पाट्या त्या चाळींतील खोल्यांस लटकविलेल्या आढळतात. आमचे एक नातेवाईक १८८९ सालीं एल्‌एल्‌. बी. ची परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यानंतर मुंबईच्या अपील शाखेकडे वकिलीचा धंदा सुरू करण्यापूर्वी मुंबई स्मॉलकॉज कोर्टांत एक वर्षपावेतों त्यांनीं वकिली करण्याचें ठरविलें. वरील चाळींत एक खोली भाड्यानें घेऊन एक बाक, टेबल व खुर्ची असें सामान खरेदी करून त्यानें स्मॉलकॉज कोर्टांत वकिली करण्यास सुरवात केली. ११ वाजता जेवण

करून चाळींतील ऑफिसात जाऊन बसावयाचें, तेथें बसल्यावर कोणी ना कोणी तरी टाऊट त्यानें बगलेंत आणिलेल्या पक्षकाराचें वकिलपत्र घेऊन कोर्टांत हजर होऊन त्याचें काम चालवावयाचें. पक्षकाराकडून टाउटनें किती रक्कम घेतली याची वार्ता वकिलास नसते व वकिलाच्या हातात टाऊट काय रक्कम देतो हें पक्षकारास माहीत नसतें. पक्षकाराकडून घेतलेल्या रकमेपैकीं बराचसा भाग स्वत च्या खिशात टाकून वकिलाला पाच दहा रुपये देऊन पक्षकाराचें काम केलें जातें. स्मॉल-कॉज कोर्टांतील दावे म्हणजे पापड भाजण्याचा कारखाना. पक्षकारास पुकारून तो कोर्टापुढें हजर झाला कीं त्यास प्रतिज्ञा दिल्यावर दोन चार सवाल व त्याचीं उत्तरें झालीं कीं दाव्याचा निकाल व्हावयाचा. स्मॉलकॉज कोर्टांत अशा प्रकारें कामें करणाऱ्या वकिलास त्या काळीं दरमहा शें सवाशें रुपये मिळत असत या पद्धतीनें मुंबईच्या स्मॉलकॉज कोर्टांत चालणारे दिवाणी दावे त्याचप्रमाणें प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट कोर्टांत चालणारे फौजदारी दावे या कामीं अनेक वकील व त्याचे अनेक टाऊट याचा चरितार्थ चालत आला आहे. वकिलाच्या प्राप्तीपेक्षा टाऊटची प्राप्ति बरीच अधिक असते, ही गोष्ट मात्र निर्विवाद आहे. फौजदारी खटल्यात यशस्वी बॅरिस्टर अशी ख्याति प्राप्त करून घेतलेले एक नामांकित कायदेपंडित याच मार्गानें पुढें आले, असें आमच्या ऐकण्यात आहे. सनद मिळवून तालुक्याच्या अगर जिल्ह्याच्या ठिकाणीं नवीन वकील, वकिलीचा धंदा करण्यास स्थायिक झाला म्हणजे त्याच्यापुढें महत्त्वाचा प्रश्न प्रपचास लागणारें पुरेसें द्रव्य कशा रीतीनें मिळेल, हा उभा राहतो. परीक्षा पास झालेला वकील, एखाद्या सधन गृहस्थाचा मुलगा असल्यास त्याच्यापुढें हा प्रश्न उपस्थित होत नाहीं. आमच्या जिल्ह्याच्या आसपास असलेल्या एका जिल्ह्याच्या ठिकाणीं नूतन वकिलीच्या धंद्यात शिरलेल्या वकिलाचा खर्च त्याच्या वडिलानें दरमहा पत्रास रक्कम पाठवून खर्च भागविल्याचीं कांहीं उदाहरणें आमचे माहितींत आहेत. ज्या नवीन वकिलाची अशा प्रकारची परिस्थिति नसते, त्याला धंद्यातील त्याच्या भवितव्य चें भयानक स्वरूप मनात उभें राहून तो गांगरून जातो. अशा स्थितींत पक्षकार जो देईल तो पैसा घेऊन त्याचें काम करणें त्याला भाग पडतें. जुन्या पिढीतील परजिल्ह्यातून वकिली करण्यास आलेल्या एका वकिलांनीं यासबधानें स्वत चें तत्त्व निवेदन केलें, तें असें—

कोणताहि पक्षकार वकिलाकडे काम देण्यास आला, तर तो वकिलाच्या खिशातून कांहीं पैसा घेऊन जात नाहीं. थोडें फार द्रव्य वकिलास देऊन तो आपलें काम त्याच्याकडे सोंपवितो. ही गोष्ट लक्षात घेता पक्षकार जें कांहीं द्रव्य देईल, तें घेऊन नवीन वकिलानें त्याचें काम पत्करणें हा शहाणपणाचा मार्ग होय. हे वकील ज्या काळीं आमच्या जिल्ह्याच्या शहरात वकिली करण्याकरिता आले, ते वेळीं थेट या शहरापावेतों रेल्वे झालेली नव्हती. बराच लांबचा प्रवास घोड्याच्या टांग्यातून वा घरीं घेण्यासाठीं करावा लागत असे. ज्या ठिकाणांतून यांनीं प्रवास केला त्या टांग्यांत

एक दोन अन्य गृहस्थ होते. त्यांच्या परस्पर बोलण्यांत एका इसमानें कोर्टांत काम असल्याचें त्यानें सांगितलें, त्यावर 'मी वकील आहे, मजकडे काम द्या' असें धडधडीत त्यानें सांगितलें व पक्षकारानें दिलेल्या द्रव्यांत संतोष मानून त्यांनीं त्याचें काम केलें. वकिलीच्या धंद्यांत शिरणाऱ्या अनेक निर्धन वकिलांस Under selling ज्यास म्हणतात, तशा प्रकारचा मार्ग स्वतःचा चरितार्थ चालविण्याकरितां पत्करावा लागतो व ही गोष्ट अपरिहार्यही आहे. परंतु कांहीं वकिलांची स्थिति अशा प्रकारची असूनहि पैशाची हांव फार असल्यामुळें फार थोडका मोबदला घेऊन पण कामांची कामें स्वीकारतात व कमी फी कोणा हे पक्षकाराकडून आम्ही घेत नाहीं अशी शेखी व प्रतिष्ठा मिरविण्यास कमी करीत नाहींत गरिबी स्थितींतील एक हुषार ब्राह्मण तरुण वकिलीची परीक्षा पास झाल्यावर हायकोर्टांत वकिलीचा धंदा करूं लागला. त्यानें हा मार्ग स्वीकारून फार थोड्या काळांत पुष्कळ काम मिळविलें. मुंबई हायकोर्टांतील त्या वेळीं वकिली करणाऱ्या अनेक नामांकित पुढारी वकिलांत मोठी खळबळ उडाली व मोठमोठ्या वकिलांकडे जावयाचीं कामें या वकिलाकडे जाऊं लागलीं. हा तरुण वकील बुद्धिमान् व हुषार असल्यानें त्याचीं कामेंहि यशस्वी होऊं लागलीं. याप्रमाणें या वकिलाचें Under selling अन्य वकिलांना जरी जाचक झालें तरी तें निमूटपणें सहन करण्यावाचून त्यांना गत्यंतर नव्हतें

तालुका व जिल्हा कोर्टांतील वकिलीचें काम मिळविण्याचा दुसरा एक प्रतिष्ठित मार्ग पूर्वी सरास अस्तित्वांत होता व हल्लींहि तो थोड्याबहुत प्रमाणांत अस्तित्वांत आहे. पन्नास वर्षांपूर्वी मरमराटीस आलेला वकील, याचा सावकारीचा धंदा असावयाचाच, असें जवळजवळ ठरल्यासारखेंच होतें दिवाणी दाव्यास लागणारे कोर्ट-फी-स्टँप व प्रोसेस भत्ता हा खर्च वकिलानें स्वतः आपले पदरचा करून पक्षकाराच्या फिर्यादी दाखल करावयाचा. खर्च केलेल्या रकमेबद्दल प्रामिसरी नोट पक्षकाराकडून करून घ्यावयाची हुकुमनामा झाल्यावर प्रतिवादीनें कोर्टांत भरलेली रक्कम वकिलानें घेऊन प्रामिसरी नोटीचे पोटीं ती जमा करावयाची, अशा प्रघात त्या काळीं अस्तित्वांत असे. फिर्यादीस लागणारा खर्च वकील आपल्या पदरचा करीत असल्यामुळें त्या रकमेवर व्याज पक्षकारास द्यावें लागे व हुकुमनाम्यांत आकारलेली वकिलीची पूर्ण रक्कमहि पक्षकारास द्यावी लागे. अशा तऱ्हेनें पदरचे पैसे लावून वकिलीचें काम फार मोठ्या प्रमाणावर मिळविलेले कित्येक वकील ४०।५० वर्षांपूर्वी पुढें येऊन यशस्वी झाल्याचीं उदाहरणें आहेत. जोंपावेतों शेतकी ॲक्ट लागू झाला नव्हता, तोंपावेतों या तऱ्हेनें वकिलीचें काम मिळविण्यांत म्हणण्यासारखा धोका नव्हता. परंतु हा ॲक्ट लागू झाल्यावर अशा प्रकारचा व्यवहार कित्येक वकिलांच्या अंगावर आला या शहरीं राहणाऱ्या एका धनाढ्य वकिलानीं-पांच पांच हजारांवरील कित्येक सावकारांच्या दाव्यांचीं कामें मिळविण्याकरितां पदरचे पैसे लाविले आर्थिक स्थिति लोकांची खालावल्यामुळें प्रतिवादींकडून हुकुमनाम्याच्या रकमा कोर्टांत मरण्याचें बंद पडलें. अखेर या वकिलांना पक्षकारावर फिर्यादी करून हुकुमनामे

मिळवावे लागले. धंदा शेतीचा असल्याच्या तक्रारी या पक्षकारानीं केल्या व सदर हुकुमनाम्याच्या बजावणीचें काम कलेक्टरकडे पाठविण्यांत आलें. पक्षकाराच्या स्थावर मिळकती म्हणजे जमिनी जप्त केल्यामुळें मिळकतीची विक्री तत्काळ होत नसे. अशा स्थितींत ज्या पक्षकाराच्या जमिनी जप्त करण्यांत आल्या होत्या, त्यानीं त्या जमिनीचा सरकार शेतसारा देण्याची अखेर टाळाटाळी केली. याचा परिणाम असा झाला कीं, वकिलसाहेबाच्या हुकुमनाम्यांत एक कपर्दिकहि प्राप्त न होता साल दरसाल त्या जमिनीचा सारा लँडरेव्हेन्यू कोडान्वयें रेव्हेन्यू अधिकाऱ्यानीं वसूल करण्यास प्रारंभ केला. अशा तऱ्हेनें पदरचे पैसे लावून पक्षकाराच्या फिर्यादी दाखल करणाऱ्या वकिलावर अखेर पश्चात्ताप करण्याची पाळी आली.

आता जिल्हा कोर्टातील वकील व हायकोर्टातील वकील कामें मिळविण्याच्या बाबतींत कोणत्या मार्गाचें अवलंबन करितात, याचें दिग्दर्शन करितों.

अपिलाचीं कामें किंवा पाच हजाराच्या वरील रकमेचे स्पेशलचे दावे कनिष्ठ कोर्टांच्या वकिलाकडून मिळविण्याकरिता जिल्हा कोर्टातील कांहीं वकिलाना कमिशन देण्याची पद्धत आहे. अर्थात् या पद्धतीचा नामांकित वकील म्हणून ज्याची प्रसिद्धि झाली आहे त्याना आश्रय करण्याचें कारण पडत नाहीं. कारण असल्या दाव्यास वकीलपत्र मिळविण्याकरिता मध्यस्थीची जरूर नसते. पक्षकार आपण होऊन त्यांच्याकडे काम देतो. हायकोर्टाच्या अपीलशाखेकडे काम करणारे नवीन वकील, तालुका व जिल्हाकोर्टातील वकिलाना कमिशन देऊन कामें मिळविण्याचा प्रघात अलीकडे जास्त फैलावत चालला आहे. २५।३० वर्षांपूर्वी मुंबई हायकोर्टाचे नुकतेच पुढें आलेले वकील धुळें कोर्टांत काम चालविण्यास आले होते. व त्याचा मुक्काम जिल्हा कोर्टातील एका पुढारलेल्या वकिलाकडे होता. अनायासें ते त्याचेकडे आल्यामुळें मुंबई हायकोर्टांत दाखल करावयाच्या एका अपिलाचें काम त्यानीं त्याचेकडे सोंपविलें. मुंबईचे वकिलानीं कमिशनची रक्कम त्याना देण्याकरिता पुढें केली. तेव्हा त्या वकिलानीं अशा तऱ्हेनें कमिशन घेण्याचा माझा प्रघात नाहीं असें सांगितलें. ३०।३५ वर्षांपूर्वी अपीलशाखेकडे काम करणारे एक वकील जिल्हा व तालुका कोर्टातील वकिलाकडून या पद्धतीनें अपिलाची बरीच कामें मिळवीत असत. जिल्हा व तालुका कोर्टातील वकिलास कमिशनशिवाय कांहीं अन्य सुलभोई मुंबईस पक्षकाराच्या वतीनें काम देणाऱ्या वकिलाच्या करीत असत. त्या काळीं मद्यमांस सेवनाची चटक जिल्ह्यांतील व तालुक्यातील कित्येक वकिलाना लागली होती. हे *वकील मुंबईस काम देण्याकरिता या वकिलाकडे गेले म्हणजे या बाबतींत मनपसंत* अशी तरतूद हे वकील करीत असत. याशिवाय हायकोर्ट मे महिन्याच्या सुटींत बंद असतां जिल्हा कोर्टातील वकिलाकडे हे वकील जाऊन कांहीं दिवस त्यांचा पाहुणचार घेत असत. अशा रीतीनें अपिलाचीं कामें मिळविणाऱ्या वकिलांची संख्या अर्थात् फार थोडी असे. आतां नमूद केलेल्या या सुलभोईशिवाय मुंबई शहरातील अन्य मोठा अनुभवण्याची होस जिल्हा व तालुका कोर्टातील कांहीं वकील पुरवून

घेत असत. आम्हांला या बाबतींत एक फार विचित्र अनुभव आला. मे महिन्याच्या सुटींत हायकोर्ट बंद असतां एक फौजदारी अपील दाखल करण्याकरितां व आरोपीस जामिनावर सुटा करण्याबद्दल अर्ज करण्याकरितां आम्ही व आमचे दुसरे स्नेही वकील मुंबईस गेलों होतों. मुंबई हायकोर्टाच्या न्यायाधीशापुढें अपील दाखल करून जामिनाचा अर्ज मंजूर करून घेतल्यानंतर आम्ही त्या वकिलाच्या घरीं आलों. घरीं आल्यावर शिष्टाचाराप्रमाणें चहापान वगैरे झाल्यावर त्या वकिलांनीं आमचा पूर्वीपार दाट परिचय किंवा स्नेहसंबंध नसतां अत्यंत किळसवाणी व विचित्र अशीं पांच पंचवीस रंगीत चित्रें दाखविलीं व अशी चित्रें पाहिजेत काय, असें आम्हांस विचारिलें. त्यावर तीं चित्रें पाहून त्यांना परत दिलीं व चित्रांची कांहीं जरूरी नाहीं असें त्यांना सांगितलें. चित्रांबरोबरच एक दोन बीभत्स प्रकारचे छोटे छापील ग्रंथ त्यांनीं आम्हांस दिले. हा सर्व प्रकार पाहून आम्हांस फार आश्चर्य वाटलें. आमचा असा तर्क झाला कीं हे वकील बाहेर गांवाहून येणाऱ्या वकिलांना या बीभत्स चित्राव्यतिरिक्त कांहीं अन्य मौजाचा अनुभव आणून देत असावेत.

जिल्हा कोर्टांतील अपिलांचीं कामें मिळविण्याकरितां वकिलीच्या धंद्यांत ज्यांना चांगला जम बसला आहे, अशा एका वकिलाच्या कामें मिळविण्याच्या मार्गाविषयीं आम्हांस माहिती मिळाली. वास्तविक या गृहस्थास अशा प्रकारची खटपट करण्याची कांहीं एक आवश्यकता नव्हती. हा मार्ग म्हटला म्हणजे अपिलाच्या कामाची तजवीज करण्याचें काम ज्या कारकुनाकडे असे, त्याच्याशीं संधान बांधून मंजूर झालेल्या अपिलांतील जाब देणाराचीं नांवें व पत्ते टिपून घ्यावयाचे व नंतर त्यास गौरवून पत्र लिहून वकिलपत्र आम्हांस दिल्यास तुमचें काम उत्तम प्रकारें करण्यांत येईल, असें त्यास कळवावयाचें. याशिवाय अगदीं अलीकडे फौजदारी व दिवाणी अपिलांची तजवीज करण्याचें काम ज्या कारकुनाकडे असे त्यास कमिशन देऊन त्याचे मार्फतीनें अपिलाचे काम व वकिलपत्र मिळविण्याची खटपट त्या कारकुनाकडून करावयाची. कित्येक जिल्ह्याच्या व तालुक्याच्या ठिकाणीं न्यायालयांतील दुय्यम दर्जाच्या सरकारी अधिकाऱ्यांचे पुत्र वकिलीची परीक्षा पास होऊन त्यास कोर्टांत वकिलीचा धंदा करण्यास सुरवात करितात. जिल्ह्यांतील अनेक सावकारांच्या व पक्षकारांच्या ओळखी यांच्या वडिलांच्या असल्यामुळें या वकिलाचे वडील यांच्या चिरंजिवाकडे देण्याची खटपट करितात. ही खटपट यशस्वी होऊन कित्येक नवीन वकिलाचा त्यांच्या धंद्यांत थोडक्याच काळांत चांगला जम बसल्याचीं कांहीं उदाहरणें आमच्या आढळण्यांत आलीं आहेत. तालुका व जिल्हा कोर्टांतील वकिलीचीं कामें मिळविण्याच्या मार्गांचें दिग्दर्शन करण्यानंतर मुंबई हाय कोर्टाच्या ओरिजिनल साईडकडे कामें करणारा सॉलिसिटर्स या नांवानें प्रसिद्ध असलेल्या वर्गांतील लोक वकिलीचें काम मिळविण्यासाठीं कोणत्या मार्गांचा आश्रय करितात, त्याचें थोडक्यांत दिग्दर्शन करितों. सर्व सॉलिसिटर्सच्या ऑफिसांत मॅनेजिंग क्लार्क या नामाचा एक मुख्य अधिकारी असतो. त्याचें मुख्य काम मुंबई

शहरात मोठमोठ्या व्यापाऱ्यात उत्पन्न झालेल्या भानगडी काय चालल्या आहेत, त्याचप्रमाणें मोठमोठे इस्टेटवाले लोकांपैकीं कोण मयत झाला, त्याच्या इस्टेटीबद्दल भानगडी कोणत्या प्रकारच्या चालू आहेत याची माहिती दक्षतेनें मिळवून अशा प्रकारें उत्पन्न होणाऱ्या वादातील एखाद्या पक्षकारास आपल्या पेढीकडे काम देण्याची खटपट करावयाची, हें असतें. मॅनेजिंग क्लार्कला सॉलिसिटर्सकडून वेतनहि पुष्कळ मिळतें. याशिवाय चांगल्या सॉलिसिटर्सच्या फर्मचा सल्ला मिळवून देण्याकरितां पक्षकाराकडून मॅनेजिंग क्लार्क खाजगी रीतीनें कमिशनहि मिळवितात. मुंबईतील सॉलिसिटर्सचे क्लार्कनीं मोठी संपत्ति मिळवून स्थावर इस्टेटी मिळविल्याचें आढळतें. मुंबई शहराव्यतिरिक्त अन्य ठिकाणच्या पक्षकाराचा दावा हायकोर्टात चालू झाला व त्या दाव्याचे कामीं बाहेरगावच्या वकिलानें सॉलिसिटर्सकडे त्या पक्षकाराचें वकिलपत्र दिलें तर सॉलिसिटर्सला मिळणाऱ्या रकमेपैकीं शेंकडा ५ ते १० टक्केपावेतों रक्कम सॉलिसिटर त्या वकिलास देतो. याप्रमाणें सॉलिसिटर्सकडे ज्याच्या मार्फतीनें काम आलें असेल त्यास कमिशन देण्याची पद्धति मुंबईसच आहे असें नाहीं. ही पद्धत खास इंग्लंड देशातहि अस्तित्वात आहे आम्ही ज्या जिल्हाकोर्टात वकिली करितों, तेथील एका नामांकित वकिलाच्या पक्षकारानें प्रीव्हीकौन्सिलकडे अपील दाखल केलें. इंग्लंडात प्रीव्हीकौन्सिलकडे हिंदुस्थानांतून जीं अपिलें दाखल केलीं जातात, त्या अपिलाचें काम इंग्लंडातील सॉलिसिटर्सच्या पेढीकडे प्रथम द्यावें लागतें. हिंदुस्थानातील प्रीव्हीकौन्सिलकडे जाणाऱ्या अपिलाचीं कामें चालविणाऱ्या कांहीं विशिष्ट पेढ्या लंडनमध्ये आहेत. त्यापैकीं कोणातरी एका सॉलिसिटर्सच्या पेढीमार्फत प्रीव्हीकौन्सिलकडे अपील दाखल करण्याची तजवीज हिंदुस्थानातील वकिलामार्फत होते याप्रमाणें सॉलिसिटर्सकडे अपील दाखल करण्याचें काम सोपविण्यात आल्यावर पुढील सर्व तजवीज लंडन येथील सॉलिसिटर्सची पेढीच करते. प्रीव्हीकौन्सिलपुढें अपिलाची अखेर चौकशी नेमिली गेली म्हणजे तें चालविण्याचें काम लंडन येथीलच बॅरिस्टरकडे सोपविण्यात येतें. अर्थात् बॅरिस्टर कोण द्यावयाचा याचा खुलासा तेथील सॉलिसिटर्सच्या पेढीकडून प्रथम हिंदुस्थानातील पक्षकाराकडून मागविण्यात येतो व पक्षकारानें केलेल्या सूचनेअन्वयें सॉलिसिटर्सची पेढी अपिलाचे कामीं तक्रार सांगण्याकरितां त्या बॅरिस्टरची नेमणूक करते. हिंदुस्थानांतून प्रीव्हीकौन्सिलकडे अपिलें दाखल करण्याचें काम ज्याप्रमाणें कांहीं विशिष्ट सॉलिसिटर्सच्या पेढ्याकडून केलें जातें त्याप्रमाणेंच अपिलाचे कामीं हजर होऊन तक्रार सांगणारा लंडनमध्यें बॅरिस्टराचा एक विशिष्ट वर्ग आहे. त्यापैकीं कांहीं बॅरिस्टर हिंदुस्थानातील हायकोर्टात बॅरिस्टरीचा अनेक वर्षे धंदा करून विलायतेस परत गेल्यावर स्थायिक झाल्यापैकीं असतात. प्रीव्हीकौन्सिलकडे गेलेल्या ज्या अपिलाचा आम्हीं वर उल्लेख केला आहे, त्याचा निकाल लागल्यावर लंडनमधील सॉलिसिटर्सच्या पेढीकडून येथील वकिलास असें पत्र आलें कीं अपिलाचा निकाल झाला आहे, तुमच्या कमिशनची रक्कम अमूक

झाली आहे; तर ती आम्ही आपल्याकडे रोख पाठवावी की त्या रकमेचा एखादा जिल्हा पाठवावा याचा खुलासा करावा. हें पत्र आल्यावर मेथील वकिलांना थोडें आश्चर्य वाटलें. परंतु त्यांत आश्चर्य करण्यासारखें कांहींच नव्हतें. कारण कमिशन देण्याची वहिवाट सर्वमान्य होती. परंतु येथील वकिलांना या वहिवाटीची माहिती नसल्याकारणानें त्यांना सॉलिसिटर्सकडून आलेल्या पत्राबद्दल विस्मय वाटावा हें साहजिकच आहे.

मुंबई हायकोर्टाच्या ओरिजिनल साईडकडे दाखल होणाऱ्या सर्व दाव्यांत मुंबई शहरांतील मोठमोठे धनाढ्य गुजराथी, पारसी, मुसलमान, मारवाडी इत्यादि व्यापारी वर्गांपैकींच असावयाचे हें ओघानेंच आलें पाहिजे असें नाहीं. यामुळें मुंबई शहरांतील सॉलिसिटर्सच्या पेढ्या या बहुतेक गुजराथी, पारसी, मारवाडी इत्यादि लोकांच्या असतात. महाराष्ट्रांतील पांढरपेशा वर्गांपैकी सॉलिसिटर्सच्या पेढ्या क्वचित् आढळतात. सॉलिसिटर्सची परीक्षा देणें फार खर्चाचें असतें. प्रथम एखाद्या सॉलिसिटर्सच्या पेढींत, सॉलिसिटर्सच्या परीक्षेस बसण्यापूर्वी कांहीं वर्षें प्रवेश मिळवून तेथें शिक्षण संपादावें लागतें. ही एक प्रकारची सॉलिसिटर्सच्या परीक्षेचा अभ्यास करून तीत यशस्वी होणाऱ्या महाराष्ट्रीय उमेदवाराला एक मोठी अडचण असते. या अडचणीमुळें दक्षिणी पांढरपेशा वर्गांपैकीं कोणास कित्येक वर्षें सॉलिसिटर्सच्या पेढींत प्रवेशच मिळत नसे. अलीकडे कांहीं लोकांना प्रवेश मिळवितां आला. परंतु परीक्षेंत यश संपादन करण्याची अडचण या लोकांना भासूं लागली, कारण होता होईल तों विशिष्ट जातीच्या उमेदवाराखेरीज अन्य कोणास पास करावयाचें नाहीं, असा कांहीं वर्षें परीक्षकांचा कटाक्ष असे. या सर्व अडचणींस तोंड देऊन महाराष्ट्रीयांपैकीं कांहीं लोकांनीं यश संपादन केलें व सॉलिसिटर्सचा धंदाहि सुरू केला. परंतु ओरिजिनल साईडकडील दाव्यामधील पक्षकार विशिष्ट जातीकडे व स्वजातीय सॉलिसिटर्सकडेच काम देण्याची त्यांची प्रवृत्ति असल्याकारणानें सॉलिसिटर्सचा धंदा करणारा, या नात्यानें महाराष्ट्रीय लोकांपैकीं अगदीं अल्प लोक पुढें आले. सॉलिसिटर्सच्या धंद्याबाबतींत जो प्रकार आढळतो, तोच प्रकार ओरिजिनल साईडकडील दाव्याचें काम चालविणाऱ्या बॅरिस्टरांचे बाबतींत आढळून येतो. ओरिजिनल साईडकडे काम चालविणारे जे बॅरिस्टर गेल्या पन्नास वर्षांत प्रख्याति पावले आहेत, त्यांत एकहि महाराष्ट्रीय बॅरिस्टरचें नांव आढळून येत नाहीं. मुंबई हायकोर्टाची स्थापना झाल्यानंतर प्रारंभीचे काळांत सॉलिसिटर्सच्या बहुतेक पेढ्या इंग्रजांच्या होत्या. त्याचप्रमाणें ओरिजिनल साईडकडील दाव्यांचें काम चालविणारे बॅरिस्टर बहुतेक गोरे असत. परंतु उच्च शिक्षणाचा प्रसार हिंदी लोकांत अधिकाधिक होऊं लागून सॉलिसिटर्स, बॅरिस्टर, वकील हे धंदे करण्याकरितां लागणाऱ्या उच्च दर्जाच्या परीक्षांत यश संपादन करणारे हिंदी लोक जसजसे अधिक प्रमाणांत उदयास येऊं लागले, तसतशी या क्षेत्रांत काम करून अलोट संपत्ति मिळविणाऱ्या गोरे कायदेपंडितांची हकालपट्टी होऊं लागली. प्रस्तुत एकहि गोरा कायदेपंडित मुंबईस राहिलेला नाहीं.

## सरकारी वकील

प्रस्तुतच्या कायद्याप्रमाणें प्रजेपैकीं कोणाचेंहि सरकारी अधिकाऱ्याच्या हुकमामुळें अगर वर्तनामुळें नुकसान झाल्यास त्याची भरपाई करून घेण्याकरितां न्यायालयांत सरकारवर दावा करता येतो; या दाव्याच्या कामीं सरकारतर्फे हजर होऊन सरकारची तक्रार कोर्टापुढें मांडण्याकरिता वकिलाची आवश्यकता असते. मुंबई इलाख्यातील ज्या ज्या जिल्ह्यांत जिल्हा कोर्टें आहेत, त्या त्या कोर्टांत वकिलवर्गांपैकीं एखाद्याची सरकारी वकील म्हणून सरकार कायमची नेमणूक करतें. दिवाणी दाव्यांत सरकारतर्फे हजर होऊन तक्रार करणें हें जें काम त्याच्याकडे सोंपविलें असतें, त्याशिवाय सेशनजज्ज यांच्या कोर्टांत आरोपीवर ज्या मोठमोठया फौजदारी खटल्याची चौकशी केली जाते, त्या खटल्यांत सरकार हे फिर्यादी असल्याकारणानें फिर्यादीतर्फे याच वकिलास काम चालवावें लागतें. गव्हर्मेंट प्लीडर आणि पब्लिक प्रासिक्यूटर ही संज्ञा या वकिलास असते.

वरील प्रकारचीं दोन्ही कामें चांगल्या प्रकारें करण्याकरिता बुद्धिमान्, कायद्यात निष्णात् व सरकारच्या विश्वासास पात्र अशा वकिलाची सरकारी वकिलाच्या जागेवर नेमणूक करणें युक्त होय हें जरी खरें तथापि सरकारी वकिलाच्या जागेवर हे तिन्ही गुण ज्याच्यात आहेत, अशा वकिलाचीच नेमणूक केली जाते, असें आढळून येत नाहीं. नोकरशाहीच्या राजवटींतील सरकारी वकिलाच्या जागेवर नेमणूक करण्याच्या बाबतींत, ज्या वकिलाची नेमणूक करावयाची, तो राजनिष्ठ व सरकारच्या विश्वासास पात्र असला पाहिजे, या गोष्टीकडे विशेष लक्ष दिलें जात असे. त्याची बुद्धिमत्ता व कायद्यातील पारंगतता या गुणाकडे विशेष लक्ष दिलें जात नाहीं. देशाच्या प्रचलित राजकारणांत जो बिलकूल लक्ष घालीत नाहीं, असा वकील सरकारी वकिलाच्या जागीं नेमणूक करण्यास नोकरशाहीस पसंत पडे परंतु हिंदुस्थानांत राजकीय चळवळ उदयास आल्यानंतर सरकार राजकारणांतील मवाळ पक्षांतला वकील पसंत करीत असे. जिल्ह्याचा मॅजिस्ट्रेट व जिल्हा न्यायाधीश यांच्याशीं वशिले व संधान बांधून सरकारी वकिलाची जागा मिळविल्याचीं कित्येक उदाहरणें आढळून येतात. सामान्य प्रकारची बुद्धिमत्ता व सामान्य प्रकारचें कायद्याचें ज्ञान जरी अशा वशिल्याच्या तट्टांना असलें तरी सरकारी वकिलाचें काम कित्येक वर्षें अशा लोकांनीं केल्याचीं कित्येक उदाहरणें आढळतात. असल्या लोकाना डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट व जिल्हा जज्ज यांच्या अधूनमधून भेटी घेऊन त्यांच्या कृपासंपादनार्थ थोडे फार परिश्रम केल्यानें या जागेस चिकटून राहण्यास त्याना अडचण पडत नाहीं. नोकरशाहीची राजवट समाप्त होऊन प्रांतिक स्वायत्तता धारण करणारी हिंदी राजवट सुरू झाली आहे. तथापि या बाबतींत या राजवटींतील वरिष्ठ अधिकाऱ्यांची वृत्तीहि मोठीशी स्पृहणीय अशी आढळून येत नाहीं. नोकरशाहीच्या राजवटीप्रमाणेंच या राजवटींत वशिलेबाजीला मुळमुळाट सरकारी वकिलाच्या

नेमणुकीबाबत आढळून येतो. या वशिलेबाजीमुळें कित्येक बुद्धिमान् व कायद्याच्या ज्ञानांत निष्णात् अशा लोकांची सरकारी वकील म्हणून नेमणूक होण्याचा कधींच संभव नसतो. स्वराज्य अस्तित्वांत आल्यानंतर नोकरशाहीच्या राजवटींतल्या कित्येक अनिष्ट गोष्टी अस्तंगत होऊन त्यांच्या ऐवजीं बुद्धिमत्ता व लायकी यांनाच पुरस्कार देण्यांत येईल, अशी जी कित्येकांना आशा वाटत होती, ती सफल होण्याची म्हणण्यासारखी आशा बाळगण्यांत देखील नाहीं. आमच्या या जिल्ह्यांत प्रारंभींच्या काळांत स्वतंत्र बाण्याचे एक दोन सरकारी वकील होऊन गेले. परंतु त्याशिवाय या जागेवर झालेल्या नेमणुका ज्ञान व बुद्धिमत्ता असलेल्या वकिलांच्याच झाल्या. आमचा या जिल्ह्यांत वकील वर्गांत प्रवेश होण्याच्या सुमारास जुन्या पिढींतील एका पहिल्या श्रेणींत गणना असलेले एक वकील सरकारी वकील म्हणून काम करीत असत. वकीलवर्गापैकीं दोघां वकिलांचें या गृहस्थाशीं वैमनस्य असल्याकारणानें या दोघांनीं डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटच्या कानास लागून सरकारी वकील या नात्यानें त्यांनीं एका कामांत सरकारचें नुकसान केल्याचा आरोप त्यांच्यावर उपस्थित केला. या आरोपाची चौकशी नामदार हायकोर्टाच्या हुकुमावरून त्या वेळच्या येथील जिल्हा जजांनीं केली. सरकारी वकिलाच्या जागेवरून त्यास कमी करण्यांत येऊन त्यानें वकिलीच्या धंद्यांतून निवृत्त व्हावें, असा निवाडा केला व यापेक्षां अधिक नुकसान न होतां या संकटांतून हे गृहस्थ बचावले गेले. स्वतःचा स्वार्थ साधण्याकरितां सरकारी अधिकाऱ्यांच्या कानीं लागून त्यांच्याकडून आपल्या एका व्यवसायबंधूवर संकट ओढविण्यांत वकिलासारख्या दर्जाच्या माणसानें प्रवृत्त व्हावें हें मनाच्या हीन वृत्तीचें व वकिलीच्या धंद्याचा जो उच्च आदर्श समजला जातो, त्यास निःसंशय कमीपणा आणणारें होय.

---

प्रकरण ९ वें

## २. वकील वर्गाचे गुणदोष

वकिलीचा धंदा करणाऱ्या लोकांचे ठिकाणीं स्थूल मानानें आढळून येणाऱ्या गुणदोषांचें दिग्दर्शन प्रस्तुत स्थळीं करणें युक्त होईल. वकिलाकडे वकिलीचीं कामें सोपविण्याकरितां येणाऱ्या पक्षकारांपैकीं पुष्कळ लोक अडाणी व अज्ञानी असतात. इंग्रजांनीं नवीन न्यायालयें स्थापन करून वादाचे निवाडे करण्याची जी पद्धति सुरू केली त्या काळीं अडाणी व अज्ञानी पक्षकारांची संख्या प्रस्तुत काळापेक्षां फार अधिक

होती. वकील हा कायदे जाणणारा व बुद्धिमत्तेनें श्रेष्ठ असल्याकारणानें प्रारंभींच्या काळात वकिलांकडून पक्षकाराच्या अज्ञानाचा फायदा फार घेतला गेला. क्षुल्लक प्रकारच्या वादांत देखील वकिलानें पक्षकाराकडून फार मोठया द्रव्याचा मोबदला घेतल्यांचीं उदाहरणें त्या काळीं घडत असत. या कारणामुळें जुन्या पिढींतील वकिलाकडे द्रव्यसंचय चागला झाला. कित्येक वकिलांनीं वकिलीच्या मोबदल्यात पक्षकाराकडून बहुमोल स्थावर मिळकती मिळविल्या. आम्ही वकिली करण्यास सन १९०० सालीं आरंभ केला ते वेळीं मुंबई येथील एका गुजराथी पक्षकारानें आमचेकडे अज्ञानाचें पालन करणारा नेमण्याबद्दलच्या अर्जाचें एक काम सोपविलें. त्या कामात पंधरावीस वर्षांपूर्वी कोर्टात चाललेल्या कांहीं कामाचे कागद दाखविले. त्यावरून या जिल्ह्याच्या ठिकाणच्या जुन्या पिढींतील एका नामांकित वकिलानें अवाच्या सव्वा द्रव्यलाभ करून घेतल्याचें दिसलें. मुंबई हायकोर्टातील जुन्या पिढींतील एका नामांकित वकिलाकडे एका जहागिरदाराचें अपिलाचें फार मोठें व महत्त्वाचें काम होतें. व या कामाचा मोबदला म्हणून त्या जहागिरदाराकडून बारा रुपये तोळयाच्या भावाचें कितकें (!) सोनें त्या वकिलानें घेतलें. त्या हायकोर्टाच्या वकिलांनीं ही दंतकथा आम्हांस सांगितली ते कांहीं काल्पनिक गप्पा मारणारे गृहस्थ नव्हते. त्या काळच्या कांहीं अज्ञानी व ऐदी जहागिरदारापैकीं एखाद्यानें त्याच्या वकिलीच्या परीक्षेच्या दृष्टीनें ठरलेलें किडकें सोनें बारा रुपये तोळयाप्रमाणें त्या वकिलास दिलें असण्याचा संभव आहे. तालुका कोर्टांतील वकिलाचें आचरण, वागणूक, आवडीनिवडी हा वर्त्याचशा त्या कोर्टातील न्याय देणाऱ्या मुनसफावर अवलंबून असतात. एका तालुका कोर्टांत सन १९०० च्या सुमारास जे न्यायाधीश मुनसफ होते, ते आचरणानें सज्जन व उदार अंतःकरणाचे होते. ते जातीनें ब्राह्मण परंतु मद्यमांस सेवन करणारे असत. आम्हीं मुंबईस वकिलीचा अभ्यास करीत असताना आमचे येथें अभ्यास करण्याकरितां एक तरुण ब्राह्मण गृहस्थ येत असे. तो चागला अभ्यासू असल्याकारणानें त्याची परीक्षा उत्तीर्ण होऊन वरील मुनसफ ज्या तालुका कोर्टाचे न्यायाधीश होते, तेथें वकिलीचा धंदा करण्याकरितां स्थाईक झाला. चारपाच वर्षांनंतर आम्ही तो तालुका ज्या जिल्ह्यात होता, त्या जिल्ह्याच्या ठिकाणीं वकिलीचा धंदा करण्यासाठीं स्थाईक झालों. त्यानंतर या गृहस्थाची भेट झाली असतां त्याचें सर्व चरित्र बदलल्याचें दिसलें. मद्यमांस सेवन करण्यात विधिनिषेध त्यास वाटेनासा झाला. जिल्हा कोर्टातील त्या मुनसफाचे एक नामांकित स्नेही मद्यमांस सेवन करणारे वकील होते. त्यांची व या गृहस्थांची थोडयाच काळांत दाट मैत्री जुळून आली. या वकिलाप्रमाणेंच त्या तालुक्यातील अन्य वकिलांस हेंच वळण लागलें. दुसऱ्या एका तालुक्याच्या ठिकाणचे याच प्रकारचे मुनसफ होते. तालुका कोर्टाच्या वकिलाना कामानिमित्त मुंबई हायकोर्टाच्या वकिलाकडे जाण्याचा प्रसंग नेहमीच येतो. व अशा प्रकारच्या मुनसफाच्या कोर्टात काम करणाऱ्या वकिलास मुंबईस जाण्याचा प्रसंग आला, म्हणजे मुनसफ साहेबां-

फीरती मयाऱ्या बाटल्या आणण्याचें काम करावें लागत असे. ही गोष्ट मासे दाबून देणार नाहीं, असें मुनशफाला स्पष्ट सांगण्याचें धैर्य वकिलाचे ठिकाणीं नसल्या-कारणानें निरुपायास्तव या गोष्टी त्याला कराव्या भाग पडे. तालुका कोर्टांच्या वकिलास न्यायाधिशामुळें लागणाऱ्या वाईट वळणाचें जसें दिग्दर्शन केलें, तसें दुसऱ्या एका चांगल्या बाजूचेंहि दिग्दर्शन करणें युक्त आहे. सन १८९५ ते १९०० साला-पावेतों ॲनी बेसंटच्या थिऑसफीचा प्रचार महाराष्ट्रांतील शिकलेल्या लोकांत बराच झाला होता व शिकलेल्या लोकांपैकीं अनेकांचें लक्ष वेदान्त तत्त्वज्ञानाकडे वेधलें गेलें होतें. कित्येक अधिकारी वर्गापैकीं व वकील वर्गापैकीं सुशिक्षित लोक मराठी-तील व संस्कृतांतील तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांचें वाचन व अभ्यास करूं लागले. आम्हांस माहीत असलेल्या एका तालुका कोर्टाचे सदाचरणी व सोज्ज्वल न्यायाधीश ॲनी बेसंटच्या थिऑसफी पंथाचे अनुयायी बनले होते व त्यांचें ज्ञानेश्वरी या ग्रंथावर प्रेम जडून या ग्रंथाचा उत्कृष्ट प्रकारचा अभ्यास त्यांनीं केला होता. या गृहस्थांची एका तालुका कोर्टांतून दुसऱ्या तालुका कोर्टाचे न्यायाधीश म्हणून नेमणूक झाल्यावर थोडक्याच दिवसांत त्या कोर्टांत वकिली करणाऱ्या कित्येकांनीं ज्ञानेश्वरीचे ग्रंथ विकत घेतले. व न्यायाधिशाचे घरीं वकिलवर्गापैकीं कित्येक लोक न्यायाधिशासमवेत ज्ञानेश्वरी ग्रंथाचें वाचन व चर्चा करूं लागले. जोंपावेतों हे न्यायाधीश त्या तालुक्याचे अधिकारी होते, तोंपावेतों ज्ञानेश्वरीच्या वाचनाचा व अभ्यासाचा कार्यक्रम सुरू राहिला. त्या न्यायाधिशाची बदली होताच ज्ञानेश्वरीचा अभ्यास करणाऱ्या वकिलां-नीं ज्ञानेश्वरीचीं पुस्तकें बांधून कपाटांत ठेवून दिलीं. जो धंदा ज्या अधिकाऱ्याच्या सत्तेखालीं करावयाचा, त्याचें मन राजी राखण्यास्तव वर दर्शविलेल्या चांगल्या व वाईट वळणाचा वकिलवर्गास आश्रय करावा लागतो हें उघड दिसून येतें. कनिष्ठ कोर्टांतील वकील द्रव्यसंपादनार्थ ज्या वाममार्गाचा अवलंब करतात, त्यांपैकीं काहींचा उल्लेख प्रस्तुत स्थळीं करणें जरूर आहे. कोर्टांत चाललेल्या वादाचें काम चालविण्याकरितां पक्षकाराचे ठिकाणीं ज्या प्रकारची पात्रता लागते, तशा प्रका-रची पात्रता त्याच्या ठिकाणीं नसल्यानें तो त्याचेतर्फे वकिलास काम चालविण्याचा आपला प्रतिनिधि म्हणून अधिकार देतो. ही गोष्ट लक्षांत घेतां वकिलानें एखाद्या पक्षकाराचें वकिलपत्र घेतलें म्हणजे तो वाद पक्षकार पुरवील ती माहिती व पुरावा, तोंडी व लेखी, कोर्टांत दाखल करून प्रामाणिकपणानें पक्षकाराची बाजू कोर्टापुढें मांडणें हें वकिलाचें पवित्र कर्तव्य आहे. पक्षकाराची बाजू लंगडी असल्यास खोटा लेखी पुरावा तयार करून तो पक्षकारातर्फे दाखल करण्याचा सल्ला प्रामाणिक वकिला-नें पक्षकारास कधींहि देतां कामा नये. त्याचप्रमाणें पक्षकारानें लेखी पुरावा दाखल करण्याकरितां वकिलाचे स्वाधीन केल्यास त्याची खऱ्याखोट्याची सूक्ष्म विचक्षणा करणें व खोटा असल्याचें निदर्शनास आल्यास तो दाखल केला जाणार नाहीं असें पक्षकारास सांगणें हें वकिलाचें पवित्र कर्तव्य आहे. आतां दर्शविलेल्या प्रकारचें प्रामा-णिक वकिलाचें जें कर्तव्य आहे तशाच प्रकारचें वकिलाचें दुसरें कर्तव्य म्हणजे

प्रतिपक्षाकडून द्रव्याचा लाभ करून घेणें हें अत्यंत हीन स्वरूपाचें वर्तन आहे. या स्वरूपाचें वर्तन करणारे कांहीं वकील आढळतात आमच्या एका सावकार पक्षकाराच्या अनेक फिर्यादी दिवाणी कोर्टांत दाखल होत. शेतकी ॲक्ट लागू झाल्यामुळें या सर्व फिर्यादींत मागील जमाखर्च कायद्याप्रमाणें सावकारास हजर करावे लागत. तरी होता होईल तों मूळ व्यवहार सुरू झाल्यापासूनचे जमाखर्च कोर्टापुढें न आणता मधल्याच एखाद्या वर्षापासून अर्धेमुर्धे जमाखर्च हजर करून अपला फायदा करून घ्यावयाचा अशें या पक्षकाराचें धोरण असे या पक्षकाराच्या बहुतेक कुळांचीं वकीलपत्रें एका ठराविक वकिलाकडे दिलीं जात या सावकाराचा गुमास्ता खटपटी व चाणाक्ष होता. हा गुमास्ता या पक्षकाराचीं कामें कोर्टांत अखेरचौकशीस निघण्यापूर्वी प्रतिवादीच्या या वकिलाशीं संधान बांधून मुकदम्याचे चौकशीचे तारखेपूर्वी पांच दहा रुपये त्याचे हातांत देऊन त्याचें तोंड बंद होईल अशी तजवजि करीत असे. ही त्या गुमास्त्याची युक्ति इतकी बेमालून ठरली कीं, ज्या दाव्यांत मूळच्या व्यवहारापासूनचे जमाखर्च कोर्टानें तपासले असता शें-पन्नास रुपये देखील मिळावयाचे नाहींत, त्या दाव्यांत दोनदोन, तिनतिनशें रुपयांचे हुकुमनामे त्या सावकारास मिळविता आले. ही गोष्ट वकिलीच्या धंद्याच्या इभ्रतीच्या व प्रामाणिकपणाच्या दृष्टीनें अत्यंत गर्हणीय अशा तऱ्हेची आहे.

आता दर्शविलेल्या या दोषाखेरीज वकिलीच्या धंद्यात कमीपणा आणणारी याणखी एक गोष्ट करण्याचा मोह वकिलांनी सोडणें सचोटीच्या दृष्टीनें अत्यंत जरूर आहे.

तालुक्याच्या व जिल्ह्याच्या कोर्टांतील फर्स्टक्लास व सेकंडक्लास न्यायाधिशां-पैकीं कित्येक लाच घेऊन निकाल देणारे आढळतात. यांची संख्या फार मोठी असते असें कांहीं नाहीं. लाच खाऊन न्याय देणारे न्यायाधीश क्वचित् असतात. या न्याया-धिशांचे लाच खाण्यासत्व त्या त्या गावातील कांहीं व्यापारी व प्रतिष्ठित वर्गापैकीं मध्यस्थ असतात याशिवाय कांहीं लाचखाऊ न्यायाधीश त्या कोर्टांत काम करणाऱ्या वकिलांपैकीं कांहींचा उपयोग लाच मिळविण्याकरिता मध्यस्थ म्हणून करतात. अशा प्रकारचे लाच मिळविण्यासत्व मध्यस्थी करणारे वकील स्वतःचा आर्थिक लाभ फार मोठ्या प्रमाणांत करून घेतात पांच हजारांपेक्षा अधिक किंमतीच्या मिळकतीचे जे महत्त्वाचे दावे, ज्यांना 'स्पेशल सूट्स' असें म्हणतात, त्या दाव्यांचे निर्णयाचे कामीं हा प्रकार कधीं कधीं दिसून येतो. आम्ही अठ्ठेचाळीस वर्षांपूर्वी वकिलीचा धंदा करण्यास प्रारंभ केला. त्याच्या आधीं कांहीं वर्षे फर्स्ट क्लास अधिकारपदावर असणारे एक नामांकित व हुशार न्यायाधीश जिल्ह्याच्या ठिकाणीं होते. त्यांनीं लाच खाऊन अपार संपत्ति मिळविली. हायकोर्टांतील एका न्यायाधिशाची वक्रदृष्टि या कारणामुळें त्यांच्यावर होती, परंतु कायदा, पुरावा इत्यादि बाबतींत या न्यायाधिशाचे निवाडे इतके येमलूम असत कीं अपिलांत त्यांचा ठराव फिरविणें हायकोर्टांतील न्यायाधिशास जड जात असे या मुनसफाचा एक न्हावी पट्टेवाला होता. ते न्यायाधीश

त्यांच्या मध्यस्थीनें मोठमोठ्या लटल्वांत लांच मिळवीत असत. याशिवाय जुन्या पिढींतील एक प्रौढ व प्रतिष्ठित वकील यांच्या मध्यस्थीनें हे न्यायाधीश लाच खात असत. आमच्या अद्देचाळीस वर्षांच्या वकिलीच्या कारकीर्दीत लांच खाणारा फर्स्टक्लास न्यायाधीश एकाद दुसराच आढळला. फर्स्टक्लास न्यायाधीश झाल्यापासून दोन तीन वर्षांत जवळ जवळ लाख दीड लाख रुपये यानें मिळविले असावेत असा अदाज आहे. फर्स्टक्लास न्यायाधिशाच्या जागेवर त्यांची नेमणूक होण्यापूर्वी ते एका तालुका कोर्टाचे सेकंडक्लास न्यायाधीश होते व तेथें असतांना मुंबई इलाख्यांतील ज्या जिल्ह्यांत आम्ही वकिली करीत होतों, त्या जिल्ह्यांतील सर्व कोर्टांत दाव्यांचे आपसांत निवाडे करण्याची एक मोठी लाट येऊन गेली. सेकंडक्लास न्यायाधीश या नात्यानें काम करीत असतां तालुका कोर्टाचे ठिकाणीं राहणाऱ्या एका फार *श्रीमान् सावकाराचे लाख दीड लाख रुपयाचे ॲवार्ड (आपसांत निवाडे) त्यांनीं* पांच सहा महिन्यांच्या मुदतींत करून दिले व त्या सावकारापासून बरेंच द्रव्य संपादन केलें. या लाचखाऊ न्यायाधिशानें वकील वर्गापैकीं एका पुढारी वकिलाशीं स्नेह जुळवून आणला, व थोडक्याच काळांत त्या वकिलाच्या मार्फतीनें पुष्कळ द्रव्य मिळविलें. ज्या वकिलाच्या मध्यस्थीनें या न्यायाधिशानें हें द्रव्य मिळविलें, ते *गृहस्थ व्यवहार कुशल व स्वार्थ साधण्याचे कामीं वस्ताद व दक्ष असे होते.* मध्यस्थी करून द्रव्य संपादन करण्याच्या या सोप्या व सुलभ मार्गाची पर्वणी या वकिलाकडे अनायासें चालून आल्याकारणानें न्यायाधिशाबरोबर त्यांनीं स्वत:ची तिजोरी भरून काढली. लांचेच्या रकमेपैकीं बराचसा भाग हे वकील एका बाजूस ठेवून आपल्या तिजोरींत टाकीत असत. हा सर्व व्यवहार गुप्त स्वरूपाचा असल्यानें *वकील सांगतील ती रक्कम न्यायाधिशास लाच देण्याकरितां* पक्षकार त्यांच्या हवालीं करी व या रकमेपैकीं वकीलसाहेबांच्या इच्छेनुसार त्यांतील रकम न्यायाधिशाची भूक शमेल इतकी वकिलसाहेबांकडून न्यायाधिशास मिळे. पक्षकारानें खरोखर किती रकम न्यायाधीशसाहेबास देण्यासाठीं दिली, हें समजण्याचें साधन न्यायाधिशास उपलब्ध होणें कठीण होतें यामुळें मध्यस्थ वकील जितकी रकम न्यायाधिशाचे हातीं देतील तेवढी स्वीकारून स्वस्थ बसणें न्यायाधिशास भाग पडे.

न्यायाधिशाच्या लाच मिळविण्याच्या लालसेस्तव कोर्टांत काम करणाऱ्या वकि*लानें मध्यस्थी करणें ही अत्यंत लाजिरवाणी व निंद्य गोष्ट आहे.* परंतु द्रव्यसंपादनाच्या स्वार्थापुढें या गोष्टीचा निंद्यपणा न भासणें हें मनुष्य स्वभावास अनुसरून आहे, असेंच म्हणावें लागतें. एका देशी संस्थानांत आमचे एक नातेवाईक वकिलीचा धंदा बरींच वर्षें करीत असत. धंद्यास कमीपणा आला असून प्राप्ति म्हणण्यासारखी होत नाहीं, अशा मजकुराचें पत्र त्यांनीं आम्हास लिहिलें. न्यायाधिशापुढें वकिली करणा या लोकांपैकीं कांहीं लोक न्यायाधिशाला लाच देऊन दाव्यांचे निवाडे आपल्या तर्फें करून घेतात व ही गोष्ट मी करीत नसल्यामुळें माझें वकिलीचें काम व प्राप्ति *फार कमी झाली आहे, तरी मीं कोणता मार्ग स्वीकारावा यासंबंधाचा सल्ला त्यांनीं*

आम्हास या पत्रात विचारला. या प्रश्नाचें उत्तर काय द्यावें याची आम्हास अडचण वाटली. कारण इतर कांहीं वकील वरील ज्या वाममार्गाचा अवलंब करितात तोच मार्ग तुम्ही स्वीकारावा असा सल्ला त्यांना देणें योग्य नव्हतें. सबब त्यांना आम्ही मोघम असें कळविलें कीं तुमच्या स्वत:च्या अंत:करणास जी गोष्ट करणें तुम्हास योग्य वाटेल त्याप्रमाणें वर्तन करावें. आमचा सल्ला विचारणारे हे आमचे नातेवाईक सच्छील वृत्तीचे व पापभीरु स्वभावाचे होते व या कारणास्तवच त्यांनीं वरील पत्र आम्हास लिहिलें. अशा स्वभावाचे ते नसते तर आमचा सल्ला न घेतां त्यांनीं लांच-खाऊ न्यायाधिशांची मध्यस्थी करण्याचा मार्ग निःसंशय स्वीकारला असता.

आमच्या अट्ठेचाळीस वर्षांच्या कारकीर्दींतील एका तालुका कोर्टांतील वकिलांना जें अनिष्ट वळण लागलें व जें वकिलांच्या इभ्रतीस कमीपणा आणणारें आहे त्याचा आम्ही प्रस्तुत स्थळीं उल्लेख करितों.

कनिष्ठ कोर्टांत ज्या पक्षकारांचीं कामें चालतात, त्यापैकीं बरेच लोक धन-संपन्न व प्रतिष्ठित सावकार असतात स्वार्थाकरितां कुळांच्या देवघेवीच्या व्यवहारांत कुळाकडून आलेला वसूल गडप करून त्याचा जमाखर्चांत उल्लेख न करणें हें व अशाच प्रकारच्या लाडी लबाडीच्या गोष्टी हे लोक करितात. तिऱ्हाइताशीं बोलतांना स्वत:स ते अनुदार म्हणवितात. त्यांच्या समजुतीप्रमाणें पुष्कळ धनसंचय ज्या प्रति-ष्ठित सावकारी धंदा करणारापाशीं असेल, तो अनुदार या लोकांची अनुदारपणाची व्याख्या अशा प्रकारची असल्याकारणानें सत्य असत्य, खरें-खोटें, सागण्याच्या बाबतींत नीतिमत्तेच्या मर्यादा त्याचेकडून पाळल्या जात नाहींत. अशा प्रकारच्या सावकाराची एखाद्या दाव्यांत जबानी होऊन त्याची लबाडी उघडकीस आल्यास दाव्याचें काम संपल्यावर त्याला गांठून "शेटजी, प्रतिज्ञेवर तुम्ही खोटी जबानी दिली आहे व फौजदारी खटला तुमचेवर होऊन तुरुंगांत जाण्याचें कृत्य तुम्हीं केलें आहे. फौजदारीच्या रुकाराचा अर्ज दाखल करावा असें आमचा पक्षकार आम्हास सांगत आहे आपल्याकडून आम्हांस कांहीं द्रव्यलाभ होईल, तर असें न करण्या विषयीं आम्ही पक्षकाराचें मन वळवूं" अशा प्रकारची दहशत घालून हजार-पांच-शेंची प्रामिसरी नोट त्याचेकडून लिहून घ्यावयाची व ती रकम वसूल करावयाची अशा प्रयोग तालुका कोर्टांतील एका हुशार व चाणाक्ष वकिलानें केला या प्रयोगाची माहिती थोड्याच काळांत त्या कोर्टांतील अन्य वकिलांस झाली व या मार्गाचा अवलंब करून त्यांनींहि द्रव्य मिळविलें. ही गोष्ट अत्यंत निंद्य प्रकारची आहे. एखाद्या धनवान् माणसास चोरानीं जिर्दीत गाठावें व त्यास लुबाडून घ्यावें. अशाच स्वरूपाचा हा प्रकार आहे. हें वाईट वळण त्या तालुका कोर्टांतील वकिलींच्या अंगवळणीं पडल्यामुळें इतरहि अनिष्ट गोष्टी करण्याची प्रवृत्ति त्या कोर्टांतलि वकिलांत निर्माण झाली व नीतिमत्तेच्या दृष्टीनें या कोर्टांतील वकिलांचा दर्जा हीन स्वरूपाचा पन्नास वर्षांपूर्वीं जो बनला गेला तो आजपावेतों कायम आहे.

वकीलवर्गाच्या ठिकाणीं आढळणाऱ्या दोषांचें येथपावेतों दिग्दर्शन केल्या-

सर सन १८८० साली सर रिचर्ड टॅंपल यांनी India in 1880 A. D. या नांवाचा जो ग्रंथ प्रसिद्ध केला आहे, त्यांत वकीलवर्गाचें जें शब्दचित्र त्यांनी रेखाटलें आहे, तें या स्थळीं आम्ही उद्धृत करितों. असें करण्यांत आमचा हेतु हा आहे कीं, सन १८८० सालापासून आज सदुसष्ट वर्षें होऊन गेलीं असतांहि त्या काळच्या व प्रस्तुत काळच्या स्थितींत म्हणण्यासारखा काहीं एक फरक झाल्याचें दिसत नाहीं.

*Extract from the book: " India in 1880 ", page No* 123

Together with the public service, the profession of the law has advanced pari passu. This great profession is for the most part a product of British rule and is divided as in England, into two branches, like those of barristers and solicitors. Admission to the Native Bar is regulated by tests and examinations, which ensure the possession of high qualifications by those who apply for it An almost equal improvement is visible in the Native barristers as in the Native judges, and a standard of professional etiquette prevails, formed on the English model. The standard was much lower in former days, when advocates but too often connived at or participated in mal practices and even in frauds. Any remnants of these evils, which may still linger in the profession, will ere long be eliminated. As now constituted, the Native Bar is fast becoming a power in the country; its independance of demeanour, freedom of speech and sympathy with the people, are raising it daily in public estimation. Its conduct fosters the salutory belief, which is setting down in the minds of the Natives, to the effect that the British system of civil justice constitutes a real palladiaum of their liberties and privileges Its loyalty will be true towards the Government which is its foster-father Improvements, similar in kind but much less in degree, are taking place in the profession of Law which branch includes attorneys, solicitors and all other legal practitioners. These Native practitioners formerly had a very evil repute for stimulating wrongful litigation, promoting fraud and poisoning the koral

atmosphere around the precincts of the Courts. Of this mischief, much has been removed by the improvements in the Native Bench and Bar, and by the operation of public opinion, but much unfortunately remains.

वरील उताऱ्यात वकिलवर्गाच्या ठिकाणीं असलेले दोष नमूद केले आहेत. मुंबई इलाख्यातील मुंबई शहर, जिल्हा व तालुका या ठिकाणीं वकिलीचा धंदा करीत असलेल्या विद्यमान् वकिलाचें निरीक्षण केलें असता हे दोष म्हणण्यासारखे कमी झाले आहेत, असें कोणीहि म्हणू शकणार नाहीं. वकिलीच्या धंद्याची परिस्थिति, धंद्यात शिरणाऱ्या लोकांची आर्थिक ऐपत व जीवनकलहातील चढाओढ या गोष्टी लक्षात घेतल्या असता भविष्य काळात वरील उताऱ्यात दर्शविलेले दोष वकिलीचा धंदा करणाऱ्यात कमी होतील अशी आशा करणें व्यर्थ आहे.

व्यक्तिशः ज्या दोषापासून मुख्यत अलिप्त राहिलें पाहिजे, त्याचें दिग्दर्शन येथपावेतों केल्यावर वकिलीचा धंदा उत्तम प्रकारें करण्यास्तव कोणते गुण वकिली करणारानें संपादन करणें जरूर आहे याचें दिग्दर्शन करतों. कामानिमित्त वकिलाकडे अशील आल्यास वेळ न घेता त्याचें काम काय आहे, हें समजून घेऊन त्या बाबतींत जें कांहीं करावयाचें तें तत्काल करण्याची पद्धत वकिलानें ठेविली पाहिजे. डॉक्टर अगर वैद्य यास ज्या प्रमाणात या गुणाची आवश्यकता आहे, त्याच्या खालोखाल वकिली-चा धंदा करणारास या गुणाची आवश्यकता आहे. त्यातल्या त्यात वकिलीच्या धंद्यात ज्या वकिलाचा चांगला जम बसलेला असतो व ज्याच्या साहाय्यावाचून आपलें काम होणार नाहीं अशी ज्या वकिलाविषयींची ख्याति सर्वत्र पसरलेली असते, अशा वकील धेपर्वाईनें प्रसंगीं पक्षकाराविषयीं वागला व मला आता वेळ नाहीं अथवा आता काम करण्याची मर्जी लहर नाहीं असें त्यानें पक्षकारास सांगितलें, तर अशा वकिलाचें कांहींहि नुकसान होत नाहीं. निरुपायास्तव असल्या वकिलाच्या लहरीप्रमाणें पक्षकाराला वागणें प्राप्त होतें, परंतु वकिलीचा धंदा नवीन करणारास या पद्धतीनें वागून भागत नाहीं. आळसानें अगर बेफिकिरीनें काम समजून घेण्याचें टाळून त्या पक्षकारास निष्फळ पाठविण्यांत आलें, तर तो पक्षकार अन्य वकिलाकडे काम देतो व अशा रीतीनें त्या वकिलाचें नुकसान होतें. नवीन वकिलानें त्याच्या कचेरींत सकाळपासून कोर्टांत जाण्याच्या वेळेपर्यंत हजर राहणें जरूर असतें, कारण कोणी पक्षकार ठराविक वेळातच येतो असें नाहीं त्याच्या सोईस पडेल तेव्हां वकिलाकडे कामाकरता येतो. वकिलीच्या धंद्यात नवीन प्रवेश करणाऱ्या कित्येक तरुण वकिलांना पत्ते अगर अन्य खेळ खेळण्याची अगर स्नेह्याकडे गप्पा ठोकण्यास जाण्याची संवय असते. या संवयीमुळें स्वत.च्या कचेरींत हजर न राहणाऱ्या वकिलाचें नुकसान झाल्यावाचून राहात नाहीं. आता दर्शविलेल्या गुणाशिवाय नवीन वकिली करणारा याच्याचा स्वभाव असावा. कांहीं तरुण वकील चिडखोर व रागीट स्वभावाचे असतात. पक्षकार अशमी असतो. त्याला स्वत. त्याची मानगड काय आहे हें वकिलास नीट

समजून सांगतां येत नाहीं. अशा लोकांवरून त्याच्या वादाची सर्व हकीकत अत्यंत धिमेपणानें, न रागावतां व गोड भाषेत बोलून त्याचेपासून समजून घ्यावी लागते. ज्या वकिलाची ख्याति हुशार वकील म्हणून झाली आहे, त्याला या गुणाची आवश्यकता नाहीं, तथापि त्याची वाचा रसाळ असल्यास पक्षकारांची त्याचेविषयींची भावना व आदर दुणावल्यावांचून राहात नाहीं. पक्षकाराचा दावा कोर्टात दाखल झाल्यावर तो दावा चालविण्याचे कामीं त्यानें अत्यंत दक्ष राहणें जरूर आहे. पक्षकारातर्फे जो लेखी पुरावा दाखल करणें असेल तो नेमून दिलेल्या तारखेला दाखल करण्याची दक्षता वकिलानें घेणें अत्यंत जरूर आहे. कांहीं न्यायाधिशांची अशी पद्धत असते कीं, लेखी पुरावा नेमलेल्या तारखेस दाखल केला गेला नाहीं, तर तो त्या दाव्याचे कामीं दाखल करण्याचे नाकारतात व कित्येक दाव्याचे कामात लेखी महत्त्वाचा पुरावा दाखल केला न गेल्यामुळें पक्षकाराचें नुकसान झाल्याचीं उदाहरणें घडलीं आहेत. या प्रकारची पद्धत कित्येक न्यायाधिशांची आढळते. तथापि कांहीं न्यायाधीश अखेरचौकशीचे तारखेपर्यंत पक्षकार हजर करील तो पुरावा दाखल करण्यास हरकत घेत नाहींत न्यायाधिशापुढें आलेल्या वादाचा निवाडा न्यायानें व सत्यास अनुसरून करावयाचा हेंच न्यायाधिशाचें ध्येय आहे, तर मग लेखी पुरावा वादाच्या निवाड्यापूर्वी पक्षकारानें केव्हांहि हजर केला तर तो ग्राह्य करणें यात कांहीं एक अन्याय नाहीं व ही पद्धत केव्हांहि चांगलीच समजली पाहिजे कोणता न्यायाधीश कोणत्या पद्धतीचा भोक्ता आहे, हें समजेपावेतों लेखी पुरावा दाखल करण्याच्या बाबतीत वकिलानें दक्ष राहणेंच इष्ट आहे.

पक्षकाराचें काम चालविण्याचे बाबतींत वकिलाचें वर्तन अत्यंत प्रामाणिकपणाचें असलें पाहिजे, हें पूर्वीच सांगितलें आहे कित्येक वेळा प्रतिपक्षाच्या विरुद्ध त्याच्या तर्फेच्या साक्षीदाराची चांगली उलटतपासणी करून साक्षीदाराचें खरें स्वरूप कोर्टापुढें आणण्याचे कामीं कोणत्याहि प्रकारची कुचराई वकिलानें करता कामा नये. पक्षकारानें दिलेल्या माहितीअन्वयें साक्षीदार कोणत्या कारणामुळें साक्ष देण्यास उद्युक्त झाला आहे, हें स्पष्टपणें त्याच्या उलटतपासणींत वकिलानें कोर्टापुढें आणण्याचा प्रयत्न केला पाहिजे. बहुतेक वादग्रस्त दिवाणी दाव्याचे कामात जे साक्षीदार उभयता पक्षकारातर्फे साक्ष देण्याकरिता येतात, त्यांपैकीं कांहीं साक्षीदार सफाईत खोटी साक्ष देणारे असतात. गांवोगांवीं कांहीं हुशार लोकांचा खोटी साक्ष देऊन पैसे मिळविण्याचा धंदाच असतो. वाद कोणताहि असो, पक्षकाराकडून पैसे मिळाले म्हणजे तो जशी हकीकत सांगेल तशी हकीकत प्रतिज्ञेवर कोर्टात सांगण्यास हे लोक तयार असतात. कसून उलटतपासणी केल्यानें असल्या साक्षीदाराचा खोटेपणा तेव्हांच उघडकीस येतो या वर्गात पडणाऱ्या साक्षीदाराशिवाय कांहीं साक्षीदार असे असतात कीं एखाद्या दाव्यातील कांहीं गोष्टी त्यांना माहीत असतात व कांहीं माहीत नसतात परंतु ते साक्ष देण्यास आले म्हणजे ज्या गोष्टी त्यांना माहीत नसतात, त्या गोष्टी ते पक्षकाराच्या विरुद्ध तो म्हणेल त्या गोष्टी सांगण्यास तयार

होतात. असल्या साक्षीदाराच्या उलटतपासणींत त्याला खोटें पाडण्याचा प्रयत्न यशस्वी होतोच असें नाहीं. परंतु त्या दाव्याचे कामीं जर अशा साक्षीदारानें तोंडीं सांगितलेल्या हकीकतीशीं विसंगत असा लेखी पुरावा दाखल झाला असल्यास त्या साक्षीदाराची तितक्यापुरती जबानी खोटी व अविश्वसनीय ठरते. या प्रकारचा प्रामाणिकपणा वकिलाच्या अंगीं असल्याबद्दल त्याची ख्याति झाली म्हणजे धंद्यात त्याचा उत्कर्ष झाल्याखेरीज राहात नाहीं. वरील गुणाशिवाय वकिलाच्या अंगीं दुसरा एक गुण जो धंद्यातील कांहीं अनुभव आल्यानंतर त्याचे ठिकाणीं येतो, तो म्हटला म्हणजे ज्या न्यायाधिशापुढें काम चालवावयाचें त्याची मनोवृत्ति व त्याचे गुणदोष याबाबत आलेल्या प्रत्यक्ष अनुभवास अनुसरून खटल्याचें काम चालविणें हा होय. ज्या प्रमाणें एखादा कुशल नावाडी वारा कोणत्या बाजूस वाहतो आहे, हे पाहून आपली नाव समुद्रात चालवितो, त्याचप्रमाणें वकिलानें खटला चालवितांना आपली बाजू यशस्वी करण्याचे कामीं कौशल्य दाखविलें पाहिजे. न्यायाधिशाचें मन संशयी आहे अशी खात्री झाल्यास प्रतिपक्षाच्या पुराव्याविषयीं न्यायाधिशाचे मनात संशय येईल अशा गोष्टी करण्याचा वकिलानें कसून प्रयत्न केला पाहिजे. न्यायाधिशाच्या मनोवृत्तीची बरोबर पारख करणाऱ्या वकिलानें न्यायाधिशाच्या मानसिक गुणदोषाचा फायदा स्वतःच्या पक्षकाराची बाजू यशस्वी करण्याकडे केल्याचें कित्येक दाव्यात आढळून येतें.

दाव्याची अखेरचौकशी सुरू होण्यापूर्वी वकिलानें त्याचा पक्षकार व त्याचे साक्षीदार यांनी दाव्याचे कामीं कशी जबानी द्यावयाची, कोणत्या गोष्टी सांगावयाच्या, प्रतिपक्षी उलटतपासणींत कोणते प्रश्न करील व त्यांचीं काय उत्तरें द्यावयाचीं याची रंगीत तालीम घरीं करणें अत्यंत जरूर असतें. महत्त्वाच्या तक्रारी व मानगडी मुकदम्याचे कामीं ही गोष्ट करण्याचें वकिलानें टाळलें तर पक्षकाराचें हटकून नुकसान झाल्याखेरीज राहात नाहीं. कांहीं दाव्यांत पक्षकाराची खरी बाजू असून वर नमूद केल्याप्रमाणें रंगीत तालीम न केल्यानें दावा अयशस्वी ठरल्याचीं उदाहरणें आमच्या पाहण्यात आहेत. आम्ही ज्या कोर्टात वकिलीचा धंदा केला, त्या कोर्टातील एक दुय्यम ( सेकंड क्लास ) सबजज्ज यांची पद्धत दाव्यातील मुद्दे काढण्यापूर्वी वादीप्रतिवादींच्या जबान्या घेण्याची होती हे न्यायाधीश तक्रारी मुकदम्याच्या कामीं मुद्दे काढण्याच्या दिवशीं फिर्याद, कैफियत व पक्षकारानें हजर केलेले कागदपत्र वाचून कोर्टात येत. याप्रमाणें कागदपत्राचें वाचन केल्यावर वादाच्या मुद्दयाशीं खरा प्रकार काय आहे; याचा अंदाज ते ठरवीत व या अंदाजास अनुसरून वादी–प्रतिवादींची ते तपासणी करीत. या त्यांच्या पद्धतीमुळें मुद्दे काढण्याच्या दिवशीं कित्येक दाव्यांचे पेकाट मोडून जात असे. या पद्धतीचा अवलंब करणाऱ्या न्यायाधिशाच्या कचेरीत काम करणाऱ्या वकिलानें पक्षकाराच्या जबानीची रंगीत तालीम करणें अत्यंत जरूर आहे. एका पंधरा सोळा हजाराच्या देवघेवीच्या दाव्याच्या कामीं फर्स्ट क्लास

न्यायाधिशापुढें खटला चौकशीकरितां लागला. पक्षकारास पुकारतां वादी प्रतिवादी हजर झाले. परंतु प्रतिवादीचे वकील हजर नव्हते. इतक्यात प्रतिवादीचे वकील तेथें आले. त्यांना त्या पक्षकाराची योद्यन दाव्यांतील तक्रारीसंबंधी कोर्टापुढें अमुक जबाब घावा असें काहीं सांगावयाचें होतें. हें न्यायाधिशानें ओळखून वकिलास जरा आपण स्वस्थ बसा, प्रथम पक्षकारास थोडे सवाल विचारतों असें सांगितलें. व पक्षकारास शपथ देऊन त्याची प्रतिज्ञेवर जबानी घेतली व दाव्यांतील वादग्रस्त मुद्यांबद्दल त्यानें जें म्हणणें होतें तें काढून घेतलें. या त्याच्या जबानीमुळें दाव्याचें काम संपुष्टांत आलें. पक्षकाराची जबानी झाल्यावर न्यायाधिशानें विनोदानें " बापूसाहेब आता आपले पक्षकारास काय विचारावयाचें असेल तें विचारा " असें म्हटलें परंतु न्यायाधिशानें अगोदरच पक्षकाराची जबानी घेऊन त्याचा पक्ष लंगडा करून ठेविल्यामुळें दावा चालविण्यांत काहींच स्वारस्य राहिलें नाहीं. येथपावेतों केलेल्या विवेचनावरून दाव्याची चौकशी सुरू होण्यापूर्वी रंगीत तालमेची किती जरूरी आहे हें उघड होतें. मुंबई हायकोर्टात ओरिजिनल साईडकडे जे मानगडीचे खटले चालतात, त्यातील दोन्ही बाजूचे सॉलिसिटर्स वादग्रस्त मुद्याबद्दल पुरावा देण्याकरितां येणाऱ्या साक्षीदारांचे सवाल व उत्तरें तयार करतात व खटला चालण्यापूर्वी ऑफिसातील कारकुनाकडून प्रत्येक साक्षीदारास तयार केलेल्या यादींतील सवाल विचारून त्याची उत्तरें त्या साक्षीदाराकडून वदवून घेतात. याप्रमाणें महत्त्वाच्या सर्व खटल्यांत साक्षीदाराच्या सवाल—जबाबाची रंगीत तालीम दाव्याचें काम सुरू होण्यापूर्वी महत्त्वाच्या सर्व खटल्यात करण्यात येते. दाव्याचे कामीं साक्ष देण्याकरतां येणाऱ्या साक्षीदाराची माहिती जरी खरी असली तथापि ती एका विशिष्ट पद्धतीनें कोर्टापुढें यावी लागते. सूचक प्रश्न साक्षीदारास सरतपासणींत विचारता येत नाहींत, यामुळें आता वर्णिलेली पद्धत केव्हाहि युक्तच म्हटली पाहिजे.

येथपावेतों वकिलास अवश्य लागणाऱ्या गुणाचें वर्णन केल्यावर एखाद्या पक्षकारानें दाव्याचे कामीं लबाडी केल्याचें वकिलाचे निदर्शनास आल्यास त्याचें प्रायश्चित्त कोर्टाकडून त्याला मिळूं नये म्हणून त्याला वाचविण्याचा प्रयत्न करणें वकिलास कितपत श्रेयस्कर आहे हा प्रश्न उपस्थित होतो आमच्या एका पक्षकारानें आपल्या जमाखर्चात साखरेच्या पोत्याच्या किंमतीबद्दल रक्कम एका इसमाचे नावें टाकली. या रकमेची फिर्याद जमाखर्चातील या उताऱ्यावरून त्यानें आम्हास दाखल करण्यास सांगितली. त्या वेळीं हा व्यवहार निव्वळ लबाडीचा आहे असा संशय आम्हास येण्याचें कारणहि नव्हतें. दाव्यांत प्रतिवादी समन्स लागल्यावर वकिलामार्फत तो हजर होऊन त्यानें अशी तक्रार केली कीं, मी कधीं साखर घेतली नाहीं व जमाखर्चातील नावें टाकलेली रक्कम लबाडीनें त्याचे नावें टाकण्यात आली आहे. ही फिर्याद ज्या प्रतिवादीवर होती त्याची स्थिति लक्षात घेता ही त्याची तक्रार खरी आहे असें आम्हास वाटलें. त्यानंतर दाव्याच्या चौकशीच्या तारखेस प्रतिवादीचे वकिलानें असा अर्ज केला कीं, वादीचे जमाखर्च तावडतोब जप्त करून कोर्टात आणावे म्हणजे त्यावरून

ही फिर्याद खशी स्वार्थीची आहे हें सिद्ध करून देता येईल. यावर कोर्टानें सदर वादीचे जमाखर्च तावडतोब जप्त करून आणण्याचा हुकूम केला व त्याची बजावणी करण्याचें काम बेलिफाकडे सोंपविलें. या हुकुमान्वयें पक्षकाराचे जमाखर्च जप्त करून कोर्टात आणले गेले असते तर तो गोत्यांत आल्यावाचून राहिला नसता. ही गोष्ट लक्षात घेऊन आम्ही एक माणूस त्याचेकडे पाठवून कोर्टानें केलेला हुकूम कळविला. त्यावर तो घरांतून बाहेर गेला. पुढें बेलिफ घरी आला असतां, पक्षकार घरीं नाहीं सबब जमाखर्चाच्या वह्या मिळाल्या नाहींत असा रिपोर्ट करून बेलिफ निघून गेला. त्यानंतर पक्षकार नें आमची भेट घेतली तेव्हां त्यास ही सर्व हकीकत कळविली. त्यावर आमचे पक्षकारानें ज्या इसमावर फिर्याद केली होती त्याची माफी मागून व त्याचा खर्च आपसांत देऊन फिर्यादीचें काम चालविलें नाहीं. ती निकालांत काढण्यात यावी अशी पुरसिस कोर्टात दाखल केली व ती फिर्याद निकालीं निघाली. अशा प्रकारच्या पक्षकाराने केलेल्या लबाडीबद्दल त्याचेवर ओढवणाऱ्या संकटातून त्यास मुक्त करण्याची वकिलानें खटपट करणें धोक्याचें आहे, असें आम्हांस वाटतें. या व अशाच प्रकारच्या पक्षकारावर येणाऱ्या संकटातून त्यास सोडविणें हें वकिला-चें कर्तव्य जरी मानलें गेलें नाहीं तरी असें करणें केव्हांहि श्रेयस्कर मानलें पाहिजे.

---

प्रकरण १० वें

# ३. वकिलांची प्राप्ति

ज्या वकिलाचा धंदा बऱ्या प्रकारें पंचवीस तीस वर्षे चालतो, त्याचेपाशीं त्या धंद्यातून निवृत्त होण्याचे सुमारास लाख दीड लाख रुपये किंमतीची मिळकत प्राप्त झाल्याचीं तालुका व जिल्हा कोर्टांतील अनेक वकिलांचीं उदाहरणें आढळून येतात. सन १९०० सालापूर्वी जुन्या पिढीतील तालुका व जिल्हा कोर्टातील वकिलांनीं जास्तींत जास्त दहा लाख रुपये किंमतीची मिळकत संपादन केल्याचीं कित्येक उदाहरणें आढळत असत. अशा प्रकारची मिळकत संपादन करणाऱ्या वकिलांपैकीं कोणी उदार अंतःकरणानें संचय केलेल्या द्रव्यापैकीं कांहीं भाग राष्ट्रकार्याकरिता अथवा जनतेच्या सुखसोयीकरिता दिल्याचीं उदाहरणें क्वचितच आढळतात. आम्ही ज्या जिल्हा कोर्टात वकिलीचा धंदा केला, त्या जिल्ह्यात निव्वळ मराठी जाणणाऱ्या आठ दहा लाख रुपये मिळविलेल्या एका पुत्रहीन वकिलानें अपानात जाऊन धंदेशिक्षण मिळविणाऱ्या तरुणास दरमहा रुपये ५० ची शिष्यवृत्ति देण्याविषयींची तरतूद त्यानें त्याच्या मृत्युपत्रात केली होती. असें दुसरेंहि एक उदाहरण नमूद करण्यासारखें आहे. ज्ञानेश्वरकालापासून इंग्रजी राज्याची स्थापना होईपर्यंत महाराष्ट्रांतील अनेक संतांनीं

निरनिराळ्या विषयावर विस्तृत पद्यद्रव्य निर्माण केलें आहे. या वाङ्मयाचें संशोधन करून त्याचा संग्रह करणें व प्रकाशन करणें या सत्कार्यासाठीं एका वकिलानें त्याच्या वकिलीच्या धंद्यातील प्राप्तपैकीं बराच मोठा भाग खर्च केल्याचें उदाहरण आहे. मुंबई इलाख्यांतील अन्य जिल्ह्यांत अगर तालुक्यात वकिलीचा धंदा करणाऱ्यांपैकीं कोणी एखाद्या धनसंपन्न वकिलानें मनात भरण्यासारखी एखाद्या उत्कृष्ट कार्याप्रीत्यर्थ देणगी दिल्याचें पुणें शहराशिवाय इतरत्र आढळत नाहीं. याविषयीची माहिती पुढील एका प्रकरणात देण्यात आली आहे. जसजसें द्रव्य मिळत जातें, तसतशी द्रव्यतृष्णा वाढत जाते. ही तृष्णा तृप्त करण्याकरिता वकिलीशिवाय अन्य अशा सोप्या मार्गानें द्रव्यप्राप्ति कशी होईल, इकडे तालुक्यांच्या व जिल्ह्याच्या शहरीं वकिलीचा धंदा करणाऱ्या लोकांचें लक्ष वेधलें गेलें नव्हतें. अलीकडे मात्र वकिलीच्या धंद्यात प्राप्तीचें मान फार कमी झाल्याकारणानें ठिकठिकाणच्या वकिलांपैकीं कित्येक वकिलांना टाइम्स ऑफ इंडिया वर्तमानपत्रातील "क्रॉसवर्ड पझल्स" सोडविण्याचें वेड लागलें आहे. हीं पझल्स बिनचूक सोडविणारास चार पाच हजार रुपयांचें फार मोठें पारितोषिक मिळतें. थोड्या फार चुका होणारास पारितोषकाची रकम कमी प्रमाणात मिळते. हीं पझल्स सोडविण्याचें वेड ज्यांना लागलें आहे, त्यांना क्रॉसवर्ड पझल्स ज्या आठवड्याच्या टाइम्स ऑफ इंडियाचे अंकात आलें असेल तो अंक विकत घ्यावा लागतो. शिवाय पझल्स सोडविलें म्हणजे त्याचें उत्तर पाठविताना सोबत कांहीं प्रवेश-फी पाठवावी लागते. एखाद्या जिल्हाकोर्टात हें वेड ज्यास लागलें आहे, असे पंचवीस लोक असले तर दरमहा प्रत्येक वकिलाचा या संबंधाचा खर्च रु. पाच धरला, तर दरमहाचे हेंसत्यांशीं रु. टाइम्स ऑफ इंडियाला मिळतात. अशा तऱ्हेनें एका वर्षाचा क्रॉसवर्ड पझल्स सोडविणाऱ्या नादी वकिलाचा सुमारें तीनशें रु. खर्च होतो. परंतु या तीनशें रुपयांपैकीं पाचपन्नास रुपयांचें पारितोषिक उभ्या वर्षात कोणा वकिलास मिळाल्याचें उदाहरण क्वचितच आढळतें. सुलभ मार्गानें द्रव्य मिळविण्याच्या या वेडामुळें द्रव्यप्राप्तीऐवजीं द्रव्याचें नुकसान कसें होतें हें उघड होत आहे. तथापि या वेडानें अलीकडील वकिलास सोडल्याचें दिसत नाहीं. मुंबई, अहमदाबाद, पुणें, सुरत इत्यादि मुंबई इलाख्यांतील प्रमुख शहरीं बॅरिस्टर, सॉलिसिटर व वकील यांनीं सोप्या मार्गानें द्रव्य संपादन करण्याचे कांहीं नवीन मार्ग काढिले आहेत. घोड्याच्या शर्यती सुरू झाल्या कीं, पहिला नंबर कोणत्या घोड्यास मिळेल याच्या पैजा लावणें हा त्यापैकीं एक मार्ग होय. या पैजा लावण्याकरितां सुरवातीस खर्च बराच येतो. इतका खर्च करून अखेर पैजेंत पराभव झाला म्हणजे पैज जिंकणारास बरीच मोठी रकम द्यावी लागते. या मार्गानें वकील, बॅरिस्टर, सॉलिसिटर लोकांपैकीं अनेक लोक दर आठवड्यास होणाऱ्या घोड्याच्या शर्यतीच्या दिवशीं नागवले जाऊन कर्जबाजारी होतात. या मार्गाशिवाय दुसरा सोपा मार्ग म्हणजे सरकारी रोखे व कंपनीचे शेअर्स यांचे सट्टे करणें हा होय. या मार्गाचें अवलंबन करणारांत बॅरिस्टर, सॉलिसिटर, वकील

या वर्गांपैकीं गुजराथी, पार्शी, मुसलमान यांची संख्या अधिक असते महाराष्ट्रिय लोकांची संख्या म्हणण्यासारखी नसते आम्ही ज्या जिल्ह्यात वकिली करीत होतों, त्या जिल्ह्यात जिल्हाजज्ज म्हणून एका पारशी गृहस्थाची नेमणूक झाली. या जागेवर नेमणूक होण्यापूर्वी ते एका मोठ्या जिल्ह्याच्या शहरीं सरकारी वकील होते. वकिली करीत असता सट्टयाच्या पायीं बरेंच नुकसान येऊन त्याचेवर सट्टयाच्या व्यवहाराची अडत करणाऱ्या मुंबईच्या व्यापाऱ्याचा फार मोठया रकमेचा हुकुमनामा झाला त्या हुकुमनाम्याची रक्कम वसूल करण्याकरिता तो धुळ्यास आला व त्याची बरदास्त ठेवण्याकरिता जज्जसाहेबाना बराच खर्च करावा लागला. बरदास्तीचें काम करणें जज्जसाहेबांनीं नाझरकडे सोंपविलें होतें व त्याचेकडून वकील मंडळींत या व्यवहाराची माहिती प्रसृत झाली या पारशी न्यायाधिशाची बदली झाल्यावर त्याच मोठया शहरातील सरकारी वकिलाचें काम करणाऱ्या एका मुसलमान गृहस्थाची जिल्हा न्यायाधीश म्हणून नेमणूक झाली. हे गृहस्थ दिलदार वृत्तीचे असून प्रसगो पात्त वकिलमंडळींपैकीं कित्येकाना अल्पोपहाराकरिता आपल्या बगल्यावर बोलावीत व त्या प्रसगीं मनमोकळेपणानें वकिलीच्या धद्यातील अनुभव व अन्य मनोरंजक गोष्टी सागत व त्याविषयींची चर्चा करीत अशा प्रकारें या विषयाविषयीं त्याच्याशीं चर्चा चालली असता ते ज्या जिल्ह्याच्या शहरात सरकारी वकिली करीत होते, तेथील वकीलवर्गापैकीं कित्येकानीं वरील प्रकारचे सट्टे करून हात होरपळून घेतल्याचें त्यानीं सागितलें ही हकीकत सागितल्यावर त्याचाहि हात अशाच प्रकारच्या व्यवहारात होरपळला गेला असावा असा आम्हास सशय आला परतु तो आम्हीं व्यक्त केला नाहीं. सट्टयाच्या पायीं फार मोठी सपत्ति मुंबई शहरच्या एका नामाकित व अग्रगण्य बॅरिस्टरानें घालावल्याचें आमचे ऐकिवात आहे. अनेक वर्षे नामांकित बॅरिस्टर या नात्यानें त्यानीं अलोट सपत्ति मिळविली. परतु सट्टेबाजीच्या व्यसनामुळें एके काळीं त्याना भयकर नुकसान लागून त्याची सापत्तिक दृष्टया मोठी बिकट परिस्थिति झाली. अशा परिस्थितींत बॅरिस्टरीच्या धद्यातून निवृत्त होण्याचा समय आला असताहि त्याना तो धदा सोडणें अशक्य झालें निष्णात कायदेपडित अशी त्याची ख्याति असल्यामुळें व पक्षकाराचा त्याचेवर पूर्ण विश्वास असल्यामुळें त्यांनीं थोड्याच वर्षांत फार मोठी कमाई केली व त्याच्यावर आलेल्या बिकट परिस्थितींतून त्यांनीं आपली सुटका करून घेतली त्यांच्या ठिकाणीं असलेल्या कायद्याच्या नैपुण्यामुळें त्याना ही गोष्ट साध्य झाली परतु अन्य कोणा माणसाची अशा परिस्थितींत केविलवाणी स्थिति झाली असती हें सागणें नको

हिंदुस्थानातील मोठमोठया शहरच्या नामांकित वकिलानीं धंद्यांत मिळविलेल्या अपार सपत्तीपैकीं बऱ्याच सपत्तीचा विनियोग राष्ट्रकार्याप्रीत्यर्थ केल्याचीं कांहीं ठळक उदाहरणें प्रस्तुत स्थळीं नमूद करणें युक्त आहे इ. स १९०७ साली भरलेल्या सुरतेच्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष डॉ. रासबिहारी घोष हे बगालच्या कलकत्ता हायकोर्टातील एक नामांकित कायदेपडित होते, वकिलीच्या धद्यात त्यांनीं

अपार संपत्ति मिळविली. त्या संपत्तीपैकीं पंधरा लाख रुपये कलकत्ता युनिव्हर्सिटीला भौतिकशास्त्राच्या संशोधनार्थ त्यांनीं अर्पण केले. याशिवाय त्यांनीं त्यांच्या जन्मस्थानच्या शिवाच्या देवालयासहि एक मोठी देणगी दिली. याप्रमाणेंच प्रयाग शहरीं कै. पंडित मोतीलाल नेहरू यांनीं आपलें स्वत:चें राजवाड्यासारखें भव्य इमारत राष्ट्रीय सभेस अर्पण केली. प्रस्तुत काळीं राष्ट्रीय सभेची मुख्य कचेरी या त्यांच्या प्रासादांत स्थित झाली आहे. मुंबई शहरीं अपीलशाखेकडे वकिली करणारे एक नामांकित वकील कै. महादेव चिमणाजी आपटे या पुत्रहीन वकिलांनीं आपली सर्व संपत्ति मृत्युपत्र करून संस्कृत वाङ्मयातील सर्व प्रकारच्या नाना विषयांवरील ग्रंथांचें संशोधन, रक्षण व प्रकाशन यासाठीं दिली. आनंदाश्रम हें त्या संस्थेचें नांव असून त्यांचें जें राहतें शहर पुणें येथें या संस्थेची स्थापना केली आहे. गेलीं पन्नास साठ वर्षे या संस्थेनें अनेक ठिकाणाहून निरनिराळ्या विषयावरील संस्कृत ग्रंथ शोधून काढून या संस्थेंत त्यांचें रक्षण करून अनेक ग्रंथ छापून प्रसिद्ध केले आहेत. याशिवाय अगदीं अलीकडे डॉ. गौर या नांवाच्या मध्यप्रांतीय नामांकित कायदेपंडितानें तीस लाख रुपये मध्यप्रांतासाठीं स्वतंत्र विश्वविद्यालय स्थापन करण्याकरितां दिले आहेत. वैश्य वर्गापैकीं धनाढ्य लोकांनीं लोकोपयोगी संस्था स्थापन करण्यास्तव भरतखंडाच्या निरनिराळ्या प्रांतांत देणगीच्या रूपानें जें द्रव्य दिलें आहे, त्या मानानें वकील वर्गापैकीं वर नमूद केलेल्या लोकांनीं दिलेल्या द्रव्याचें प्रमाण फारच अल्प आहे.

## वकील व व्यसनें

वकीलवर्ग उदयास आल्यापासून अधिकार व संपत्ति या दोहोंचा लाभ समाजांतील अन्य लोकांपेक्षां या वर्गांतील लोकांस अधिक प्रमाणांत झाल्यामुळे समाजांतील अन्य वर्गांशीं बेपर्वाईनें वागण्याची व 'मनःपूत समाचरेत्' अशा प्रकारचें आचरण करण्याची प्रवृत्ति वकीलवर्गांत बरीच बोकाळली. पाश्चात्य शिक्षण घेऊन विश्वविद्यालयाची एल्एल्. बी. ची परीक्षा पास झालेल्या लोकांचा वकीलवर्गांत प्रवेश होण्यापूर्वीचा जो वकीलवर्ग होता त्यांतील लोकांपैकीं कित्येक लोकांना एक विशिष्ट प्रकारचें व्यसन असे. हें व्यसन म्हणजे बाहेरख्यालिपणाचें होय. तत्कालीन समाजांत या व्यसनामुळें सामान्य जनता वकीलवर्गांतील अशा लोकांस कमी प्रतीचे समजत नसे. मुंबई इलाख्यांतील एका विशिष्ट जिल्ह्यांत वकिलानें एखादें पात्र बाळगणें हें भूषणच समजलें जात असे, व त्या प्रांतांतील बहुतेक नामांकित वकिलांनीं रक्षा ठेवल्याचीं उदाहरणें आढळत. या व्यसनाशिवाय समाजांतील अन्य विवाहित स्त्रियांशीं दुराचारी वर्तन करणारे कांहीं वकील असत, पण त्यांच्याकडून होणाऱ्या अशा वर्तनाबद्दल त्यांना वठणीवर आणणें समाजांतील अन्य व्यक्तींस शक्य नसे, वकील हा जरी प्रत्यक्ष सरकारी अधिकारी नसला तरी कायद्याच्या ज्ञानामुळें

समाजातील अन्य लोकांवर त्याचा मोठा वचक असे. इंग्रजी शिक्षण संपादन करून विश्वविद्यालयीन एल्एल्. बी. परीक्षा पास होणाऱ्या वकिलाचा प्रवेश सन १८९० च्या सुमारास होऊं लागला. पाश्चात्य शिक्षणाबरोबर मद्यपानाचें व्यसन यांपैकीं कित्येकांना जडलें. मुंबई, पुणें अशासारख्या मोठमोठया शहरीं वकिली करणारांपैकीं कित्येक मादिरेचे भक्त बनले. या लोकांस हें व्यसन जरी जडलें, तरी पूर्व पिढींतील वेश्या ठेवण्याचें व्यसन या वर्गांतील लोकांपैकीं फार थोड्यांना लागलें. जिल्हा व तालुका कोर्टांतील या नवीन पिढींतील जे लोक वकिली करण्याकरितां स्थायिक झाले त्यांच्यापैकीं कित्येक या व्यसनानें पछाडलेले आढळत. या धंद्यांतील लोकांपैकीं कित्येकांस जरी या प्रकारचीं व्यसनें जडलीं असलीं, तरी सर्वसाधारणपणें सुशिक्षित तरुण पिढींपैकीं वकील वर्गांत प्रविष्ट झालेल्या लोकांत निर्व्यसनी लोकांचें प्रमाण बरेंच अधिक होतें, व प्रस्तुत काळींहि तें प्रमाण अधिकच दिसतें. सन १९२० सालापासून वकिलीच्या धंद्याची पीछेहाट होऊं लागल्यापासून वकिलवर्गांपैकीं बहुतेकांचें प्राप्तीचें प्रमाण फार कमी झालें. यामुळें वकिलास संसारप्रपंच चालविणें दिवसेंदिवस बिकट होत चाललें. अशा स्थितींत व्यसनाप्रीत्यर्थ पैसा दवडणें शक्य नसल्यामुळें व्यसनाधीन लोकांची संख्या फारच अल्प झाली, यांत कांहीं आश्चर्य नाहीं.

खादीचा प्रचार व प्रसार सन १९२० सालापासून सुरू झाला. त्यानंतर सर्वसाधारणपणें लोकसमाजांत पोषाख व त्याकरितां लागणारा कपडा यांत मोठें स्थित्यंतर घडून आलें. सन १८९० पूर्वी मराठी वकीलवर्गाची जी पिढी होती, त्या पिढींतील लोकांचा पोषाख पेशवेकालीन पोषाखाप्रमाणें असे. अंगांत पादरा शुभ्र बंदाचा लांब अंगरखा, नेसावयाचें धोतर व नागपुरी रेशीमकांठी उपरणें, डोक्याला लाल चंदेरी पागोटें असा असे. सन १८९० नंतर पदवीधर वकिलांचा प्रवेश वकिलवर्गांत होऊं लागला. ते प्रारंभीं विजार, बूट, पाटलोण व लहान पगडी परिधान करीत असत. विजार, पाटलोण घालणारा वकील हुशार व साहेबावर त्याचें वजन पडतें, अशी सामान्य लोकांची समजूत असे. व या समजुतीचा फायदा धंदेवाईक वकील या नात्यानें कांहीं वकील घेत असत. मुंबई हायकोर्टांत अपीलशाखेकडे काम करणारे वकील पूर्वीपासून विजार, पाटलोण परिधान करणारेच असत. हायकोर्टाच्या मोन्या न्यायाधिशांना विजारीऐवजीं धोतर परिधान करणारा वकील पसंत नसे, अशी एक समजूत त्या काळीं प्रचलित होती; व या कारणासाठीं हायकोर्टांतील सर्व वकील बूट-सुटांत वावरत असत. मोन्या न्यायाधिशांना हिंदुपद्धतीप्रमाणें कपाळास असलेलें गंध नापसंत असतें, अशी एक समजूत प्रचलित असल्यामुळें गंध लावणारे कांहीं वकील हायकोर्टांत जाण्यापूर्वी गंध पुसून टाकण्याची खबरदारी घेत. याप्रमाणें हायकोर्टांतील वकिलांच्या पोषाखाचे बाबतींत जें आम्ही नमूद केलें आहे, त्यास अपवादात्मक अशीं आम्हांस माहीत असलेलीं दोन उदाहरणें आम्ही नमूद करितों. या दोन वकिलांपैकीं एक गुजराथ प्रांतांतले व दुसरे कोंकण प्रांतांतले ब्राह्मण

गृहस्थ होते. यांचा रेशीमकाठी धोतरें नेसण्याचा प्रघात असे. पायांत जोड्याऐवजी बूट घालीत. गोऱ्या न्यायाधिशांच्या यासंबंधीच्या आवडीनिवडीची पर्वा न करितां त्यांनीं आपली पोशाखाची ही पद्धत कायम ठेविली. या पद्धतीमुळें त्यांच्या वकिलीच्या धंद्यावर अथवा कामकाजावर कांहीं अनिष्ट परिणाम घडला, असें झालें नाहीं.

तालुका व जिल्हा कोर्टांत तरुण पिढींतील धूटसूट घालणाऱ्या वकिलांचा अशा प्रकारचा शोक एक दोन वर्षांपेक्षां अधिक टिकत नसे, याचें कारण हवेची उष्णता व सूटबुटाचा पोशाख करण्यांत वाटणारा त्रास. यामुळें असा पोशाख करण्याच्या हौसेचा त्याग या वकिलांकडून फार थोड्या काळांत केला जात असे. सन १९०० सालापावेतों आम्ही ज्या जिल्ह्याच्या कोर्टांत वकिलीचा धंदा करीत होतों त्यांत धंदाचा पांढरा अंगरखा घालणारे पूर्व पिढींतील पांच दहा वकील होते. बाकीचे तरुण पिढींतील सर्व वकील गुंड्यांचा लांब काळा कोट, किरमिजी रंगाची रेशमी पगडी व उपरणें अशा प्रकारचा पोशाख करीत. एखाद्या महत्त्वाच्या फौजदारी अथवा दिवाणी कामांत मुंबईचा गोरा बॅरिस्टर पक्षकारानें जिल्हा कोर्टांत काम चालविण्याकरितां आणला कीं जुन्या पिढींतील त्या कामांतील नामांकित वकिलांच्या पोशाखांत बदल झाल्याचें दिसे. एतद्देशीय वहाणा जोड्याऐवजीं वकील पायमोजे व बूट घाली. हा फरक करण्याचें कारण गोऱ्या बॅरिस्टरला वकिलांच्या पायांतील वहाणा जोडा नापसंत असे अशी समजूत होय. बूट पाटलोण घालणारे पदवीधर वकील एखाद्या कामांत काम चालविण्यासाठीं गोरा बॅरिस्टर यावयाचा असला तर त्या दिवशीं न चुकतां सूटबुटांतच कोर्टांत येत. पोशाखांत हा बदल करण्याचें कारण म्हणजे गोऱ्या बॅरिस्टरला देशी पोशाख नापसंत असल्याकारणानें तो परिधान करावयाचा नाहीं हें होय. सूटबुटाचा पोशाख करणाऱ्या वकिलांपैकीं कांहीं पगडीऐवजीं हॅट घालीत. याचें कारण हॅट घालणाऱ्या वकिलांचें वजन साहेबावर अधिक पडतें ही सामान्य लोकांची समजूत होय.

सन १९२० नंतर खादीचें साम्राज्य प्रस्थापित झाल्यावर जिल्हा व तालुका कोर्टांतील वकिलांच्या पोशाखांत फार मोठें स्थित्यंतर झालें. वकिलांच्या रेशमी पगड्या, जरीकांठी रुमाल हीं शिरस्त्राणें अस्त पावून त्यांची जागा खादीचे रुमाल, खादीच्या टोप्या यांनीं पटकाविली. खादीचें साम्राज्य सुरू झाल्यापासून बैलास असें वाटण्या पदस्थाचें बुजगावणें असतें, त्याप्रमाणें कित्येक गोऱ्या अधिकाऱ्यांना खादीटोपी भासूं लागली. मुंबई प्रांतांतील कांहीं जिल्ह्यांत वकिलांनीं खादीचे रुमाल व खादीटोपी परिधान करून कोर्टासमोर काम चालविण्याचा प्रघात सुरू केला. व वकिलांचे पोशाखावर विशिष्ट प्रकारचें नियंत्रण असावें, अशाविषयीं हायकोर्टाच्या न्यायाधिशांत विचारविनिमय सुरू झाला. याचें पर्यवसान हायकोर्टाची ॲडव्होकेट ही पदवी धारण करणाऱ्या मुंबई हायकोर्टांत व मुंबई बाहेरील अन्य ठिकाणच्या कोर्टांत काम करणाऱ्या वकिलांनीं एक विशिष्ट प्रकारचा काळा डगला ( गाउन ) नेहमींच्या पोशाखावर परिधान करावा, असें ठरविण्यांत झालें. जिल्हा व तालुका कोर्टांतील

वकिलांच्या पोशाकाबाबत प्रस्तुत विशिष्ट प्रकारचे ठरविलेले असे कांहींच निर्बंध नाहींत व जो तो वकील आपल्या आवडीप्रमाणें पोशाक करून कोर्टापुढें काम चालवितो इतकें मात्र खरें कीं, एकेकाळचा वकीलवर्गांतील लोकांचा पोशाकाचा डामडौल नाहींसा झाला असून त्याऐवजीं साधेपणा अस्तित्वांत आला आहे

---

प्रकरण १० वें

## वकिलीच्या धंद्यांतील

# स्वातंत्र्याच्या अवास्तव कल्पना

वकिलीची परीक्षा देऊन वकिलीच्या धंद्यात जे लोक शिरतात, त्यांना या धंद्याच्या अंतरस्वरूपाची म्हणण्यासारखी कांहीं एक माहिती नसते. कोणाची तांबेदारी न करितां बऱ्या प्रकारचें द्रव्य प्राप्त करून देणारा हा एक धंदा आहे, अशा समजुतीनें बहुतेक सर्व तरुण या धंद्यांत शिरतात. सरकारी नोकरींत जशा प्रकारची तांबेदारी नोकरी करणारास असते व त्याचेवर ज्या प्रकारचीं बंधनें असतात तशीं बंधनें हा धंदा करणारावर नाहींत, अशी सर्वसाधारण समजूत आहे. ही समजूत अगदींच निराधार आहे असें नाहीं ज्या प्रकारची तांबेदारी व बंधनें सरकारी नोकरींत आहेत तशीं जरी या धंद्यात नसलीं तरी या धंद्यात पडलेले जे श्रेष्ठ व नामांकित धंदा करणारे वकील आहेत, त्याशिवाय अन्य लोकांची या बाबतीपुरती स्थिति स्पृहणीय नाहीं न्यायालयांत वकिलास वक्तशीर हजर राहून भिकारड्या दाव्याचे कामाकरितां पांचसहा तास फुकट कोर्टांत रखडत बसावें लागतें व ही गोष्ट सरकारी अगर खाजगी कचेरींतील नोकरी करणाऱ्या नोकरापेक्षां अत्यंत त्रासदायक अशी आहे. चारचार पांचपांच तास एखाद्या कामांत गुंतलेल्या मनुष्याची स्थिति, कामावांचून फुकट रखडणाऱ्या माणसाच्या स्थितीपेक्षां कोणासहि चांगलीच वाटली पाहिजे. या दृष्टीनें विचार केला असतां वकिलीच्या धंद्याचें स्वातंत्र्य कोणासहि प्रिय वाटणार नाहीं. वकिलीचा धंदा करणाऱ्या ज्या माणसास भरपूर काम मिळूं लागतें, पण त्याचें स्वातंत्र्य नाममात्रच असतें तो त्याच्या पक्षकाराचा दासानुदास बनतो त्याचे-भोंवतीं पक्षकारांचा नेहमीं गराडा पडलेला असतो व त्याला तोंडाची बटबट सतत करावी लागते. कित्येक वेळां वकील बहिर्दिशेस निघाले तरी त्यांच्याबरोबर पक्षकार खटल्याविषयीं बोलत बोलत जाण्यास कमी करीत नाहींत. अशा प्रकारचें वकिलीचें

स्वातंत्र्य म्हणजे पारतंत्र्यापेक्षा दुर्धर आहे, असें म्हणावें लागतें. थोडक्यात सांगावयाचें म्हणजे वकिलीचा धंदा स्वतंत्र आहे, असें विधान करणें म्हणजे निव्वळ थोतांड आहे.

## हिंदी राष्ट्रीय सभा व वकीलवर्ग

वकिलीच्या धंद्याच्या स्वातंत्र्याचे प्रतिपादनाचे बाबतींत एक मुद्दा पुढें मांडतां येण्यासारखा आहे. तो म्हणजे सरकारी नोकरांवर राजकारणाचे बाबतींत जीं बंधनें आहेत तशा प्रकारचीं बंधनें वकिलांवर नाहींत व या बाबतींत वकिलांचें स्वातंत्र्य मान्य करणें प्राप्त आहे. १८५७ सालचें स्वातंत्र्ययुद्ध (इंग्रज त्याला बंड म्हणतात) व मुंबई इलाख्यांत वासुदेव बळवंत फडके यांचें बंड हीं दोन मोठीं राजकीय उलथापालथींचीं आंदोलनें झालीं. या आंदोलनांशीं वकीलवर्गाचा काडीएक संबंध नव्हता. कॉंग्रेसची चळवळ सुरू करणारे हिंदी राजकीय पुढारी यांना ही चळवळ करण्यास उत्तेजन देणारे उदारमतवादी इंग्रज होते व प्रथमपासूनच कॉंग्रेसची चळवळ इंग्रजसरकारविरोधी जरी असली, तथापि ती सनदशीर मानली गेली व या चळवळींत प्रत्यक्ष सरकारी नोकरी करणाराशिवाय अन्य कोणाहि हिंदी माणसानें भाग घेणें कायद्याविरुद्ध समजलें जात नसे.

जरी कॉंग्रेसची राजकीय चळवळ इंग्रजी राज्याच्या विरुद्ध होती, तरी तिचा इंग्रज राज्यकर्त्यांनीं, बिरुद्ध न टाकण्याच्या इंगिताचा खुलासा प्रस्तुत स्थळीं थोडक्यात करितों.

हिंदुस्थान देशासारख्या अफाट देशात सत्तावन्न सालच्या बंडासारखे उत्पात न होऊं देता सुरळीतपणें राज्य करता येण्यासाठीच हिंदी प्रजेचीं अंतःकरणें इंग्रज राज्यकर्त्यांविषयीं कोणत्या प्रकारचीं आहेत, याविषयींची खरी माहिती इंग्रजांना मिळाविणें प्राप्त होतें. इंग्रज राज्यकर्त्यांचें प्रजेतील हालचालीबद्दल गुप्त माहिती देणारें गुप्त पोलिसखातें राज्यकर्त्यांनीं सुरू केलें होतें; परंतु या खात्याकडून मिळणारी माहिती म्हणण्यासारखी विपुल व विश्वसनीय नसे. हिंदी प्रजेच्या अंतःकरणात इंग्रज राज्यकर्त्यांविषयीं खरी भावना कोणत्या प्रकारची आहे, व हिंदी प्रजेच्या राजकीय आकांक्षा कोणत्या स्वरूपाच्या आहेत, याविषयींची भरपूर व विश्वसनीय माहिती १८५७ सालच्या प्रचंड उत्पातापूर्वी इंग्रज राज्यकर्त्यांस मिळण्याचें बासेरीज काडीएक साधन उपलब्ध नव्हतें व इंग्रज राज्यकर्त्यांच्या बेसावध स्थितींत बंडानें संकट त्यांच्यावर आलें. अशा प्रकारची संकटाची पुनरावृत्ति होऊं नये म्हणून कोणत्या प्रकारची तरतूद करणें अवश्य आहे, याविषयींचा विचारविनिमय इंग्रज मुत्सद्यांनीं करून प्रजेचीं गाऱ्हाणीं सरकारपुढें सनदशीर रीतीनें मांडून त्यांचें निवारण करून घेण्यासाठीच कॉंग्रेससारखी संस्था सुरू केल्यास ती उपयुक्त ठरेल असें त्यांना वाटलें. ही संस्था कोणाकडून कशा रीतीनें सुरू

करावयाची याविषयींचा सल्ला हिंदी सुशिक्षित लोकांच्या राजकीय आकांक्षाविषयीं सहानुभूति बाळगणाऱ्या सेवानिवृत्त झालेल्या बड्या इंग्रज अधिका-यांनीं हिंदी सुशिक्षित लोकांच्या पुढाऱ्यास दिला. या सल्ल्यानुसार सालोसाल राष्ट्रीय सभेचीं अधिवेशनें भरूं लागलीं व राष्ट्रीय सभेच्या या चळवळींत वकीलवर्गापैकीं बरेच लोक भाग घेऊं लागले.

सन १८९० पासून हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांतील वकीलवर्गाची भरभराट व चलती सुरू झाली होती व निरनिराळ्या प्रांतांत वकिलीचा धंदा करणारे इंग्रजी भाषा बोलण्यांत नैपुण्य संपादिलेले कित्येक लोक पुढें आले होते अशा प्रकारच्या वकीलवर्गापैकीं बहुतेक प्रांतांतील नामांकित वकील कॉंग्रेसच्या राजकीय चळवळींत प्रामुख्यानें भाग घेऊं लागले. मोठमोठ्या शहरांतील नामांकित वकिलांप्रमाणें जिल्हा व तालुका कोर्टांतील वकिलीच्या धंद्यांत पुढें आलेले वकील देखील कॉंग्रेसचे चळवळींत शामील झाले. सन १८९० पासून तों १९२० सालापर्यंत कॉंग्रेसची चळवळ प्रामुख्यानें व प्राधान्येंकरून नामांकित वकिलांनीं चालविली. आजपावेतों झालेल्या कॉंग्रेसच्या अध्यक्षांची यादी तपासली तर शेंकडा ७५ अध्यक्ष नामांकित वकील असल्याचें आढळून येईल. अशा प्रकारें वकिलीच्या धंद्यांतील स्वातंत्र्याचा उपयोग कॉंग्रेसच्या राजकीय चळवळीस उपकारक झाला. सालदरसाल होणाऱ्या कॉंग्रेसच्या अधिवेशनास प्रतिनिधि म्हणून जाणाऱ्या लोकांपैकीं बहुसंख्य वकील असत. परंतु या ठिकाणीं ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं अंतःकरणपूर्वक देशाची राजकीय प्रगति करण्यास्तव शरीरानें व द्रव्यानें झीज सोसणारे असे फार थोडे असत. तालुक्याच्या व जिल्ह्याच्या ठिकाणीं राहणाऱ्या वकिलांपैकीं कित्येक सांपत्तिक दृष्ट्या बऱ्या प्रकारचे असल्याकारणानें हिंदुस्थानांतील निरनिराळे देश पाहणें व त्याबरोबरच कॉंग्रेसचे प्रतिनिधि म्हणून हजर राहणें या गोष्टी एका दगडानें दोन पक्षी मारणें या पद्धतीनें करीत असत. प्रतिनिधि म्हणून निवडून घेण्याची नागरिकांची जाहीर सभा अगर वकील मंडळींची सभा भरविण्यांत न येतां कोर्टांतील वकिलांच्या खाजगी बैठकींत कोणाकोणा वकिलाचा कोणत्या प्रदेशांत प्रवास करण्याचा विचार आहे, याचा पूसतपास होऊन ज्या कोणी वकिलानें प्रवास करण्याचा बेत ठरविला असेल त्याचें नांव वर्तमानपत्रांत कॉंग्रेसचा निवडलेला प्रतिनिधि म्हणून जाहीर करावयाचें असा परिपाठ होता. आम्ही ज्या शहरीं वकिली करितों त्या शहरांतील आमच्या वकील व्यवसायी बंधूंपैकीं एक गृहस्थ अत्यंत वद्रू व कोणत्याहि सार्वजनिक कार्याकरितां जवळ द्रव्यसंचय बऱ्यापैकीं असून, एक छदामहि खर्च करण्यास तयार नव्हते. कॉंग्रेसच्या अधिवेशनास जाण्याचा विचार कोणाचा आहे याची चर्चा वकीलमंडळींत सुरू झाली; तेव्हां हे गृहस्थ यंदा कॉंग्रेसचें अधिवेशन कलकत्ता शहरीं व्हावयाचें आहे व कॉंग्रेसचा प्रतिनिधि म्हणून मी या अधिवेशनास हजर राहणार आहे, असें त्यांनीं सांगितलें. कलकत्याचा प्रवास करावयाचा म्हणजे रेल्वेभाडें व अन्य खर्च मिळून सुमारें दीडदोनशें रुपये येणार, ही गोष्ट लक्षांत घेऊन तेथें उप

स्थित असलेल्या वकिलमंडळींपैकी कित्येकांना ही गोष्ट या गृहस्थाकडून होणार नाहीं व तो गृहस्थ कलकत्त्याच्या अधिवेशनास हजर राहणार नाहीं अशी खात्री वाटली व तेथें उपस्थित असलेल्या एका सधन व पोक्त पुढारी वकिलापैकीं एकानें असें सांगितलें कीं हे गृहस्थ कलकत्त्याच्या कॉंग्रेसच्या अधिवेशनास प्रतिनिधि म्हणून गेले तर ते परत आल्यावर मी सर्व वकील वर्गास पंचपक्वान्नाची मेजवानी देईन. चमत्कार असा झाला कीं, कॉंग्रेसच्या अधिवेशनापूर्वी प्रवासाची तयारी करून हे गृहस्थ त्या अधिवेशनास प्रतिनिधि म्हणून हजर राहिले. परत आल्यावर दिलेल्या वचनाप्रमाणें वकिलमजकूर यांनीं पंचपक्वान्नाची मेजवानी दिली.

आतापावेतों दर्शविल्याप्रमाणें हिंदुस्थानातील निरनिराळ्या प्रांतातील वकिल-वर्गापैकीं नामांकित वकिलांनीं कॉंग्रेसच्या राजकीय चळवळींत भाग घेऊन स्वतःच्या स्वार्थ कसा साधला यांचेंहि दिग्दर्शन करणें अवश्य आहे. राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष या नात्यानें जहाल भाषणें करणाऱ्या नामांकित व्यक्तीस कॉंग्रेसमधून फोडून आपल्या बाजूस आणण्याची इंग्रज सरकारनें एक युक्ति योजली ही युक्ति म्हणजे हायकोर्टातील न्यायाधिशाचे जागीं त्याची नेमणूक करावयाची ही होय. अशा प्रकारचीं दोनतीन उदाहरणें मुंबई प्रांतातील राजकीय चळवळींत भाग घेणाऱ्या दोनतीन नामांकित व्यक्तींचीं आढळतात. बंगाल प्रांतातील एका कॉंग्रेसच्या राजकीय चळवळींत भाग घेणाऱ्या एका नामांकित बॅरिस्टरची हिंदुस्थान सरकारच्या लॉ मेंबर म्हणून प्रथम नेमणूक करून त्यानंतर त्याच गृहस्थाची प्रांताचा गव्हर्नर म्हणून नेमणूक केल्याचें उदाहरण आहे. जिल्हा व तालुका कोर्टांत गव्हर्मेंट प्लीडर व पब्लिक प्रॉसिक्यूटर या जागांवर सरकारच्या विश्वासातील गृहस्थाची नेमणूक करावयाची असें प्रथमपासून मुंबई सरकारचें धोरण होतें. राष्ट्रीय सभेच्या राजकीय चळवळीचा विकास होत जाऊन ती कांहीं वर्षांनंतर प्रभावशाली झाली. तेव्हा या सभेंत दोन पक्ष उदयास आले, एक नेमस्त व दुसरा जहाल. जहाल पक्षांतील वकिलांवर मुंबई सरकारची खप्पा मर्जी होती नेमस्तपक्षाचे लोक सरकारास मान्य वाटत व जिल्हा व तालुका कोर्टांतील गव्हर्मेंट प्लीडर व पब्लिक प्रॉसिक्यूटरच्या जागा नेमस्तपक्षातील वकील लोकांस देण्यात येत असत. अन्य सरकारी अधिकाऱ्याप्रमाणें संपूर्णपणें सरकारी तंत्रास अनुसरून या वकिलांना वागणें जरी अवश्य नव्हतें, तथापि हे लोक स्वतःस संपूर्ण-पणें सरकारच्या तंत्र्यातील नोकर समजून वागत असत. जिल्ह्याच्या कलेक्टर व डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांच्या शिफारशीनें या जागांवर नेमणुकी होत. व हे लोक कलेक्टर व डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांचे ताबेदार असत प्रसंगोपात् या लोकांना डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटच्या भेटीगाठी घ्याव्या लागत. अशा तऱ्हेच्या भेटीगाठींत गप्पा-गोष्टी करतांना जिल्ह्यातील राजकीय चळवळ करणाऱ्या वकिलांची व अन्य लोकांची माहिती करून घेण्याची डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटची पद्धत असे. सरकारी अधिकाऱ्यांची मर्जी संपादन करणारे कित्येक नेमस्त वकील राजकीय चळवळीसंबंधीं खोट्या-नाट्या सुगाव्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यास सांगण्यास कमी करीत नसत. वकिलवर्गा-

पैकीं कित्येकांनीं अशा तऱ्हेचें वर्तन करून आपला स्वार्थ भरपूरपणें साधून घेतल्या-चीं कांहीं उदाहरणें घडलेलीं आहेत. वकिलीचा धंदा करण्याकरितां वकिलवर्गांत प्रवेश करणाऱ्या तरुण व होतकरू गृहस्थास दोन गोष्टींचें आमीष त्याचेपुढें असल्या कारणानें राजकीय चळवळीचे बाबतींत त्याला जपून वागण्याची आवश्यकता वाटत असे. आमीष म्हणजे मुख्य अगर दुय्यम सरकारी वकिलाची जागा प्राप्त होणें हें एक आमीष व तें साध्य करण्याकरितां राजकीय बाबतींत उदासीन वृत्तीनें वागावयाचें असें धोरण कित्येक वकील स्वीकारीत. दुसरें न्यायाधिशाची जागा तीस वर्षें वयाच्या आतील एल्एल्. बी. वकिलाची न्यायाधिशाच्या जागेवर नेमणूक करण्याचा प्रघात अस्तित्वांत आहे या प्रघातान्वयें ही जागा मिळण्याचा संभव न दवडण्या-स्तव कित्येक तरुण वकील राजकीय चळवळीपासून अलिप्त राहत असत. न्याया-धिशाची जागा मिळविण्याकरितां एखाद्या एल्एल्. बी. पास झालेल्या वकिलाचा अर्ज सरकारकडे गेल्यावर प्रथम तो अर्ज गुप्त पोलिसखात्याकडे पाठवून त्या उमेदवारा-विषयीं माहिती मिळविण्याचा प्रघात अस्तित्वांत आहे. गुप्त पोलीस अधिकाऱ्याकडे हें चौकशीचें काम आलें म्हणजे गावांतील दोनतीन प्रतिष्ठित गृहस्थाच्या भेटी घेऊन तो त्या उमेदवाराविषयींची माहिती मिळवितो. अशी माहिती मिळविण्याकरितां कांहीं फाजील राजनिष्ठ लोकांची गुप्त पोलिसांशीं भेट घेतली तर असे लोक कित्येक वेळां खोट्या-नाट्या तिखटमीठ लाविलेल्या गोष्टी या उमेदवाराविषयीं सांगण्यास कमी करीत नाहींत. अशा एखाद्या राजकीय चळवळीच्या सभेंत उपस्थित राहून जहाल भाषण केलें तर त्याची शिफारस होणें अशक्य होत असे. अशा सभेस नुसत्या हजर राहण्या-नेंहि तो उमेदवार नालायक ठरत असे. उमेदवाराविषयीं माहिती मिळविण्याच्या या पद्धतीमुळें न्यायाधिशाची जागा मिळविण्याची लालसा बाळगणाऱ्या तरुण होत-करू वकिलास राजकीय चळवळीपासून पूर्णपणें अलिप्त राहणें भाग पडत असे. सालोसाल सरकारी वकील अगर न्यायाधीशांच्या नेमणुका फार मोठ्या प्रमाणात केल्या जाणें संभवनीय नव्हतें. एखादी दुसरी जागा रिकामी झाली तर त्या जागेवर नेमणूक करण्याचा दोनतीन वर्षांनीं कधींतरी प्रश्न उपस्थित होत असे. तथापि असा प्रश्न उपस्थित होईल ते वेळीं आपल्या नेमणुकीस अडथळा येऊं नये म्हणून वकिलवर्गांपैकीं कित्येक लोक आशाळभूतपणें वरील पद्धतीनें वागत असत.

राष्ट्रीय सभेच्या राजकीय चळवळींत भाग घेणारे बहुसंख्य लोक तालुका, जिल्हा व हायकोर्टांतील वकील, बॅरिस्टर्स, सॉलिसिटर्स हे असतात, ही गोष्ट इंग्रज सरकारच्या निदर्शनास राष्ट्रीय सभेची स्थापना झाल्यानंतर थोड्याच काळांत आली. मुंबई इलाख्यांत सन १८९० सालानंतर राजकीय चळवळीचें पुढारीपण लोकमान्य टिळकांच्या हातीं आलें व त्यांनीं केसरीच्या द्वारां जहाल स्वरूपाच्या राजकीय चळ-वळीचा प्रचार सुरू केला. त्या काळीं मुंबई सरकारची राजकीय सूत्रें न्यूजंट, ली, वॉर्नर इत्यादि कट्टर साम्राज्यवादी इंग्रजांच्या हातीं होतीं व लो. टिळकांचा जहाल राजकीय प्रचार हाणून पाडण्याचा चंग त्यांनीं बांधला होता. सन १८९७ सालच्या

सुमारास रँड व आयर्स्ट यांच्या खुनामुळें, शिवाजी उत्सवांत झालेली भाषणें व त्याच सुमारास केसरींत प्रसिद्ध झालेले कांहीं लेख यांच्या आधारावर लोकमान्यांवर राजद्रोहाचा खटला करण्यांत येऊन त्यांना सक्तमजुरीची शिक्षा दिली गेली. तेव्हांपासून महाराष्ट्रांतील राजकीय चळवळ करणाऱ्या लोकांवर नवीन बंधनें व नियंत्रणें कोणत्या प्रकारचीं घालावींत याचा विचारविनिमय वडचा इंग्रज अधिकाऱ्यांच्या गोटांत सुरू झाला. त्या काळीं महाराष्ट्रांतील राजकीय चळवळींत भाग घेणारांत वकील हे प्रमुख होते. स्वतंत्र नागरिक या नात्यानें राजकीय चळवळींत भाग घेण्यास कोणताच प्रतिबंध नसल्यामुळें त्यांनीं या चळवळींत भाग घेणें साहजिक होतें. अशा प्रकारच्या या वकिलांच्या स्वातंत्र्यावर सरकारी नियंत्रण कोणत्या प्रकारचें घालतां येणें शक्य आहे याचा विचारविनिमय वरिष्ठ सरकारी अधिकाऱ्यांत होऊन, ही गोष्ट प्रत्येक जिल्ह्याच्या व तालुक्याच्या ठिकाणच्या वकिलीचा धंदा करणाऱ्या लोकांचीं विशिष्ट पद्धतीनें मंडळें स्थापन करून त्या मंडळांच्या नियमांत्वयें वकिलांच्या राजकीय वावर्तातील स्वातंत्र्यास आळा घालतां येणें शक्य आहे. असें दिसून आल्यावर आतां नमूद केल्याप्रमाणें वकिलीचा धंदा करणाऱ्या वकिलांचीं मंडळें स्थापन करण्याचा उपक्रम सुरू करावा असें धोरण वरिष्ठ सरकारी अधिकाऱ्यांनीं ठरविलें. या दृष्टीनें या जिल्ह्यांत जिल्हा कोर्टांतील वकिलांचें मंडळ स्थापन करण्याबाबत झालेल्या प्रयत्नांची व तदनुसार स्थापन करण्यांत आलेल्या या जिल्ह्यातील वकील मंडळाची माहिती पुढील भागांत दिली आहे.

---

प्रकरण ११ वें

# ४. वकिलीच्या धंद्यांतील कांहीं अनिष्ट अनुभव

सत्यासत्यतेची थोडीबहुत चाड बाळगणाऱ्या कोणत्याहि माणसास वकिलीच्या धंद्यांत शिरण्यापूर्वी ज्याची कल्पनाहि त्यास येणें शक्य नाहीं अशा प्रकारच्या पुढें दिलेल्या एका अनिष्ट गोष्टीचा, ज्या वकिलांची अत्यंत हुशार यशस्वी असल्याची प्रसिद्धि झाली आहे असे जिल्ह्यातील व तालुक्यातील थोडेफार वकील सोडून दिले तर बाकीच्यांना कटु अनुभव असल्याखेरीज राहात नाहीं. एखादा पक्षकार आपलें काम एखाद्या नामांकित वकिलाकडे देण्यास गेला तर तो वकील कामाचा मोबदला म्हणून जी रक्कम सांगेल ती देण्यास तो पक्षकार तयार होतो. वकिलानें सांगितलेल्या रकमेइतकी रक्कम न घेतां कमी रक्कम घ्यावी असें तो म्हणाल्यास ' तुझें काम मी घेत

नाहीं, आपलें काम द घेऊन चालता हो' असें तो वकील त्या पक्षकारास सांगतो. अखेर त्या पक्षकाराकडून सर्व रक्कम चुकती करून घेऊन त्या पक्षकाराचें काम तो वकील घेतो अशा पद्धतीनें कामाच्या मोबदल्याची रक्कम घेण्याची पद्धत नामांकित वकील आचारांत असल्यामुळें पक्षकाराकडून मिळण्याच्या आर्थिक मोबदल्याचे बाबतींत पक्षकाराशीं कोणत्याहि प्रकारची कटकट त्या वकिलास करावी लागत नाहीं. परंतु अशा प्रकारचे थोडे वकील सोडून दिले तर सर्वसाधारणपणें तालुका व जिल्हा कोर्टांतील वकिलांना त्यांच्या पक्षकाराकडून मिळावयाचा आर्थिक मोबदला दररोज खोट्यानाट्या थापा देऊन व असत्य भाषण करून काढावा लागतो. पक्षकाराचें नेहमींचें धोरण असें असतें कीं, अखेरपावेतों ठरलेल्या करारान्वयें वकिलास रक्कम देण्याची टाळाटाळ करावयाची, व जुळल्यास खटल्याचा अखेरनिकाल त्याचे-तर्फे न झाल्यास करारप्रमाणें ठरलेली रक्कम न देतां राहिलेली रक्कम बुडवावयाची. जिल्हा व तालुका कोर्टांतील वादात सामील असणाऱ्या पक्षकाराची सर्वसाधारण समजूत अशी असते कीं, वकील लोक त्यांना करावयास लागणाऱ्या कामाच्या मानानें अकारण भलताच आर्थिक मोबदला त्यांचेकडून घेतात. वास्तविक म्हणण्यासारखा आर्थिक मोबदला न घेता वकिलानें फुकट राबावें अशी यांपैकीं कांहीं लोकांची समजूत असते. जे अजाणते पक्षकार आहेत, त्यांची अशा प्रकारची समजूत घटकाभर क्षम्य समजण्यास हरकत नाहीं. परंतु सावकारी, व्यापार इत्यादि व्यवसाय करणाऱ्या पक्षकारांपैकीं कांहींची ही समजूत याच प्रकारची असते.

वकिलानें करावयाच्या कामाचा मोबदला म्हणून पक्षकाराकडून त्याला जें द्रव्य मिळावयाचें, त्या बाबतींत कोणत्याप्रकारची घासाघीस उभयतामध्यें सुरू असते, याचें दिग्दर्शन आम्ही जें केलें आहे, त्याचें अखेर पर्यवसान वादात वकिलास अपयश आल्यास पक्षकाराकडील मोबदल्याची रक्कम बुडण्यात होतें. अखेर चौकशी-नें तारखेपावेतों वकिलाच्या मोबदल्याची फारच थोडी रक्कम वकिलाच्या हातीं येते. याप्रमाणें पुरी रक्कम हातीं न आली तरी वकिलास त्या पक्षकाराचें काम चालविणें भाग पडतें. दाव्याचा निकाल विरुद्ध लागला, तर वकिलाची बाकी-ची रक्कम तो वकिलास देतो, असें सहसा घडत नाहीं. या कारणामुळें वकिलीच्या धंद्यात वकिलास दरअखेर बरीच तूट येते. पक्षकाराकडून वकिलास मिळणाऱ्या मोबदल्याचे बाबतींत हा जो प्रकार आम्ही वर्णन केला याची बाधा आम्ही ज्या जिल्ह्यांत वकिली करितो त्या जिल्ह्यातील वकिलास अन्य जिल्ह्यातील वकिलांपेक्षा अधिक होते. याचें कारण असें कीं, या जिल्ह्यांतील वकिलीचा धंदा म्हणजे वाण्या-च्या दुकानासारखा समजला जातो, व या जिल्ह्यात वकिलीचा धंदा करणारास वकिलीचें दुकान म्हणण्याचा प्रघात कांहीं थोड्या वर्षांपूर्वीपावेतों अस्तित्वांत होता. वाण्याच्या दुकान प्रमाणें दिवाळी वगैरे करणाऱ्या वकिलास कोर्ट-लवादवगैरेच्या बह्या ठाकोठीक ठेवाव्या लागत. पक्षकाराकडचें काम घेतलें म्हणजे त्या कामाची पुरी रक्कम पक्षकाराकडून घेण्याची पद्धत नसल्याकारणानें तो जी रक्कम देईल, ती जमा

करावयाची व जरूर तें काम कोर्टात चालू लागेल, तसतसें त्या कामासंबंधीं देणाऱ्या खर्चाच्या रकमा त्या पक्षकाराचे नांवें टाकावयाच्या. चौकशीअंतीं आग्रहाव असें समजलें आहे कीं, या जिल्ह्यांतच अशी पद्धत आहे. पन्नास वर्षांपूर्वीच्या अन्य जिल्ह्याच्या ठिकाणच्या एका नामांकित वकिलाची हकीकत आमचे कानांवर आली, ती येथें नमूद करण्यासारखी आहे. हे वकील अत्यंत साधे व निस्पृह वृत्तीचे होते. जिल्हा कोर्टांतील अपिलांची व पांच हजारांवरील स्पेशल दाव्यांची कामें ते घेत असत. आणा–पै–मुद्दां हिशेब करून पक्षकाराकडून वकीलपत्र घेतेवेळीं ते वकिलीची रकम घेत असत. अशा रीतीनें पक्षकाराकडून घेतलेल्या रकमा निरनिराळ्या पिशव्यांत ठेवून त्यांतील रकमेंतून त्या दाव्याचा अगर अपिलाचा खर्च करण्याचा त्यांचा प्रघात होता. या त्यांच्या विशिष्ट परिस्थितीच्या योगानें वकिलाच्या प्राप्तींत त्यांना तूट कधीं आली नाहीं. याप्रकारें पक्षकाराशीं पैशाचा व्यवहार करणारा वकील शें–पाचशेंत एखादा देखील आढळणें दुरापास्त आहे. पक्षकाराकडून कामाच्या मोबदल्याच्या मिळणाऱ्या द्रव्याचे बाबतींत वकिलांचें वर्तनहि म्हणण्यासारखें चांगल्या प्रकारचें क्वचित् असतें. प्रस्तुतच्या राजकीय घटनेअन्वयें अत्यंत उच्च दर्जाचें पद प्राप्त झालेल्या एका नामांकित वकिलांनीं त्यांच्या स्वत विषयींची जी हकीकत सांगितली, तशा प्रकारचें आचरण करणारा वकीलहि विरळाच आढळेल. एखाद्या धनाढ्य पक्षकारानें या वकिलांना मुंबईच्या एका बड्या न्यायपंडिताचा सल्ला घेण्याकरता आर्थिक मोबदला म्हणून कांहीं रकम दिली व त्याच वेळीं दुसऱ्या एका पक्षकारानें मुंबईच्या कायदेपंडिताचा सल्ला घेण्याचें काम त्यांचेकडे सोंपविलें व दोन्ही कामांत सल्ला घेण्याकरितां एक दिवस हे गृहस्थ मुंबईस गेले, तर सल्ला घेण्याकरिता मुंबईस एक अगर दोन रोजाचा जो मोबदला घेण्याची त्यांची वहिवाट होती, त्यापैकीं निमेनीम रकम दोघा पक्षकाराकडून घेण्याचा प्रघात त्यांनीं ठेविला व त्या हिशेबानें दोघा पक्षकाराकडील रकम जमा करून बाकीची रकम त्या पक्षकारास परत करावयाची असा निर्बंध ते पाळूं लागले. या प्रकारचें वर्तन करणारे कायदेपंडित आढळणें जवळजवळ दुरापास्तच समजलें पाहिजे. वकील व पक्षकारयांच्या दरम्यानच्या पैशाचे व्यवहाराचे बाबतींत सुधारणा होण्याचा एकच मार्ग म्हणजे वकिलाकडे कामें देणाऱ्या पक्षकाराच्या मनोवृत्तींत बदल झाला पाहिजे. वकील आपणाकडून फुकट पैसे लाटतात, अशी जी पक्षकारवर्गापैकीं बहुतेकांची समज आहे ती नष्ट झाली पाहिजे. त्या बरोबरच वकिलाशीं केलेल्या कराराप्रमाणें सर्व पैसे त्यास पावते करणें हें आपलें कर्तव्य आहे, अशी भावना पक्षकार लोकांत निर्माण झाली पाहिजे अशा प्रकारचा काळ कधीं उदयास येईल, तो येवो.

व्यापारी वर्गापैकीं दिवाणी कामांत वकिलास द्यावयाच्या आर्थिक मोबदल्याचे बाबतींत स्वत च्या मनांत एक निराळाच हिशेब करून त्याप्रमाणें त्यांना युक्त वाटेल तो मोबदला वकिलास देतात. सावकारी धंदा करणाऱ्या पक्षकाराचें असें म्हणणें असतें कीं, कोर्ट–फी स्टँप, प्रोसेस, भत्ता ही सर्व रकम माझ्या पदरची मला खर्च

करावी लागते व दाव्याचा निकाल लागल्यावर वजावणी करून माझ्या पदरात कधीं काळीं ही रक्कम पडते. या रकमेवर मला व्याज मिळत नाहीं. सबब हुकुमनाम्यात कोर्टानें जरी वकिली शेंकडा ३ आकारली असली, तरी तितकी रक्कम वकिलानें घेणें वाजवी नाहीं व कमी रक्कम घेऊन त्यानें काम करावें या विचारसरणीस अनुसरून मोठमोठे सावकार शेंकडा रुपया वकिली देऊन आपलीं कामें करून घेतात व दोन रुपये शेंकडा नफा सावकारी व्यवहाराच्या हुकुमनाम्यात वकिलास कायद्यानें देण्यात आलेल्या आर्थिक मोबदल्यापैकीं रक्कम स्वत:च्या पदरांत पाडून घेतात वकिलाची संख्या वाढती असल्यानें वकिलीचीं कामें मिळण्याची चढाओढ वकिलवर्गात सदासर्वकाळ सुरू असते. एखादा नवीन गरीब इसम वकील झाल्यावर त्याच्या चरितार्थाला लागणाऱ्या खर्चाइतकी रक्कम मिळविण्यासाठीं त्याला खटपट करणें प्राप्त होतें व ती यशस्वी करण्याचा एकच मार्ग म्हणजे वकिलीची रक्कम ज्या वकिलाच्या कामाचा जम बसला आहे, त्याच्यापेक्षा कमी घेणें, हा होय. अशा रीतीनें कमी आर्थिक मोबदला घेणाऱ्या वकिलाना पक्षकाराकडून पुरी रक्कम मिळते असें नाहीं. सालोसाल वकिलाची पक्षकाराकडे बाकी थकत जाते व ही बाकी वसूल करण्याकरितां खोट्यानाट्या थापा पक्षकारास देणें भाग पडतें. वकिलीच्या धंद्यात अशा प्रकारचा कटु अनुभव येतो, अशी कल्पना या धंद्यात शिरण्यापूर्वी असली, तर सत्यासत्यतेची थोडीबहुत चाड बाळगणारा इसम या धंद्यात शिरणार नाहीं.

मागें दर्शविल्याप्रमाणें या धंद्यात असत्याचा आश्रय करावा लागतो ही कल्पना या धंद्यात शिरण्यापूर्वी फार थोड्यांना असते. भारत सेवक गांधी यांनीं वकिलीच्या धंद्याबद्दलच्या त्यांच्या ज्या आठवणी लिहिल्या आहेत, त्यात " As a student I had heard that lawyer's profession is a lier's profession " असें नमूद केलें आहे. गांधी हे एका दिवाणाचे चिरंजीव असल्यामुळें त्यांच्याकडे येणाऱ्या जाणाऱ्या लोकांच्या भाषणात ही गोष्ट त्यांच्या कानावर येणें शक्य आहे. परंतु विद्यार्थिदशेंत ह्याची जाणीव कोणास सहसा होऊं शकत नाहीं.

पैशाच्या व्यवहाराबाबत वकिलाच्या प्रत्ययास येणाऱ्या असत्य बोलण्याच्या अनिष्ट प्रकाराचें दिग्दर्शन केल्यावर वकिलीच्या धंद्यात कराव्या लागणाऱ्या दुसऱ्या एका अनिष्ट प्रकाराचें दिग्दर्शन प्रस्तुत स्थळीं आम्ही करितों. गांधींनीं दक्षिण आफ्रिकेंत बॅरिस्टरीचा धंदा करीत असताना त्यांच्या धंद्याबाबत ज्या आठवणी लिहिल्या आहेत, त्यात एका महत्त्वाच्या मुद्याचा त्यांनी उल्लेख केला आहे. तो मुद्दा म्हणजे त्यांच्याकडे वकिलपत्र देण्याकरितां येणाऱ्या पक्षकाराचा वाद असत्यावर उभारलेला असला, तर अशा पक्षकाराचें वकिलपत्र घेऊन त्याचें काम चालविण्याचें ते साफ नाकारीत असत. प्रारंभीं गांधींनीं हा जो निर्बंध वकिलीच्या धंद्याचे बाबतींत पाळण्याचें ठरविलें, त्याच्या योगानें त्यांच्याकडे कित्येक पक्षकारांनीं आपलीं कामें दिलीं नाहींत व प्रारंभीं गांधींचें थोडेंबहुत नुकसान झालें. पण थोड्याच काळांत गांधींच्या या निर्बंधाची प्रसिद्धि होताच ज्या पक्षकाराचीं कामें सत्याचर आधारलेलीं

असत त्याच पक्षकारांची कामें गांधींकडे येऊं लागली व गांधींना कामाची.वाण कधींच भासली नाहीं. गांधींनी त्या प्रकारचा निर्बंध पाळला तशा प्रकारचा निर्बंध पाळणारा वकील अगर बॅरिस्टर दुर्मिळच म्हटला पाहिजे.

मुंबई इलाख्यांतील एका जिल्ह्याच्या शहरीं हा निर्बंध पाळणारे एक ब्राह्मण वकील होऊन गेले, यांची राहणी अत्यंत साधी असून ते जरी प्रार्थना समाजिस्ट होते, तरी त्यांचा आचारविचार एखाद्या कर्मठ ब्राह्मणाप्रमाणें असे. अशा प्रकारचा निर्बंध पाळणारा दुसरा कोणी वकील झाला असेल कीं नाहीं याची आम्हांस शंका आहे.

---

## प्रकरण १२ वें

## वकील वर्ग

## व

# हिंदी राजकीय चळवळ

हिंदुस्थान देशांतील राजकीय चळवळ करणारी राष्ट्रीय सभा मूळ कशी उदयास आली, कोणत्या हेतूनें कांहीं नामांकित इंग्रजांनीं त्या चळवळीस पाठिंबा दिला व त्या चळवळींत प्रारंभींच्या बराच काळपावेतों पुढाकार घेणारे लोक बहुतेक वकिलवर्गापैकीं कोणत्या कारणामुळें असत याचें दिग्दर्शन आम्हीं मागें केलेंच आहे. हिंदुस्थान देशांत बंडासारखे उत्पात न होता हिंदी प्रजेच्या तक्रारी, गाऱ्हाणीं व राजकीय आकांक्षा समजून घेऊन राज्यकारभारात हिंदी लोकांस पटतील असे योग्य ते फेरफार करावयाचे, या हेतूनें इंग्रज सरकारनें राष्ट्रीय सभेची राजकीय चळवळ दडपून टाकण्याचें प्रारंभीच्या काळात कधींच मनात आणलें नाहीं. राष्ट्रीय सभेचें हें कार्य सिद्ध करण्याची लायकी देशांतील वकील वर्गापैकीं नामांकित पुढाऱ्यामध्यें होती. या कारणामुळें राष्ट्रीय सभेच्या चळवळींत वकीलवर्गापैकीं नामांकित व्यक्तींना अग्रस्थान प्राप्त होऊन तें बरेंच काळपावेतों टिकलें. इंग्रज सरकारनें राष्ट्रीय सभेची राजकीय चळवळ आता दर्याविल्याप्रमाणें दडपण्याचा जरी प्रयत्न केला नाहीं तथापि भविष्य काळीं इंग्रजांच्या राजकीय सत्तेस ही चळवळ मारक झाल्याशिवाय राहणार नाहीं व या चळवळीचा अध्वर्युपणा वकिलवर्गातील नामांकित कायदेपंडितांकडे राहील ही भीति प्रथमपासूनच त्यांना वाटत होती व तीच अखेर खरी ठरली. मुंबई इलाखा व हिंदुस्थानांतील इतर प्रांत यांतील राष्ट्रीय सभेच्या राजकीय

चळवळींत भाग घेणारे बहुतेक सर्व वकील हिंदुस्थानच्या निरनिराळ्या प्रांतांत होते. वास्तव भाग घेणाऱ्या राष्ट्रीय सभेच्या राजकीय चळवळींत निरनिराळ्या प्रांतातील कायदेपंडितांचा उल्लेख करणें अप्रस्तुत होणार नाहीं.

मुंबई इलाखा :—फेरोजशहा मेथा, सर नारायण चंदावरकर, बद्रुद्दीन तय्यबजी, भुलाभाई देसाई, जीना, नामदार खेर, डॉ. आंबेडकर, डॉ. जयकर.

मद्रास :—सर सुब्रह्मण्य अय्यर, सर शिवस्वामी अय्यर, आनंदा चार्लू, सत्यमूर्ति, विजय राघवाचारियर, श्रीनिवास अय्यंगार, राजगोपालचार्य, सी. पी. रामस्वामी अय्यर.

यू. पी. :—पंडित अयोध्यानाथ, पंडित मदनमोहन मालवीय, पंडित मोतिलाल नेहरू, जवाहरलाल नेहरू, पंडित वल्लभ पंत.

बंगाल :—उमेशचंद्र बानर्जी, डॉ. घोष, बॅ. सी. आर्. दास, सेन गुप्त, लॉर्ड सिंह.

बिहार :—डॉ. बाबू राजेंद्रप्रसाद, सच्चिदानंद सिंह,

वऱ्हाड :—सर मोरोपंत जोशी, बॅ. मोरोपंत अभ्यंकर, दादासाहेब खापर्डे, लोकनायक अणे, बॅ. रामराव देशमुख, पंजाबराव देशमुख.

पंजाब :—लाला लजपतराय, लाला हरकिसनदास, लाला धुनीचंद, रामभुजदत्त चौधरी.

नामांकित कायदेपंडित होते. प्रस्तुत मुद्याची चर्चा करीत असतां हिंदुस्थानांतील वकिलवर्गापैकीं राजकीय चळवळींत ठळक अशी विशिष्ट प्रकारची कामगिरी ज्यांनी केली, त्यांच्या नांवाचा उल्लेख करणें अगत्याचें आहे. गत झालेल्या व्यक्तींपैकीं कै. श्यामजी कृष्णवर्मा यांचें मात्र हिंदी राजकीय चळवळींत पुढाकार घेणारे म्हणून ठळकपणें नमूद करणें जरूर आहे. हे गृहस्थ गुजराथ प्रांतातील ब्राह्मण होते. कै. रावबहादुर गोपाळराव हरी देशमुख इंग्रज सरकाराविषयीं अत्यंत राजनिष्ठ म्हणून प्रख्यात असलेले सारा वर्षे अहमदाबाद येथें डिस्ट्रिक्ट आणि सेशन जज्ज होते. या हुद्यावर तेथें असतांना श्यामजी कृष्णवर्मा या तरुण विद्यार्थ्याचा त्यांच्याशीं परिचय झाला व कायद्याच्या अभ्यासासाठीं विलायतेस जाण्याची त्यानें रावबहादुरापाशीं आपली इच्छा प्रदर्शित केली. तेव्हां त्या काळीं कच्छ संस्थानाच्या मनुभाई या नांवाच्या दिवाणाकडून कांहीं आर्थिक मदत त्या प्रांतांतील तो रहिवासी असल्याकारणानें मिळवून दिली व रावबहादुरांचे इंग्लंडमध्यें असलेले परिचित डॉ. मोनियर विल्यम्स यांना श्यामजी कृष्ण वर्मा संबंधानें एक शिफारसपत्र दिलें. या पत्रांत श्यामजी कृष्णवर्मा यांची इच्छा कायद्याचा अभ्यास करून बॅरिस्टरची परीक्षा द्यावी अशी आहे व या कामीं या तरुणास आपण सर्व प्रकारची मदत करावी असें त्यांनीं लिहिलें होतें. कायद्याचा अभ्यास केल्यानंतर श्यामजी कृष्ण-

वर्मा विलायतेहून परत येऊन थोडा काल हिंदुस्थानात राहून परत युरोपांत गेले व तेथें त्यांनीं हिंदुस्थानात राजकीय क्रांति घडवून आणण्याचे प्रयत्न सुरू केले व तत्प्रीत्यर्थ त्यांनीं द्रव्यहि पुष्कळ खर्चिलें. एक अत्यंत राजनिष्ठ गृहस्थ म्हणजे रा. ब. देशमुख यांच्याकडून श्यामजी कृष्णवर्मांसारखा इंग्रजी राज्याचा कट्टर शत्रु निर्माण व्हावा ही एक विचित्र घटनाच होय. इंग्लंडात श्यामजी कृष्णवर्मा राहत असता हिंदुस्थानात राजकीय क्रांति घडवून आणण्याचे त्यांचे प्रयत्न इम्रजास इतके असह्य झाले कीं, त्यांचा प्रतिकार करण्यास्तव कडक उपायाची योजना करावी असा त्यांचा विचार ठरला. याविषयींची माहिती श्यामजी कृष्णवर्मा यांना होताच त्यांनीं इंग्लंड देशाचा त्याग करून फ्रान्सचा आश्रय केला व तेथेंहि राहणें दुर्घट झाल्यानें त्यांनीं स्वित्झर्लंड देशाचा कायमचा आश्रय घेतला व अखेरपावेतों हिंदुस्थानात राजकीय क्रांति घडवून आणण्याचे अविश्रांत परिश्रम केले. हिंदुस्थानांतून इंग्लंड देशात कायद्याचें व अन्य विषयाचें शिक्षण घेण्याकरिता कित्येक विद्यार्थी सालोसाल विलायतेस जातात. अशी विद्यार्थ्यांची राहण्याची व जेवणाखाण्याची सोय करण्यास्तव त्यांनीं 'इंडिया हाऊस' या नावाची एक संस्था स्थापन केली. सुरुवातीस बाह्यात्कारी ही संस्था या हेतुस्तव काढण्यात आली आहे असा देखावा करण्यात आला. वस्तुतः या संस्थेत दाखल झालेल्या हिंदी विद्यार्थ्यांची मनें हिंदुस्थानास स्वातंत्र्य प्राप्त करून देऊन स्वराज्याची स्थापना करण्याचे कामीं प्रवृत्त करणें हें मुख्य ध्येय होतें. थोड्याच दिवसात संस्थेच्या या मुख्य ध्येयाचा व त्या ध्येयास्तव या संस्थेतील विद्यार्थ्यांस देण्यात येणाऱ्या शिक्षणाचा सुगावा इंग्लंडातील स्कॉटलंड यार्ड या नावानें प्रसिद्ध असलेल्या गुप्तपोलीस संस्थेस लागला व तेव्हापासून या संस्थेतील विद्यार्थ्यांवर पोलिसांची नजर ठेवण्यात येऊं लागली. हिंदुस्थानांतील प्रसिद्ध क्रांतिवीर विनायक दामोदर सावरकर हे कायदेशिक्षण घेऊन बॅरिस्टरची परीक्षा देण्याकरिता इंग्लंडात गेल्यावर ते या संस्थेत दाखल झाले. थोडक्याच कालात हिंदुस्थानांतून जाण्यापूर्वी त्यांचें ध्येय हिंदुस्थानास स्वातंत्र्य व स्वराज्यप्राप्ति करून देणें हेंच असल्यामुळें व याशिवाय वक्तृत्वकला, भावनाप्रधान मनोवृत्ति हे गुण त्यांच्या ठिकाणीं उत्कटत्वानें असल्यामुळें थोड्याच काळांत इंडिया हाऊसमध्यें त्यांना महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें व श्यामजी कृष्णवर्मांचे सहकारी मित्र बनले. सावरकरांची बॅरिस्टरची परीक्षा पास झाल्यानंतरहि ते कांहीं वर्षे लंडन शहरीं इंडिया हाऊसमध्येंच राहत असत. या दरम्यानच्या काळात नाशिक येथें जॅक्सन कलेक्टरचा खून झाला व खून करणारांपैकीं हे एक आहेत असा सरकारास संशय असल्याकारणानें हिंदुस्थानात परत येऊन बॅरिस्टरचा धंदा करणें त्यांना अशक्य झालें. यानंतरच्या त्यांच्या चरित्रातील घटना सर्वश्रुत असल्यानें आम्ही त्यांचा उल्लेख प्रस्तुत स्थळीं करीत नाहीं. अंदमान बेटांतून दोन काळ्या पाण्याच्या शिक्षेपैकीं शिक्षेची जितकीं वर्षे त्यांनीं भोगलीं होतीं तीं वजा जाता उरलेल्या शिक्षेची माफी कशी मिळाली, नंतर त्यांना हिंदुस्थानात येण्याची परवानगी मिळून त्यांच्यावर कोणते निर्बंध घालून कांहीं वर्षे रत्ना-

गिरीष त्यांना राहावें लागून अखेर सर्व निर्वेधातून मुक्त होऊन मुंबई शहरीं ते वास्तव्य करूं लागून हिंदुमहासभेचें पुढारीपण त्यांना कसें प्राप्त झालें व त्यान त्यांनीं कोणत्या प्रकारची कामगिरी केली त्याचें विवेचन करण्याची आवश्यकता येथें नाहीं. बॅरिस्टर सावरकरांच्याप्रमाणेंच विलायतेस कायद्याचा अभ्यास करून बॅरिस्टर झालेले व हिंदी राजकारणात सर्वश्रेष्ठ स्थान प्राप्त करून घेतलेले कायदेपंडित भारतसेवक गांधी हे होत. श्यामजी कृष्णवर्म्यानंतर व सावरकरांच्यापूर्वी गांधी विलायतेला कायद्याचा अभ्यास करण्यासाठीं गेले. काठेवाडातील एका संस्थानच्या दिवाणपदावर यांचे वडील होते. संपत्ति, अधिकार यांचा लाभ त्यांना प्राप्त झाला असल्यामुळें गांधींना विलायतेस कायद्याचें शिक्षण घेणें सुलभ गेलें. विलायतेस गेल्यावर त्या काळच्या समजुती-प्रमाणें पोषाक, आहारविहार इत्यादि संबंधाच्या सर्व ढंगाचा गांधींनीं अनुभव घेतला. इंग्लिश जंटलमनला जे अनेक गुण संपादन करावे लागतात, त्यात इंग्रज युवतीबरोबर नाचणें हा एक अवश्य गुण संपादन करावा लागतो व हा गुण प्राप्त करून घेण्याकरिताहि गांधींनीं प्रयत्न केला. अखेर इ. स. १८९२ त बॅरिस्टरीची परीक्षा उत्तीर्ण होऊन हिंदुस्थानात बॅरिस्टरच्या धंदा करण्याकरिता ते स्थायिक न होतां दक्षिण आफ्रिकेतील नाताळमध्यें केपटाऊन शहरीं सन १८९९–१९०० चे सुमारास ते स्थायिक झाले. त्या काळीं काठेवाड व गुजराथ प्रांतांतील कित्येक मुसलमान व्यापारी त्या प्रदेशात व्यापारानिमित्त राहत असत. हे लोक व्यापारधंदा करून धनसंपन्न बनले होते. व्यापारी व्यवहारासंबंधीं तत्प्रांतीय कोर्टांत या लोकांची वादांची अनेक कामें उत्पन्न होत. अशा या सर्व व्यापाऱ्यांचीं वकिलीचीं कामें गांधींकडे येऊं लागलीं व अल्प काळात गांधींनीं उत्तम प्रकारचा द्रव्यलाभ झाला. बॅरिस्टर या नात्यानें गांधी जरी प्रतिष्ठित धंदा करणारे होते, तथापि काळा आदमी म्हणून त्या प्रांतांतील गोरे लोकांच्या हातून त्यांना कशा प्रकारचे अपमान सहन करावे लागत याचें उत्कृष्ट वर्णन एका ख्रिस्ती पाद्यानें लिहिलेल्या त्यांच्या चरित्रात आलें आहे. जशा एखाद्या फुटबॉलला फुटबॉल खेळणारे खेळाडू लत्ताप्रहार करून इकडून तिकडे उडवितात, त्याप्रमाणें गोऱ्यांनीं गांधींची अवहेलना केल्याचें वर्णन या पाद्यानें केलें आहे. प्रारंभीं इतका अपमान व अवहेलना सहन करून गांधी बॅरिस्टरच्या धंद्यास चिकटून राहिले. कांहीं वर्षांनंतर गांधींची वागणूक व राहणी यामुळें त्यांना मानमान्यता मिळूं लागली व त्यांचें लक्ष राजकारणाकडे वेधलें गेलें. बोअर लोकांशीं झालेल्या युद्धाचे वेळीं लढाईत जखमी झालेल्या शिपायांना रण-भूमीवरून इस्पितळांत आणण्याकरिता त्यांनीं डोलीवाहकाचें एक हिंदी पथक उभें केलें. या त्यांच्या कामगिरीबद्दल इंग्रजांविषयीं राजनिष्ठा बाळगणारे हिंदी गृहस्थ म्हणून त्यांची प्रख्याति झाली. गांधीप्रणीत राजकारणातील असहकार व कायदेभंग या दोन शस्त्रांचा प्रयोग त्यांनीं प्रथम दक्षिण आफ्रिकेंत सुरू केला. या कामीं त्यांना म्हणण्या-सारखें यश आलें नाहीं. गांधींच्या दक्षिण आफ्रिकेंतील सहवासामुळें व त्यांचे बहुतेक पक्षकार मुसलमान असल्या कारणानें प्रथमपासूनच मुसलमान जातीविषयीं

त्यांचे मनात सहानुभूति व प्रेमभावहि वसत होता. दक्षिण आफ्रिका सोडण्यास व तेथून हिंदुस्थानात येण्यास त्याना कोणती कारणें झालीं, याविषयींचा अधिकारयुक्त खुलासा आढळत नाहीं. दक्षिण आफ्रिकेंत असहकार व कायदेभंग या चळवळींमुळें त्या प्रांतांतील हिंदी व गोरे लोक यांच्यांत जी तेढ निर्माण झाली व दक्षिण आफ्रिकेंतील गोऱ्या लोकांच्या इच्छेविरुद्ध हिंदी लोकांस सहानुभूतीनें वागविण्याची तजवीज करणें इंग्लंडातील मुत्सद्यांना अशक्य झाल्यामुळें आपलें चंबूगबाळें घेऊन हिंदुस्थानच रस्ता सुधारावा अशा प्रकारचा सल्ला इंग्लंडांतील मुत्सद्याकडून मिळाल्यामुळें गांधी हिंदुस्थानात वास्तव्य करण्यास आले असावेत असा तर्क होतो. सन १९१५ सालीं बेळगावास राष्ट्रीय सभेचें जें अधिवेशन झालें, तोंपावेतों गांधींना हिंदी राजकारणात महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें नव्हतें. हिंदी राजकारणात त्यांचा प्रवेश नुकताच झाला होता. सन १९१४ च्या महायुद्धाचे वेळीं इंग्रजी राज्यकर्त्यांना मदत करण्याकरिता सैन्यभरतीशिवाय हिंदी पुढाऱ्यानीं मनोभावें मदत करावी, असें त्याचें मत होतें. चंपारण्यांतील इंग्रज चहाच्या मळेवाल्यांच्या अरेरावींतून व जुलमातून गरीब व दुबळ्या हिंदी मजुरांची स्थिति सुधारण्याकरिता त्यांचेबरोबर आम्ही ज्या जिल्ह्याचे शहरी वकिली करितों, तेथील एक नामांकित गृहस्थ गेले होते. ते दुसऱ्या महायुद्धाच्या सुमारास पुण्यास आले असतांना कोणत्याहि प्रकारच्या राजकीय हक्काचा मोबदला न मागता इंग्रजी राज्यकर्त्यांस सर्व हिंदी लोकांनीं मनोभावें साह्य करणें हीच गोष्ट युक्त आहे, असें मत त्यांनीं व्यक्त केलें. हे गृहस्थ व गांधी यांचे विद्यालयाचे संबंध होते, ही गोष्ट लक्षात घेता गांधींचेंहि हेंच मत असलें पाहिजे असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. त्या काळापासून आजदिनपावेतोंचें गांधींचें राजकीय चरित्र सर्वश्रुत असल्यामुळें त्याचा विशेष ऊहापोह करण्याचें कारण नाहीं. गांधींप्रमाणेंच पंडित जवाहरलाल नेहरू यास त्यांच्या स्वतःच्या अंगच्या गुणानीं व गांधींच्या कृपेनें हिंदी राजकारणात फार श्रेष्ठ स्थान प्राप्त झालें आहे. याविषयीं अधिक ऊहापोह करण्याचें कारण नाहीं. येथपावेतों केलेल्या विवेचनावरून हिंदी राजकारणाच्या प्रगतिस्तव श्रेष्ठ अशा हिंदी कायदेपंडितानीं किती सरच्या दर्जाची कामगिरी केली आहे, हें दिसून येतें. प्रस्तुत हिंदुस्थानांत ज्या राजकीय घटना साक्षात् घडून आल्या आहेत त्यावरून यदाकदाचित् स्वराज्य अथवा संपूर्ण स्वातंत्र्य प्राप्त झालें, तर त्या काळातहि हिंदुस्थानची राज्यधुरें वकिलवर्गाकडेच राहतील असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. प्रस्तुतच्या व्हाइसरायच्या कॅबिनेटचे बहुतेक सभासद वकीलच आहेत.

## वकील व विद्याव्यासंग

वकिलीच्या धंद्याचें स्वरूप, त्यांत त्या धंद्यांत करावें लागणारें काम व हें काम करण्यांत होणारा काळाचा व्यय हीं लक्षात घेतां वकिलांकडून विद्याव्यासंग,

धर्म, तत्त्वज्ञान, इतिहास इत्यादि विषयावर ग्रंथरचना, कादंबरी, नाटक, काव्य इत्यादि ललित वाङ्मयावरील ग्रंथरचना वकिलाच्या हातून होणें सामान्यतः दुर्घट आहे. विद्याव्यासंग, ग्रंथरचना इत्यादि कार्यें करण्यास स्वास्थ्य, चित्ताची प्रसन्नता व नियमितपणें अशा कार्याप्रीत्यर्थ कांहीं वेळ खर्च करण्याची संवय या गोष्टी अवश्य आहेत. वकिलीचा धंदा करणारापैकीं या गोष्टींची अनुकूलता फार थोड्यांना लाभत असल्यामुळें हा धंदा चांगल्या प्रकारें करीत असतां विद्याव्यासंग व ग्रंथरचना करणारे कांहीं लोक प्रसिद्धीस आले आहेत, त्यांचा व त्यांनीं केलेल्या कार्याचा उल्लेख करितों.

मुंबई हायकोर्टांत वकिलीचा धंदा करणाऱ्यापैकीं हायकोर्टाच्या स्थापनेनंतरच्या प्रारंभीच्या काळांत कै. विश्वनाथ नारायण मंडलिक हे एक विद्याव्यासंगी व नामांकित ग्रंथलेखक होऊन गेले. मुंबई सरकारनें सरकारी वकिलीच्या जागेवर त्यांची नेमणूक केली. मुंबई हायकोर्टाच्या सरकारी वकिलास वकिलीचें काम फार करावें लागतें. याशिवाय मंडलिकाकडे, नामांकित कायदेपंडित म्हणून त्यांची ख्याति असल्यामुळें खाजगी अपिलाचीं कामें त्यांच्याकडे पुष्कळ असत यांप्रमाणें त्यांच्याकडे वकिलीचें भरपूर काम असून त्यांत त्यांचा बराच वेळ व्यतीत होत असूनहि ग्रंथाचें वाचन व अभ्यास करण्यास त्यांना पुरेशी फुरसत काढतां येत असे. मुंबईच्या रॉयल एशियॅटिक सोसायटीचे ते एक नामांकित सभासद असून त्यांनीं या सोसायटीच्या सभेंत कित्येक विषयासंबंधाचे संशोधनात्मक निबंध वाचले आहेत. याशिवाय त्यांच्या एका महत्त्वाच्या कामगिरीचा उल्लेख करणें अवश्य आहे. हायकोर्टांतील इंग्रज न्यायाधिशांना संस्कृत भाषा अवगत नसते. त्याचप्रमाणें हिंदी न्यायाधिशांतहि संस्कृत जाणणारा न्यायाधीश क्वचितच असे. हायकोर्टापुढें निवाड्यासाठीं येणाऱ्या अपिलांत हिंदु धर्मशास्त्राचा (Hindu Law) एखादा बिकट प्रश्न उपस्थित झाला, तर त्या प्रश्नासंबंधाचीं मूळ स्मृतिवचनें अथवा त्यांचीं बिनचूक भाषांतरें लक्षांत घेऊन निवाडा करणें केव्हांहि युक्त होतें. संस्कृत भाषेच्या अज्ञानामुळें उत्पन्न होणारी अडचण दूर करण्यासतय कांहीं नामांकित स्मृतिग्रंथ व त्यावरील टीकाग्रंथ यांचीं भाषांतरें इंग्रजांच्या न्यायदानपद्धतीच्या प्रारंभींचे काळांत केलीं गेलीं होतीं. गुजराथ प्रांतांत मयूख हा ग्रंथ प्रामाण्याच्या दृष्टीनें श्रेष्ठ मानला जातो व इतरहमेश या ग्रंथांतील वचनांचा उल्लेख अपिलाचीं कामें हायकोर्टापुढें निवाड्यासाठीं आलीं असतां करावा लागत असल्यामुळें या ग्रंथाचें भाषांतर मंडलिकांनीं करून प्रसिद्ध केलें. मंडलिकांच्या विद्याव्यासंगाचा व ग्रंथरचनेचा उल्लेख केल्यानंतर हायकोर्टांतील दुसऱ्या एका विद्याव्यासंगी व ग्रंथरचना करणाऱ्या एका वकिलांचा उल्लेख करणें अवश्य आहे. कै. रावबहादुर वासुदेव जगन्नाथ कीर्तिकर हे एक नामांकित वकील होते. अपील शाखेकडे मोठमोठ्या अपिलांचीं कामें त्यांच्याकडे पक्षकार सोंपवीत असत. शिवाय मुंबई सरकारनें सरकारी वकिलाच्या जागेवर त्यांची नेमणूक केली. सरकारी वकिलीचें कामहि त्यांना पुष्कळ करावें लागे. याप्रमाणें वकिलीच्या धंद्यांत त्यांचा बराच काळ व्यतीत होत होता, तरी त्यांचा आवडीच्या विषयाचा अभ्यास व व्यासंग

चालू असे. आद्य शंकराचार्यांच्या अद्वैत वेदान्ताचे ते मोक्ते होते व आचार्यांच्या अद्वैत वेदान्तावरील सर्व ग्रंथाचा उत्तम अभ्यास करून त्यांनी इंग्रजी भाषेंत एक उत्कृष्ट ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. मुंबई हायकोर्टांत बॅरिस्टरचा धंदा करणारे व अकाली निधन पावलेले वैद्य या नांवाच्या गृहस्थानीं 'संस्कृत इंग्लिश डिक्शनरी' हा ग्रंथ फार दिवसापूर्वी प्रसिद्ध केला. कै. न्यायमूर्ति सर नारायण चंदावरकर याची हायकोर्टाच्या न्यायाधिशाच्या जागेवर नेमणूक झाल्यावर स्मृतिग्रंथ व त्यावरील टीकाग्रंथ यांतील वचनें विचारात घेऊन ज्या अपिलांत हिंदुधर्मशास्त्रासंबंधानें महत्त्वाचे जे प्रश्न उपस्थित होतील, त्याचा निवाडा करावयाचा ही प्रवृत्ति अधिकपणें मान्यता पावली. यामुळें स्मृतिशास्त्रातील हिंदुधर्मशास्त्र ग्रंथांचीं व त्यातील वचनांचीं इंग्रजींत बिनचूक भाषांतरें प्रसिद्ध करण्याचा उपक्रम सुरू झाला. मुंबई हायकोर्टांतील अपील शाखेकडे वकिली करणारे नामांकित संस्कृतज्ञ ॲडव्होकेट जगन्नाथ रघुनाथ घारपुरे यांनीं हिंदु लॉ टेक्स्टस् या नावाची ग्रंथमाला प्रसिद्ध करण्यास सुरवात केली. अलीकडे मध्यवर्ति विधिमंडळात हिंदु लॉ चें कोड तयार करून तें कायद्याच्या रूपानें मंजूर करून घेण्याच्या हेतूनें राव कमिटी या नावाची जी समिति नेमण्यात आली आहे, त्या कमिटीचे घारपुरे हे सदस्य आहेत. या समितीनें हिंदु लॉ संबंधीचीं कांहीं बिलें मध्यवर्ति विधिमंडळात दाखल केलीं आहेत. श्रीयुत घारपुरे यांनीं केलेल्या कार्यापेक्षाहि एक प्रचंड व महत्त्वाचें कार्य मुंबई हायकोर्टाचे ॲडव्होकेट महामहोपाध्याय पांडुरंग वामन काणे यांनीं केलें आहे. संस्कृत भाषेंतील यच्चयावत् हिंदुधर्मशास्त्रांतर्गत श्रुतिस्मृतिनीति ग्रंथांचें आलोडन करून हिस्टरी ऑफ हिंदुधर्मशास्त्र ( हिंदुधर्मशास्त्राचा इतिहास ) नावाचें प्रत्येकी ८०० ते १००० पृष्ठांचे चार ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. याशिवाय जे विद्यार्थी दुसरी भाषा संस्कृत घेऊन परीक्षेस बसावयाचे त्यांना उपयोगास्तव काव्य, नाटक, अलंकार इत्यादि विषयावरील इंग्रजी टिपणें लिहून प्रसिद्ध केलीं आहेत. अपीलशाखेकडे अशिलांचें काम काणे यांना पुष्कळ असतें व हें काम करण्यात त्यांचा वेळहि पुष्कळ व्यतीत होतो; शिवाय त्याना पोटदुखीची व्यथा आहे. अशा स्थितींत History of Hindu Dharmashastra या विषयावर १०००–१००० पानांचे ४ खंड काण्यांनीं लिहून प्रसिद्ध केले, त्याबद्दल ते निःसंशय स्तुतीस पात्र आहेत. या त्यांनीं केलेल्या कामाबद्दल हिंदुस्थान सरकारनें त्यांना महामहोपाध्याय ही पदवी देऊन त्याचा बहुमान केला आहे. मुंबई विश्वविद्यालयाकडून काण्यांच्या गौरवाचे बाबतींत जें या बाबतचें औदासिन्य दिसून येतें त्याबद्दल कोणासहि आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं. मुंबई विश्वविद्यालयानें काण्यांना एल्. एल्. डी. ची पदवी देऊन या पूर्वीच त्यांचा बहुमान करावयास पाहिजे होता. यूरोपखंडांतील विश्वविद्यालयाकडून, श्री. काणे यांनीं ज्या प्रकारचें कार्य केलें, तशा योग्यतेचें काम करणाऱ्यास एलएल. डी. ची पदवी दिल्याचीं किंत्येक उदाहरणें आहेत. मुंबई विश्वविद्यालयाची घटना विचित्र स्वरूपाची आहे. या विश्वविद्यालयाचे पारशी, गुजराथी, कर्नाटकी, मुसलमान,

दक्षिणी या निरनिराळ्या जमातींचे सदस्य आहेत यामुळें कोणत्याहि जमातींतील विद्वानानें केलेल्या कामाची पारख निर्मत्सरपणें केली जात नाहीं, या कारणामुळें या विश्वविद्यालयाकडून योग्य विद्वानाचा बहुमान क्वचित् केला जातो. गेल्या ६०।७० वर्षांत मुंबई हायकोर्टाच्या अपील शाखेकडे काम करणारे हजार पाचशें वकील झाले असतील, परंतु वर दर्शविलेल्या पाचसहा विद्वानाशिवाय अन्य कोणी विद्वान्, विद्याव्यासंगी व ग्रंथलेखक झाल्याचें आढळत नाहीं. मुंबई शहराशिवाय मुंबई इलाख्यांतील तालुक्याच्या व जिल्ह्याच्या ठिकाणीं वकिली करणारे गेल्या ६०।७० वर्षांत ५०००–६००० लोक तरी झाले असतील या लोकांपैकीं विद्याव्यासंगी व ग्रंथलेखन करणारे पाचपंचवीस असतील कीं नाहीं याची शंका आहे. बेळगाव येथें के नातु या नावाचे एक वकील होते. त्यांनीं कित्येक वर्षांपूर्वीं महादजी शिंदे यांचें चरित्र लिहून प्रसिद्ध केलें आहे. याशिवाय पनवेल येथील रा. फडके ह्यांनीं हिंदुस्थानांतील निरनिराळ्या धर्मांचे व संप्रदायाचे इतिहास लिहून प्रसिद्ध केले आहेत. रामदास आणि रामदासी संप्रदाय आणि महाराष्ट्रांतील वारकरी व अन्य संप्रदाय यांच्या व ग्रंथाचा फार मोठा संग्रह धुळ्याच्या सत्कार्योत्तेजक सभेचे चिटणीस शंकर श्रीकृष्ण देव यांनीं केला आहे. रामदासी संप्रदायाचे महत्त्वाचे सुमारें ७० ग्रंथ ह्यांनीं छापून प्रसिद्ध केले आहेत. याशिवाय रामदास आणि रामदासी हें मासिक गेलीं २९।३० वर्षे ते प्रसिद्ध करीत आहेत. मुंबई इलाख्यांतच काय परंतु अखिल भरतखंडामध्यें अशा एखाद्या पद्याचें वाङ्मय वकील वर्गापैकीं कोणी गृहस्थानें प्रसिद्ध केल्याचें उदाहरण क्वचितच आढळेल. ठळकपणें दृष्टिपथांत येणाऱ्या विद्याव्यासंगी वकिलांचा उल्लेख यथामार्गें आम्हीं केला आहे. कांहीं तुरळक ग्रंथ लिहिणारे थोडे-फार गृहस्थ मुंबई इलाख्यांत असण्याचा संभव आहे. येथपावेतों केलेल्या चर्चेचा निष्कर्ष जर कांहीं काढावयाचा असेल तर तो हा कीं, या धंद्यांत विद्याव्यासंगी लोक फार अल्प प्रमाणांत आढळतात.

कायद्याच्या ग्रंथावर इंग्रजींत टीकाग्रंथ लिहिणारे भरतखंडाच्या निरनिराळ्या प्रांतांत अनेक होऊन गेले. अशा प्रकारच्या ग्रंथाच्या रचनेस लागणाऱ्या कायद्याच्या ज्ञानाची विद्वत्ता व विकास असल्या ग्रंथाच्या पर्यायें त्यांचा व्यवसायांत त्यांस प्राप्त होत असल्यामुळें याबद्दल ग्रंथकर्ता विशेष प्रकारच्या स्तुतीस पात्र होऊं शकत नाहीं. अशा प्रकारची ग्रंथाची रचना करणारे अनेक कायदेपंडित भरतखंडाच्या निरनिराळ्या प्रांतांत झाले असल्यामुळें त्यांचा नामनिर्देश प्रस्तुत प्रकरणांत आम्हीं केला नाहीं.

---

प्रकरण १३ वें

# १. वकील मंडळें ( Bar Associations)

राजकीय चळवळ करणारे बरेच लोक तालुका व जिल्ह्याचे शहरीं वकिलीचा धंदा करणारे असतात ही गोष्ट लक्षात घेऊन या राजकीय चळवळ करणाऱ्या लोकांवर नियंत्रण घालण्याकरिता हायकोर्टांतील काहीं जज्जांच्या विचारविनिमयानें तालुका व जिल्हा कोर्टांत वकील मंडळें ( Bar Associations) स्थापन करण्याची कल्पना उद्भूत झाली. त्याचा उल्लेख मागें केलाच आहे राजकीय व अन्य बाबतींत वकिलीचा धंदा करीत असतां एखाद्या वकिलाचें दूषणास्पद वर्तन झाल्यास त्याचें नियंत्रण वकील मंडळाकडून केलें जावें हें प्रमुख ध्येय वकील मंडळें स्थापन करण्याचें होतें एखाद्या वकिलाचें वर्तन बरोबर नाहीं, अशी तक्रार वकील वर्गापैकींच कोणीं उपस्थित केली तर तिची चौकशी, पूर्णतपास वकील मंडळानेंच करावयाचा व त्याच्याकडून जो निर्णय दिला जाईल तो, हायकोर्टाकडे कळवून हायकोर्टाच्या न्यायाधिशाच्या मतानें त्या वकिलास त्याच्या आचरणाबद्दल प्रायश्चित्त द्यावयाचें हा हेतु साध्य करण्यास्तव अशी पद्धत वकील मंडळें स्थापन करून सुरू करावयाची ही नवीन कल्पना उदयास आली आम्ही ज्या जिल्हाकोर्टांत वकिली करीत होतों तेथें लोकमान्य टिळकांवर दुसरा राजद्रोहाचा खटला सन १९०९ त झाला, त्या सुमारास सरकारच्या बगलेंतील व सरकारी अधिकाऱ्यांना चुगल्या सांगणाऱ्या एकदोन नेमस्त वकिलांनीं बार असोसिएशन स्थापन करण्याचा प्रश्न उपस्थित केला परंतु लोकमान्यांचें राजकीय तत्त्वज्ञान मान्य असणाऱ्या वकिलांची संख्या अधिक असल्यानें बार असोसिएशनच्या स्थापनेस त्यांनीं कसून विरोध केला व बार असोसिएशनची स्थापना झाली नाहीं. हा प्रकार जसा आमच्या जिल्ह्यांत घडला तसाच अन्य जिल्ह्यांत व तालुक्यांत घडून आला नंतर मंडालेहून लो. टिळकांची मुक्तता होऊन ते परत आले पुढें थोड्याच दिवसांत नेमस्त राजकारण लयास जाऊन हिंदुस्थानच्या राजकारणास एक नवीन वळण लागलें या सुमारास हिंदुस्थानच्या राजकीय चळवळींत वकील वर्गांतील लोकांस जें महत्त्व होतें, त्यास उतरती कळा लागण्यास प्रारंभ होऊन चरखा, सूत, खादी, कायदेभंग इत्यादि नूतन तत्त्वें कॉंग्रेसच्या चळवळींत प्रविष्ट होऊन मागता पायऱ्यावर वकील वर्गांतील राजकीय चळवळींत भाग घेणाऱ्या लोकांची हकालपट्टी झाली या कारणामुळें राजकीय चळवळीचे बाबतींत नियंत्रण करण्यास्तव ठिकठिकाणच्या जिल्हा व तालुका कोर्टांत बार-असोसिएशन्स स्थापन करण्याची आवश्यकता राहिली नाहीं

आतां दर्शविल्याप्रमाणें जरी बार असोसिएशन्स स्थापन करण्याची आवश्यकता राहिली नसली, तरी एकच धंदा करणाऱ्या अनेक व्यक्तींची त्या वर्गाच्या हितासाठीं रक्षण करण्यास्तव वकील मंडळें स्थापन करण्याची जरूरी सर्वत्रांस वाटलें

स्वाभाविक होतें. यामुळें ठिकठिकाणच्या तालुक्याच्या व जिल्ह्याच्या वकिलांनीं इ.स. १९१६।१७ चे सुमारास वकील मंडळें स्थापन केलीं असून त्या मंडळाचे कांहीं विशिष्ट नियमहि मंजूर केले आहेत. अशा प्रकारें स्थापन केलेल्या मंडळाकडून कोर्टाच्या कामाकरितां एके ठिकाणीं जमणाऱ्या वकिलांची चहापाण्याची सामुदायिक सोय, त्याचप्रमाणें कोर्टांत काम नसेल तेव्हां वाचनाकरितां वर्तमानपत्रें, मासिकें घेणें अशा प्रकारच्या सामुदायिक हिताच्या गोष्टी या वकील मंडळाकडून साध्य होतात. आम्ही ज्या जिल्ह्याच्या ठिकाणीं वकिली करितों, तेथील वकील मंडळानें सन १९१६।१७ सालांत वकील मंडळें स्थापन करून त्याचे हेतू व नियम मंजूर केले. या नियमापैकीं एका नियमानें एक फार चांगली गोष्ट सर्वेनाच्या संमतीनें अस्तित्वांत आली आहे. ती म्हटली म्हणजे मावळत्या न्यायाधिकाऱ्यास पानसुपारी व अल्पोपाहार देण्याची रूढ झालेली पद्धत बंद केली गेली ही होय. आतां दर्शविल्याप्रमाणें या जिल्ह्यांत वकील मंडळाची स्थापना १९१६।१७ सालांत स्थापन होण्यापूर्वी एका न्यायाधिशाची बदली होऊन त्याचे जागीं दुसऱ्याची नेमणूक झाली कीं, मावळत्या न्यायाधिशास अल्पोपाहार देऊन पुष्पहारांनीं त्यास मंडित करण्याचा प्रघात वकील मंडळीच्या अंगीं खिळल्यासारखा झाला होता. ही पद्धत इतकी बोकाळली होती कीं, वर्षांतून दोनतीन मावळत्या न्यायाधिशाचा या प्रकारें वकील वर्गाला सन्मान करावा लागे व त्याप्रीत्यर्थ दरसाल तीनचारशें रुपयाचा भूर्देड वकील वर्गाला सोसावा लागे. मावळत्या न्यायाधिशाचा सन्मान कोणत्या कारणाकरितां करावयाचा याचीं निश्चित अशीं कांहीं तत्वें ठरलीं नव्हतीं. आम्हास दोन उदाहरणें अशीं ठाऊक आहेत कीं, ज्या अधिकाऱ्यांच्या सन्मानाबाबत तीव्र मतभेद होता. जिल्हा न्यायाधिशाचे जागेवर काम करणारा एक गोरा अधिकारी अत्यंत तुसड्या स्वभावाचा व वकील वर्गाविषयीं तुच्छता बाळगणारा होता. त्याची या जिल्ह्यातून अन्यत्र जिल्ह्यांत बदली झाली. त्यास अल्पोपाहार देणारे दोन गृहस्थ वकील मंडळांत निघाले. एक असि० पब्लिक प्रॉसिक्यूटर व दुसरे त्याचे नेमस्त राजकारणाचे अग्रगण्य स्नेही वकील. या दोघांनीं या न्यायाधिशाचा सन्मान करण्याचा घाट घेतला व सन्मान करण्याकरितां लागणारें द्रव्य मिळविण्याकरितां वकील मंडळांत यादी फिरविली. परंतु वकिलांपैकीं कोणीच या सन्मानाप्रीत्यर्थ वर्गणी दिली नाहीं. तथापि या दोघां वकिलांनीं त्याचा सन्मान करावयाचा हट्ट धरून वकील वर्गाकडून आपणास अल्पोपाहार देण्याचें निश्चित झालें आहे, तरी आपण अमुक दिवशीं उपस्थित राहावें असें त्यास कळविलें व वकील मंडळापैकीं सर्वांस अल्पोपाहारास हजर राहण्याचीं आमंत्रणें दिलीं. ज्या न्यायाधिशाचा सन्मान करणें कोणासहि इष्ट वाटत नव्हतें अशा गृहस्थाचा सन्मान करण्यास्तव वकील मंडळापैकीं कित्येकांना निरुपायास्तव उपस्थित राहावें लागलें. हें एका गोऱ्या अधिकाऱ्याचें उदाहरण झालें. दुसरें उदाहरण एका महाराष्ट्रीय न्यायाधिशासंबंधाचें आहे. हे न्यायाधीश अत्यंत हुशार, निःस्पृह वृत्तीचे व काटेकोरपणानें न्याय करणारे होते. परंतु यांचा स्वभाव अत्यंत तुसडा असून वकिलांना कसल्याहि प्रकारची सव-

लत वांचेकडून कधीं मिळाली नाहीं. प्रत्येक वकिलाची न्यायाधिशाचे बाबतींत अशी अपेक्षा असते कीं, न्यायाधिशानें सर्वसामान्य शिष्टाचारास अनुसरून त्याचे कोर्टांत काम करणाऱ्या वकिलास थोडीफार कमाल्या सोयीस्तव सवलत द्यावी. या प्रकारची सवलत बहुसंख्य न्यायाधिशाकडून वकिलांना मिळत असते. परंतु या प्रकारची सवलत या *न्यायाधिशाकडून कोणास कधींच मिळाली नाहीं; व वकील वर्गापैकीं सर्वांनाच* ही गोष्ट नापसंत होती. तथापि हे न्यायाधीश ज्या एका ब्राह्मण पोटज्ञातपैकीं होते, त्या ज्ञातीच्या वकिलांना या न्यायाधिशाचा सन्मान व्हावा, असें वाटलें. परंतु या न्यायाधिशाचा सन्मान करावा कीं नाहीं या प्रश्नाबद्दल तीव्र मतभेद असल्या कारणानें वकील मंडळींचें मत अजमावण्याकरितां एक यादी फिरविण्यांत आली. तीवरून त्याचा सन्मान करूं इच्छिणाऱ्या वकिलांचें बहुमत झाल्या कारणानें अखेर त्या न्यायाधिशाचा सन्मान करण्यांत आला. या न्यायाधिशाचा सन्मान करण्यांत येऊं नये असें म्हणणारे जे वकील होते त्यांनींहि *सन्मानाप्रीत्यर्थ* युक्त तें द्रव्य दिलें. मावळत्या न्यायाधिशाच्या सन्मानाचे बाबतींत असल्या प्रकारचे मतभेद हरहमेश उत्पन्न होऊन त्याविषयींची अकारण चर्चा करण्याचें टाळण्यास्तव व दरवर्षी दोनतीनशें रु.चा भुर्दंड या सन्मानाप्रीत्यर्थ करण्याचें टाळण्यास्तव या जिल्ह्याच्या ठिकाणच्या वकील मंडळानें असा ठराव केला कीं, कोणत्याहि मावळत्या न्यायाधिशास अल्पोपाहार देऊन सन्मान करावयाचा नाहीं. वकील वर्गाचे सामुदायिक हितसंबंध रक्षण करण्याची योग्य तरतूद अमलांत आणणें हें जें धार असोसिएशनचें ध्येय तें साध्य करणें दुरापास्त ठरलें. वकील मंडळांतील प्रत्येक वकिलाच्या हिताचें रक्षण होऊन त्याच धंद्यांत काम करणाऱ्या दुसऱ्या बांधवाचें आर्थिक नुकसान, किमान निर्बंध स्वखुषीनें वकीलवर्ग स्वतः पाळण्यास विमुख तयार आहे, अशाविषयीं वकील मंडळांत चर्चा एक वेळा करण्यांत आली; परंतु तींतून कांहींएक निष्पन्न झालें नाहीं. कोणताच निर्बंध पाळण्याची तयारी वकील मंडळांपैकीं क्वचितशः कोणाचीच दिसली नाहीं. वकील मंडळाच्या सामुदायिक व वैयक्तिक हिताच्या दृष्टीनें कांहीं वकिलांनीं पुढें नमूद केलेले किमान निर्बंध मान्य करावे, असें सुचविण्यांत आलें:—

(१) पक्षकारांकडून किमान मेहनताना म्हणून अमुक एका रकमेपेक्षा कमी वकिली घ्यावयाची नाहीं.

(२) एका वकिलाकडे ज्या पक्षकाराचीं नेहमींचीं कामें असतील, तो पक्षकार त्याचेकडील काम काढून घेऊन दुसऱ्या वकिलाकडे काम सोपवूं लागला तर ज्या नवीन वकिलाकडे तो पक्षकार आपलें काम सोपवील, त्यानें त्या पक्षकाराच्या पूर्वीच्या *वकिलास पक्षकार त्याच्याकडे काम देत आहे, असें कळविणें व पूर्वीच्या वकिलाची* त्या पक्षकाराकडे कामाबद्दलची कांहीं बाकी घेणें आहे कीं काय याबद्दल तपास करणें.

(३) या तपासांत त्या पक्षकाराकडे पूर्वीची बाकी घेणें आहे असें समजल्यास ती पूर्वीच्या वकिलास देऊन टाकल्याशिवाय त्याचें काम घेणार नाहीं असें त्यास कळविणें,

(४) काहीं पक्षकार त्याच्या वकिलाची बाकी थकली असल्यास व कोर्टांत प्रतिवादीनें–पक्षकारानें, हुकुमनाम्याच्या पोटीं काहीं रक्कम भरली असल्यास ती त्याच्या पूर्वीच्या वकिलाच्या हातीं पडून ती बाकीपोटीं जमा होऊं नये म्हणून कोर्टांत भरलेले पैसे एका निराळ्याच वकिलास पैसे काढण्यापुरतें वकिलपत्र देऊन ते पैसे आपल्या हातीं पडतील अशी युक्ति कित्येक पक्षकार करितात यामुळें पूर्वीच्या वकिलाचें नुकसान होतें. सबब कोर्टांतील अशा रकमा घेण्याकरितां कोणाहि पक्षकाराचें वकीलपत्र कोणत्याहि वकिलानें न घेणें.

वर दर्शविल्या प्रकारचे निर्बंध म्हणण्यासारखे जाचक नसून वैयक्तिक वकिलीचा धंदा करणारास उपकारक असेच आहेत. असें असूनहि ह्या निर्बंधाच्या स्वीकारास वकील मंडळाकडून मान्यता मिळाली नाहीं.

मॉंटेग्यू–चेम्सफर्ड रिफॉर्म्सअन्वयें हिंदुस्थानच्या निरनिराळ्या प्रांतांत जीं विधिमंडळें अस्तित्वांत आलीं, त्यानंतर प्रांतिक विधिमंडळांत व मध्यवर्ति विधि-मंडळांत नानाविध विषयांवरील कायद्याचे मसुदे सादर करण्यांत येऊं लागले. याप्रमाणें सादर करण्यांत आलेल्या बिलांविषयीं तीं बिलें बार असोसिएशनकडे पाठवून त्यांचे अभिप्राय मागविण्याचा नवीन परिपाठ सुरू झाला. या परिपाठामुळें वकील मंडळांना थोडेंफार महत्त्व प्राप्त झालें. परंतु अशा तऱ्हेनें मतासाठीं आलेल्या बिलांविषयींची चर्चा करून त्यावरील अभिप्राय व्यक्त करण्याचे बाबतींत दक्षता व उत्सुकता वकील मंडळांपैकीं फारच थोड्या वकिलांनीं दाखविली. आमचे एक ध्येय-निष्ठ वकील एवंगुणविशिष्ट वकील मंडळाची थट्टा करीत. त्यांचा आक्षेप असा होता कीं वकिलीचा धंदा हा श्रेष्ठ दर्जाचा असून वकिलाची वागणूक त्या दर्जास अनुसरून असली पाहिजे. अशा प्रकारची वागणूक ज्यांची नाहीं, अशा वकिलांचीं मंडळें निरुपयोगी आहेत व कोणाहि वकिलानें अशा वकील मंडळाचें अध्यक्षपद स्वीकारणें हें मोठेपणाचें आहे, असें समजण्याचें कारण नाहीं. यावर या वकिलांना आम्हीं असें सांगितलें कीं, उच्च कोटीचीं सर्वमान्य नीतितत्त्वें सर्वांनीं पाळणें इष्ट व जरूर असलें, तरी सर्वसाधारणपणें असें आढळून येतें कीं, साक्षात् व्यवहारांत 'पुराणांतील वांगीं पुराणांत' या न्यायानें बहुतेक सर्व लोक वागतात. हें व्यावहारिक सत्य लक्षांत घेऊन ध्येयनिष्ठता न बाळगतां वकील मंडळासारख्या संस्था येण्याजोग्या रीतीनें अशा चालवितां येतील तशा चालवाव्या, व त्या चालविण्यापासून थोडाफार काहीं लाभ होत्यास तो करून घेण्याचा प्रयत्न करावा असें मत वकिलास आम्हीं सांगितलें. हें आमचें मत त्या वकिलांना ग्राह्य वाटलें नाहीं. या वकिलांचे वडील एक मोठे नामांकित वकील होते व वकिलीचा धंदा करून त्यांनीं धनसंचय बराच केला होता. त्यांच्या पश्चात् त्यापैकीं काहीं भाग या वकिलांना मिळाला. त्यांचा वकील मंडळांत प्रवेश झाला त्या वेळीं त्यांची स्थिति सुसंपन्न होती. या कारणानें विशिष्ट मोबदल्याचे खेरीज कोणतीहि वकिलीचीं कामें घ्यावयाचीं नाहींत, अपिलांचें व स्पेशल दाव्यांच्या कामांतील वकिलपत्र घ्यावयाचें असे निर्बंध पाळून त्यांनीं वकिलीचा धंदा

सुरू केला. त्याच्यापुरती ही गोष्ट जरी युक्त असली, तरी एखाद्या निर्धन व बुभुक्षित मनुष्याचा वकिलीच्या धंद्यांत प्रवेश झाला, तर त्याला असल्या प्रकारचे निर्बंध पाळणें वर्षांच शक्य नसतें व तो स्वतःचें पोट भरण्याकरितां वकिलीचीं कामें मिळावीं म्हणून जें द्रव्य मिळेल तें घेऊन काम करण्यास तयार होतो. ज्या जिल्ह्यांत आम्ही वकिली करीत होतों, त्या जिल्ह्याच्या वकील मंडळाचे अध्यक्ष एक नामांकित वकील होते. ते वकिलीच्या धंद्यांतून निवृत्त झाल्यावर त्या पदावर आमची नेमणूक झाली. हें पद मिळविण्याकरितां आम्हीं प्रयत्न कांहींच केला नाहीं व आमची नेमणूक करण्यात आल्यावर कांहीं विशेष प्रकारचा मान प्राप्त झाला आहे, असें आम्हास वर्षांच वाटलें नाहीं. सामुदायिक हित साध्य करण्यास्तव स्थापन करण्यांत आलेल्या संस्थांच्या बाबतींत विश्वविद्यालयीन बहुतेक पदवीधर वकिलाची मनोवृत्ति किती बेफिकीरपणाची असते, हें आमच्या वांगलें अनुभवास आलें. एखाद्या महत्त्वाच्या प्रश्नाच्या चर्चेकरितां वकील मंडळाची सभा भरविली तर काम चालविण्याकरितां उपस्थित सभासदांची किमान संख्या नसली तर जवळच्याच खोलींत गादी-तक्यावर आराम घेत असलेल्या वकिलांना सभास्थानीं उपस्थित होण्याविषयीं विनंति केली तर ती मान्य करणारे वकील आढळणें विरळाच! असे हे लोक अशा एखाद्या सभेंत त्यास पसंत नसलेला ठराव मंजूर झाला तर त्याबाबत ओरड करण्यास कमी करीत नाहींत. एखादी संस्था काढली तर ती चांगल्या प्रकारें चालवून कार्यक्षम करणें हें त्या संस्थेच्या प्रत्येक सभासदाचें कर्तव्य आहे, अशी जाणीवच या लोकांच्या ठिकाणीं दिसून येत नाहीं..

मागील प्रकरण ६ वें भाग ४ चे शेवटीं वकिलीचा धंदा करणाऱ्या लोकांचीं मंडळें स्थापन करण्याचें वरिष्ठ सरकारी अधिकाऱ्यांचें धोरण लो. टिळकांना राजद्रोहाची शिक्षा सन १८९७ सालीं झाल्यावर उदयास जरी आलें तथापि या धोरणास अनुसरून वकिलांचीं मंडळें स्थापन करणेच्या बाबतींत कोणत्याच जिल्ह्यांत प्रयत्न करण्यात आला नाहीं. सन १९०८ सालांत लो. टिळकांवर दुसरा राजद्रोहाचा खटला होऊन त्यांना ६ वर्षांची शिक्षा देण्यांत आली व त्यांची रवानगी मंडालेचे तुरुंगात करण्यात आली. सन १९१५ सालांत त्यांची सुटका होऊन ते महाराष्ट्रांत परत आले. या दरम्यानच्या काळात महाराष्ट्राच्या राजकीय चळवळीच्या क्षेत्रात जिकडे तिकडे सामसूम नांदत होती. तथापि इंग्रज नोकरशाहीच्या मनांत राजकीय चळवळींचा उच्छेद कोणत्या रीतीनें करावा याची मसलत न भवति चालली होती. लोकमान्यांची रवानगी मंडालेस केल्यावर महाराष्ट्रांतील राजकीय चळवळीतील त्यांच्या अनुयायांवर राजद्रोहाचे खटल्यांचें सत्र सुरू करून त्यांना राजद्रोहाच्या गुन्ह्याबद्दल शिक्षा दिल्या. या काळांत वकिलांच्या स्वातंत्र्यावर निर्बंधणें घालण्याकरतां वकील मंडळांची स्थापना करण्याचे बाबतींत विशेष प्रकारचे प्रयत्न झाले नाहीत. मंडालेहून टिळकांची सुटका होऊन ते परत आल्यावर हिंदुस्थानच्या राजकीय क्षेत्रांत स्थित्यंतर घडून आलें. हिंदी राजकीय चळवळ दडपून टाकण्याचे

नोकरशाहीचे प्रयत्न निष्फळ ठरूं लागले. याच सुमारास आमच्या या जिल्ह्यातल्या कोर्टात एका वकील मंडळाची स्थापना करण्यात आली. वकील मंडळाचे स्थापनेस वकिलांपैकी जे लोक सन १९०७।८ पूर्वी विरोध करणारे होते, त्यांनी आपला विरोध आता दर्शविलेल्या कारणाकरता मागे घेतला व विरोध करणारे वकील नूतन स्थापन करण्यात आलेल्या वकील मंडळात सामील झाले. मध्यवर्ति विधि-मंडळाचे घटनेंत त्याचप्रमाणें प्रांतिक सरकारच्या विधिमंडळाचे घटनेंत नवीन फेरफार घडून आले. या फेरफारामुळें मध्यवर्ति सरकारांकडून त्याचप्रमाणें प्रांतिक सरकारांकडून करण्यांत येणाऱ्या नूतन कायद्यांचे मसुदे विचार करण्याकरता व त्या-बाबत इष्ट त्या सूचना करण्याकरता वकील मंडळाकडे येऊं लागले. अशा प्रकारें येणाऱ्या कित्येक नूतन कायद्याच्या बिलावर आपला अभिप्राय व सूचना वकील मंडळाच्या नेमण्यात आलेल्या पोटसमितीकडून देण्यात येऊं लागल्या. मागें नमूद केल्याप्रमाणें या जिल्ह्यांत वकील मंडळाची स्थापना करण्याचें दुसरें एक कारण होतें निरनिराळ्या तालुका कोर्टातील व जिल्हा कोर्टातील वकिलांच्या सामुदायिक सुखसोयीच्या तजविजी अशा प्रकारच्या वकील मंडळांकडून करणें सोयीचें असल्यामुळें वकील मंडळाचे स्थापनेस वकिलांची अनुकूलता मिळणें साहजिक होतें. अशा परिस्थितींत स्थापन करण्यात आलेल्या निरनिराळ्या तालुका व जिल्हा कोर्टात स्थापन करण्यात आलेलीं मंडळें मुख्यत्वेंकरून सामुदायिक सुखसोयीच्या तजविजी करूं लागणें युक्त होतें.

## दैनंदिन राजकीय घटना

परंतु हिंदी राजकारणाच्या क्षेत्रात जसजशा नवीन घटना उदयास येऊं लागल्या तसतशा या घटनांबाबत विचार करून सामुदायिक रीतीनें आपलें मत व्यक्त करणें, ही गोष्ट या मंडळाच्या अधिकारक्षेत्रात कितपत पडते याविषयीं कित्येक मंडळात वाद उत्पन्न झाले. आमच्या जिल्ह्यातील वकील मंडळापुढें या प्रकारचा एक प्रश्न विचारार्थ करितां व चर्चेकरिता वकील मंडळांतील कांहीं सभासदांनीं मुद्दाम वादी काढून ठेवण्यात यावा, असें मंडळाच्या अध्यक्षांस लेखी कळविलें.

सन १९३८ सालात मध्यप्रांताच्या मंत्रिमंडळात एक विचित्र घटना घडून आली. मंत्रिमंडळापैकीं कांहींनीं राजीनामे दिल्यानें हिंदुस्थानसरकारच्या हिंदी राज-कीय घटनेच्या ९३ कलमान्वयें गव्हर्नरी अंमल त्या प्रांतात सुरू झाला. या प्रसंगीं मुख्य प्रधान डॉ. खरे यांच्यावर शिस्तभंगाचें शस्त्र कॉंग्रेसच्या पार्लमेंटरी बोर्डानें उपसून त्यांची कॉंग्रेसपक्षातून हकालपट्टी केली गेली. यानंतर मध्यप्रांतातील अकोला जिल्ह्याच्या वकील मंडळानें वकील मंडळाची सभा भरवून कॉंग्रेस वर्किंग कमिटीच्या निषेधाचा ठराव मंजूर करून जाहीर केला. अकोल्याच्या वकील मंडळाच्या ठरावा-प्रमाणें आमच्या जिल्ह्याच्या वकील मंडळानेंहि ठराव करावा असें आमच्या वकील मंडळातिल कांहीं सभासदांच्या मनांत आलें; व या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं

मंडळाची विशेष सर्वसाधारण सभा बोलवा म्हणून यादी पाठविली या यादींत खालीलप्रमाणें सभेपुढें ठराव मांडण्यात यावा, असें नमूद केलें आहे.

" To consider and express opinion on the recent C P. ministerial tangle and the action of the Congress Working Committee with respect to it "

यापमाणें या ठरावाचा विचार करण्याकरिता आमच्या जिल्ह्याच्या वकील मंडळाची सभा सन १९३८ च्या ऑगस्ट महिन्यात भरली कॉंग्रेसपक्षाभिमानी व कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें केलेला ठराव नापसत असणारे वकील या सभेस बऱ्याच प्रमाणात उपस्थित होते व या सभेंत या प्रश्नाची चर्चा व या विषयासंबंधी निर-निराळ्या पक्षाच्या वकिलांची भाषणें जवळजवळ दोन तास झाली. वादग्रस्त प्रश्नाबद्दल अनुकूल व प्रतिकूल मतें समसमान असल्याचें अध्यक्षाच्या निदर्शनास आल्यावरून ठराव मतास न टाकता वादग्रस्त प्रश्नाबद्दल अनुकूल वा प्रतिकूल ठराव करणें इष्ट नाहीं, असें वाटल्यावरून अध्यक्षांनी सभेंत झालेली चर्चा उद्बोधक झाली असें म्हणून सभा विसर्जन केली. वकील मंडळाच्या अध्यक्षांनी वास्तविक जी एक गोष्ट प्रथम करावयास पाहिजे होती ती ही कीं, हिंदुस्थानातील नामांकित कायदेपंडितांना हा प्रश्न कळवून वकील मंडळाच्या कक्षेंत हा प्रश्न पडतो कीं नाय यांविषयीं मतें मागवावयास पाहिजे होतीं, परंतु यामपाणें न करितां सभेचें काम संपल्यानंतर सभेच्या शेवटीं व्यक्त केलेलें मत कितपत योग्य होतें, यांविषयीं स्वतःच्या मनातील शंका निवारण करून घेण्यासाठीं त्यानीं आमच्या जिल्ह्याच्या वकील मंडळाचे हेतु व काही महत्त्वाचे नियम व वादग्रस्त प्रश्न यांविषयींचें खालील पत्र तयार केलें.

TOPIC OF DISCUSSION

To consider and express opinion on the recent C P. ministerial tangle and the action of the Congress Working Committee with respect to it

—19-8-1938.

No. 21 Dhulia, dated 2-9-38

From,

Bhaskar Waman Bhat, Esqr.
President W Kh. Bar Association,
DHULIA.

To

Dear Sir,

I hope you will excuse me for intruding upon your valuable time by writing this letter to you My holy excuse for doing so is that I am writing this to you with a view to get from you your esteemed and well considered opinion about an important point relating to the functions of pleaders as a class I hope you will pardon me for my intrusion and shall feel greatly obliged if you are pleased to favour me with your opinion

In almost all the district towns Bar-Associations of pleaders have been formed. Those associations have adopted constitutions defining their objections and laying down the rules of the associations.

Various important questions relating to present day politics and matters of public importance are arising from time to time and these associations are faced with the delicate questions whether they should discuss and record their opinions in the form of resolutions.

As you are an experienced and able lawyer your opinion about these points will prove a valuable guide in deciding this delicate point. I am, therefore, requesting you to give your opinion on the following points. The object of the association as defined in its constitution do not expressly or by implication exclude the consideration and discussion of such points

Does it fall within the legitimate functions of the Bar

Association to consider, discuss and pass resolutions about important current political questions arising from time to time?

I am herewith enclosing a typ d copy of the aims and objects of the West Khandesh Bar Association In addition to your opinion on the above points I also request you to give your opinion whether in view of these objects our association is debarred from considering, discussing and passing resolutions about questions stated above

I shall feel greatly obliged if you are pleased to give me your considered opinion about the above questions at your earliest convenience

I am,
Yours faithfully,

PRESIDENT
W Kh Dist Bar Association
DHULIA

## WEST KHANDESH BAR-ASSOCIATION, DHULIA

The object of the association shall be —

(a) to promote union and co operation among pleaders of the judicial district of West Khandesh,
(b) to preserve their prestige and honour as members of the legal profession and to secure for them higher rights privileges and status and to guard against any professional miscount,
(c) to send representations or deputations to the autho rities concerned wherever advisable in connection with legislative, administrative and other cognate matters affecting the public in general or the legal profession in particular
(d) to take such steps from time to time as may be deemed expedient, to secure greater efficiency and

increased public confidence in the administration of justice; and,

(e) generally to extend the usefulness of the Association.

True-Copy.

B. W. Bhat,
*President,*
W. Kh. Bar Association,
DHULIA

याप्रमाणें पत्र तयार केल्यावर सर तेजबहादूर सप्रू, सत्यमूर्ति, अणे, पा. वा. काणे, दि. व. शिगणे, बी. डी. मेथा (मुंबईच्या ॲडव्होकेट असोसिएशनचे सेक्रेटरी), न. वि. गाडगीळ (मध्यवर्ति विधिमंडळाचे सभासद), ल. ब. भोपटकर यांच्याकडेहि वरीलप्रमाणें पत्रें पाठविलीं. याप्रमाणें पाठविलेल्या पत्रांचीं उत्तरें या कायदेपंडितांकडून आलीं, तीं खालीं दिलीं आहेत.

19 Albert Road, Allahabad,
6 th September, 1936.

From :—

The Rt. Hon. Sir Tej Bahadur Sapru,
P. C., K. C. S. I., Allahabad.

To

Bhaskar Waman Bhat, Esqr.,
President, West Khandesh District Bar Association,
Dhulia.

Dear Sir,

I am in receipt of your letter enclosing a copy of the paragraph of the constitution of your District Bar Association dealing with its objects. You ask me whether in my opinion the Association consistently with its aims and objects could discuss present day politics and matters of public importance. Speaking for myself I am of the opinion that while it is open to the legal profession or an organised association of it t

express its opinion on any pending legislation or on the desirability of introducing legislation on some particular subject it would be very much beyond its professed objects in taking part as an association in current politics Bar Associations are, according to well recognised practice and traditions, associations for professional men to enable them to carry on their professional work or legal studies or to protect their professional interests effectively. They are not, and in my opinion should not be, political associations at all. An association may consist of members who hold different opinions on current day politics but difference on political questions should have no place in an organised professional association. I am myself the president of the Advocates' Association at the Allahabad High Court and I can tell you that we have never discussed or recorded opinions on present day politics.

Yours faithfully,
Sd/ Tej Bahadur Sapru.

Question :—' Does it fall within the legitimate function of the Bar Association to consider, discuss and pass resolutions about important current political questions arising from time to time? '

Answer :—

The objects of the Bar Association are evident from the rules A to E. The section (e) which reads " generally to extend the usefulness of the association " can not be stretched to include any situation not contemplated in Sections A to D. General words must not be interrupted so as to conflict with what has been specifically provided for. General words must be so interrupted as to make the interpretation most harmonious with the subject matter and other passages in the rules. The rule of strict interpretation requires that the language shall be so construed that no cases shall be held to fall within the meaning of the passage, which do not fall within the reasonable

meaning of its terms and the spirit and scope of the enactment. The intention has to be taken into consideration and it must be assumed that only that situation is contemplated and which the passage explicitly declare either in express terms or by clear implication. Bearing these general principles of interpretation in mind, it is not open in terms of the objects of the Association to discuss any and every political question arising from time to time, unless it is covered up by what appears to have been provided in sections A to D.

It is open to the Association to discuss legislative, administrative and other cognate matters, affecting the public in general, or the legal profession in particular, but these matters must have reached a stage when they could be legitimately construed as matters legislative or administrative; it then means that there are legislative and administrative proposals before the Government of the day, in that case, the Association has every right to express its opinion, even sui-moto. A situation may be contemplated, in which, matters, which are of general political interests, will naturally take time to become matters of legislative and administrative importance in the immediate future, such matters may be discussed of a liberal construction of section (c), if it is certain that those matters are immediately or in the proximate stage of becoming legislative and administrative matters. If that condition is not satisfied the Association, cannot discuss it.

Sd/ N. V Gadgil,
B. A, LL B., M. L A. (Central)

18 Cart Road, Simla,
10-9-38

Dear Sir,

I am quite clear in my mind that in view of the objects of your Association which include inter alia sent by representations or deputations to the authorities concerned, whether

of Association and section 2 says that the objects of the Society are part of the Memo of Association You may alter your objects under sec 12 but as long as that is not done, you cannot under the present constitution of your Association discuss purely political questions

This is briefly my reply to the question you have asked me

Yours sincerely,
Sd/— P V. Kane

Date 9-9-1936

Dear Mr Bhat,

In reply to yours of 1 st current, I give my opinion as follows —

For aught I know, there is nothing in the Indian Bar Councils Act or in any other enactment which prevents a Bar Association or a member thereof to express opinion or participate in, any public question or agitative of the day

Object ( c ) of your Association seems to be intended for this purpose

In fact, the Govt themselves often times invite opinion of the Bar Association on important legislative, judicial or administrative measures

Of course the question as to how far this latitude is to be stretched will rest in the discretion of the Bar Association concerned

With regards

Yours sincerely
Sd/ L B Bhopatkar

Re —the 1 st of Sept 1938

Dear Mr Bhat

I would answer the question referred to in your letter of the 1st of Sept last in to the affirmative subject to the limitation referred to below —

( 1 ) Your Association is, in my opinion, entitled to consider, discuss and pass resolutions about important political questions arising from time to time in relation to matters of public importance i. e. affecting the public in general and legal profession in particular provided that is sought to be done constitutionally and with a view " to secure greater efficiency and increased public confidence in the administration of Justice " as laid down in clause (d) of " The objects " of your Association.

( 2 ) But as pointed out by the present Chief Justice in 86 Bom. L. B. 1136 at p. 1149.

" This High Court will not tolerate upon its roll an Advocate who is endeavouring to destroy or undermine the authority of *the Court. Because the court has a right to expect a* high standard of loyalty to the court for co-operation from the Advocates on its roll."

This principle is recognised in Cl. (d) referred to above and I do not suppose you need any enlightenment on this point.

( 3 ) If your Association wishes to take more active part in matters affecting the public in general, it can, in my opinion, do so, provided it steares clear of the pit-fall indicated by the Chief Justice at p. 1148 of the Report and avoids occurrence of cases " in which it is provided that an Advocate has been engaged in revolutionary activities designed to destroy the system of which this Court forms part, or activities likely to hamper or embarrass the administration of Justice by this Court or any of the courts subordinate thereto. Courts of law can only function under a stable Government, and the destruction of Government by revolutionary and unconstitutional *means must of necessity involve the destruction of the courts,* or the grave impairing of their efficiency "

( 4 ) The principle laid down by Sir Norman Maclod in 22 Bom. L. R. 13 at p. 27 that " those who live by the law should keep the law " has been rightly dissented from at p,

1149 of 36 Bom. L. R. because " the obligation of obedience to the law is neither greater nor less in the case of lawyers than of other Citizens " But in the guise of discussing questions under reference the Associations must not allow its premises to be turned into mere political clubs.

Yours sincerely,

High Court, BOMBAY.
Date :— 30th Sept., 1928.

From :—

B. D. Mehta Esq , B. A., LL. B.,
Advocate,
Honorary Secretary,

The Advocates' Association of Western India,
High Court, Bombay.

To,

Bhaskar Waman Bhat, Esq.
President, W Khandesh Bar-Association, Dhulia.

Dear Sir,

With reference to your letter dated the 1st September 1938 addressed to the president of our Association, I am desired by the Council of my Association to state as follows :-

My Council is of opinion that the answer to both the questions in your letter should be in the negative. As regards the second question, although stretching the language of the clauses which form the aim and objects of your Association such important political questions may be included within its objects, still, my Council is of opinion that discussing such

purely political questions and passing resolutions about them should be quite outside the scope and objects of a professed Association of lawyers and not of politicians My Council is in general agreement with the opinion expressed by Dr. Sir Tej Bahadur Sapru on this point.

Yours faithfully,

Yeotmal,

M S. Aney, B A., LL. B, M. L. A.

8th October, 1938.

Dear Mr. Bhat,

I had Been in receipt of your letter dated 1st September 1988 for a long time. I did not think it proper to express any opinion on a point referred to in your letter, as I thought that it was more or less a matter for the members of the local Bar to settle among themselves amicably. Nothing should be done in the Bar Room which is likely to defeat the first object of the Association namely to promote union and co-operation among pleaders of the Judicial District of West Khandesh. Bearing this primary object as the acid test in mind for advancing any subject for discussing and decision the Bar Room can certainly be in a position to settle whether any particular subject should or should not be taken up by them. I read clause ( c ) or the object of the Assoc ation as sufficiently wide to include any subject, but in my opinion it has to be read as controlled by clause A of the objects

Excuse delay in reply.

With my best regards,

I remain,

yours sincerely,
Sd/ M S Aney.

वरील कामदेवंदिताची मतें लक्षात घेतलीं असता दैनंदिन राजकीय महामोहीविषयीं विचार करून मत व्यक्त करणें हें वकील मंडळाच्या कार्यक्षेत्राच्या कक्षेत पडत नाहीं असें दिसून येतें. सर सप्रु यांनीं आपला अभिप्राय निस्संदिग्धपणें दिला आहे.

या जिल्ह्यात वकील मंडळाची स्थापना होऊन त्या मंडळाकडून होणाऱ्या कार्यांचें येथपावेतों दिग्दर्शन केल्यावर दुसऱ्या महायुद्धाच्या काळात इंग्रज नोकरशाहीविषयीं प्रजेचीं मतें कोणत्या प्रकारचीं आहेत याची माहिती न्याय करणाऱ्या सरकारी अधिकाऱ्याकडून मिळविणेचा जो एक नवीन धुट काहीं काळपावेतों उदयास येऊन अस्तंगत पावला त्याची माहिती मनोरंजक असल्याकारणानें तिचें अल्प दिग्दर्शन आम्ही येथें करतों.

नुकत्याच होऊन गेलेल्या महायुद्धापूर्वीच्या समाप्तीपूर्वी १।२ वर्षें जिल्हा कोर्टातील न्यायाधिशानें वकील मंडळीचें व न्यायधिकाऱ्यांचें परस्पर संघटन व्हावें म्हणून एक नवीन प्रघात सुरू करावयाचा ठरविला. महिन्यातून एकदां सर्व वकील मंडळी व न्यायाधिकारी यांनीं एकत्र जमून चहाचिवडा इत्यादिकांचा अल्पोपाहार करीत असता देशातील प्रचलित स्थितीविषयीं विचारविनिमय करावयाचा. हा प्रघात सुरू करण्यापूर्वी वकीलवर्गापैकीं काहीं प्रमुख लोकास जिल्हा न्यायाधिशानीं बोलावून हा प्रघात सुरू करणें इष्ट आहे असें सांगून त्याची सम्मति मिळविली. याच प्रघाताबरोबर दुसरा एक प्रघात सुरू करण्यात आला. तो प्रघात म्हटला म्हणजे जिल्हा न्यायाधीश व जिल्ह्याचे ठिकाणचे फर्स्ट क्लास सब्जज्ज, सेकंड क्लास सब्जज्ज, व ॲडिशनल जॉइंट सब्जज्ज, अधि. सब्जज्ज या अधिकाऱ्यांनीं एकत्र अल्पोपाहाराकरता महिन्यातून एकदा आळीपाळीनें कोर्टातील चेंबरमध्येच एकत्र जमावयाचें हे दोन्ही प्रघात सुमारें वर्ष दीडवर्ष जेमतेम चालू राहून पुढें बंद पडले. न्यायाधिकारी व वकीलवर्ग यांनें आता दर्शविल्याप्रमाणें संघटन घडवून आणण्याचा कोणत्याच प्रकारचा प्रयत्न जिल्हान्यायाधिशानें यापूर्वी कधींच केला नव्हता. हा एकाएकीं नवीन प्रघात सुरू करण्याची आवश्यकता जिल्हान्यायाधिशास का भासावी अशाविषयीं आमचे मनात विचार सुरु झाला. महायुद्धाचे काळात इंग्रज सरकाराविषयीं वकीलवर्गासारख्या समाजातील वजनदार लोकांचीं मतें कशा प्रकारचीं आहेत याची वास्तविक कल्पना इंग्रज सरकारास समजण्याचा मार्ग नव्हता अशा स्थितीत या लोकांचीं मतें समजण्यास्तव सरकारी वरिष्ठ अधिकाऱ्याकडून जिल्हान्यायाधिशास गुप्तपणें वरील प्रघात सुरू करण्यात यावा असें कळविण्यात आलें असावें व यामुळें हा नूतन प्रघात जिल्हान्यायाधिशास सुरू करावा लागला असावा. या प्रघातास अनुसरून वकीलवर्ग, न्यायाधिकारी यांच्या अल्पोपाहारास्तव भरलेल्या एका बैठकीत वकिलांपैकीं एका गृहस्थानें हा नूतन प्रघात काय कारणाकरितां सुरू करण्यात आला आहे ? असा प्रश्न आम्हांस केला. त्यावर या प्रघाताच्या निर्मितीविषयींचा आमचा आता दर्शविलेला तर्क आम्ही येथें जमलेल्या न्यायाधिकाऱ्यास सांगितला. हा आमचा तर्क बरोबर आहे का चुकीचा आहे याविषयीं कोर्टाचा अभिप्राय जिल्हा-

न्यायाधिशानें व्यक्त करणें शोभीचें व इष्ट नसल्याकारणानें केला नाहीं परकीय सरकारच्या राजवटींत प्रजेची मनें कोणत्या प्रकारची आहेत हें समजण्याकरितां ज्या अनेक मसलत्या कराव्या लागतात त्यांपैकीं ही एक बलाप्ति होती ही गोष्ट उघड आहे. हा प्रघात सुरू झाला असतां १॥–२ वर्षांनंतर महायुद्ध समाप्त झालें. तत्पूर्वी हा प्रघात 'रस्तरान बोदयावर' या स्वरूपाचा असल्याकारणानें बंद पडत चालला होता.

---

प्रकरण १४ वें

# वकिलीच्या धंद्यांतून निवृत्ति

तालुका, जिल्हा किंवा हायकोर्ट यांत वकिलीचा धंदा करणारांचें धंद्यातून झालेल्या निवृत्तीविषयीं विवेचन करणेंहि युक्त व मनोरंजक आहे. सरकारी नोकर नोकरींत शिरल्यानंतर त्याची सेवानिवृत्ति कांहीं एका विशिष्ट मर्यादेच्या आंत जशी होते तशा प्रकारें वकिलीचा धंदा करणारे लोक धंद्यातून निवृत्त झाल्याचें क्वचित्च आढळतें. धंदा सुरू केल्यापासून विवक्षित मुदतींत अथवा त्या धंद्यांत विवक्षित धनसंचय झाला, म्हणजे धंद्यातून निवृत्त व्हावयाचें अशी मनोवृत्ति फार थोडया लोकांत आढळून येते विवक्षित कालमर्यादेंत निवृत्त झालें पाहिजे असा सरकारी नियम असल्यानें सरकारी नोकर आपल्या भवितव्य त्या दृष्टीनें धनसंचय करण्याच्या बाबतींत विवक्षित धोरण स्वीकारतात. हें धोरण त्याना सरकारी नियमामुळें स्वीकारावें लागतें व हें त्याना हितप्रद होतें. अशा प्रकारचें धोरण ठरविण्याची वकिलाची प्रवृत्ति नसण्याचें कारण निवृत्त झालेल्या वकिलास सरकारी नोकराप्रमाणें पेन्शन, प्रॉव्हिडेंट फंड वगैरे मिळण्याची जशी सोय असते, तशी नसते. यामुळें ज्या कांहीं वकिलांना धंद्यातून निवृत्त झाल्यावर त्यांचा संसारप्रपंच चालण्याइतका पुरेसा द्रव्यसंचय झालेला असतो, अशा कांहीं थोडया लोकांशिवाय अन्य वकिलाना अखेरपावेतों धंदा करणें भाग पडतें याशिवाय धनसंचय रचाण्यापाशीं बरा आहे, धनलोभास्तव धंद्यातून निवृत्त न होता अखेरपावेतों म्हणजे दृष्टिमांद्यादि शारीरिक दुर्बलता उत्पन्न होऊन धंदा करण्याची असमर्थता येईपावेतों धंदा करीत राहणारे अनेक लोक आढळतात. मुंबई हायकोर्टापैकीं नामांकित बॅरिस्टर मि. इन्व्हेरारिटी याना ऐकूं येईनासें झालें, तथापि ते बॅरिस्टरीचा धंदा करीतच होते अशा प्रकारें धंदा करीत राहिल्यामुळें न्यायाधिशाच्या ठायीं असलेल्या कायदेपंडिताविषयीं अनादर उत्पन्न झाल्याखेरीज राहात नाहीं. एखादा वकील बहिरा असला तर खटला चाल-

वितांना न्यायाधीश काय बोलतो, हें त्याला समजत नाहीं व त्याला हें न समजल्या-मुळें वकील दुसरेच काहीं गोष्ट न्यायाधिशास सांगतो. याप्रमाणें हास्यास्पद प्रकार खटला चालवितांना होऊं लागले म्हणजे त्या वकिलाविषयीं अनादर उत्पन्न झाल्याखेरीज राहात नाहीं. मुंबई हायकोर्टाच्या एका मोठ्या कायदेपंडिताला फार दिवस वकिली-चा धंदा केल्यामुळें अशी संवय लागली कीं, हायकोर्टांत काहीं काम नसलें तरी तेथें एकदां जाऊन काहीं वेळ बसून घरीं परत यावयाचें. धंद्यातून निवृत्त झाल्यावर वेळ घालविण्याचा अन्य मार्ग या वकिलाजवळ नसल्यानें एखाद्या व्यसनी माणसासारखी त्याची स्थिति होत असे. आमच्या जिल्ह्याच्या कोर्टांतील धंद्यातून निवृत्त झालेल्या एकदोन वकिलांचीं उदाहरणें आमच्या डोळ्यापुढें आहेत. तालुका कोर्टांतील एका वकिलानें वकिलीचा धंदा सुरू करतेवेळींच विवक्षित कालमर्यादेंत किंवा विवक्षित धनसंचय झाला कीं धंद्यातून निवृत्त होण्याचें ठरविलें होतें. त्याचा आटोपशीर प्रपंच ही गोष्ट त्याच्या या निश्चयास अनुकूल होती व धंद्यात शिरण्यापूर्वी केलेला निश्चय पार पाडण्याचें भाग्य त्याला लाभलें. धंद्यातून निवृत्त होणाऱ्या आमच्या जिल्ह्याच्या शहरच्या दुसऱ्या एका वकिलाचें उदाहरण नमूद करण्यासारखें आहे. या गृहस्थाचा संसार-प्रपंच आटोपशीर होता व द्रव्यसंचयहि बऱ्या प्रकारें झालेला होता. त्याच्या मनात धंद्यातून निवृत्त होण्याचे येण्याचे सुमारास त्याची बुद्धि अध्यात्म विषयाकडे वळली. वकिलीचा धंदा करीत असतांना त्याचें आचरण गृहस्थाश्रमी ब्राह्मणास अनुरूप असे नव्हतें. परंतु एका सत्प्रवृत्त माणसाच्या संगतीचा त्यास लाभ झाल्यामुळें विष्णुसहस्र-नामाचें पठण, जपजाप्य आदि धार्मिक व्रत-नियमाकडे लागलें व याप्रमाणें त्याची मनोवृत्ति बनल्यानंतर त्यानें धंद्यातून निवृत्त होण्यापूर्वी त्याच्या पक्षकारापैकीं ज्यांचे जे काहीं पैसे त्याच्या जमाखर्चांत जास्त जमा होते, ते सर्व त्या त्या पक्षकाराकडे मनीऑर्डरानें पाठवून दिले. ज्यांच्याकडे घेणें होतें, तें स्वखुषीनें ज्यानें दिलें त्याचें घेतलें व ज्यांनी दिलें नाहीं त्याची क्षिति न बाळगता तो धंद्यातून निवृत्त झाला. या-प्रमाणें तो धंद्यातून निवृत्त झाल्यावर आपल्या जन्मभूमीच्या गांवीं रत्नें ज्या गिरींत होतात, तिकडे परत गेला. अशा प्रकारें धंद्यांतून निवृत्त झाल्याचीं उदाहरणें फारच थोडीं आढळतात.

---

## प्रकरण १५ वें

# चार तपांच्या कालखंडांतील गुन्ह्यांच्या उच्छेदनार्थ

# सरकारी मोहिमा

## व

# कांहीं महत्त्वाचे खटले

या ग्रंथाच्या प्रतिपाद्य विषयाच्या क्षेत्रांत पडणारा एक महत्त्वाचा भाग म्हणजे *आमच्या चार तपांच्या कारकीर्दीत या जिल्ह्यात गुन्ह्यांच्या उच्छेदनार्थ* नोकरशाहीनें केलेल्या सरकारच्या महत्त्वाच्या हालचालींविषयीं माहिती देणें व कांहीं महत्त्वाच्या खटल्यांची मनोरंजक हकीकत सांगणें हा होय. आमच्या जिल्ह्याच्या उत्तरेस, डोंगराच्या रांगा पूर्वपश्चिम पसरलेल्या असून तेथें भिल्ल लोकांची बरीच मोठी वस्ती आहे. भिल्ल जातीचे लोक फार प्राचीन काळापासून उच्च संस्कृति असलेल्या आर्य लोकांच्या सान्निध्यांत राहात आहेत. तथापि या निकट सहवासानें आर्यांची संस्कृति त्यांना ग्रहण करतां आली नाहीं. रानावनांत राहून गवत, लाकडें, रानांत मिळणारीं फळफळावळें इत्यादि पदार्थ मिळवून त्यांची विक्री शेजारच्या खेड्यांत वा शहरांत करून आपला चरितार्थ या जातीचे लोक चालवितात. याशिवाय हे लोक चोऱ्या करण्यांत व दरोडे घालण्यांत पटाईत असतात. या जातींतील लोकांस जमिनी देऊन त्यांनीं शेतीवर उदरनिर्वाह करावा, या उद्देशानें सरकारनें बरेच प्रयत्न केले, परंतु त्याचा विशेष उपयोग झाला नाहीं. या जातींपैकीं पावरे भिल्ल या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या जातींतील लोक शेतीचा धंदा करून आपली उपजीविका करितात. परंतु या पोटजातीच्या भिल्लांशिवाय अन्य जातीचे भिल्ल अत्यंत मागासलेले असून त्यांच्या स्वभावांत व संस्कृतींत म्हणण्यासारखा फरक झालेला नाहीं. आम्ही ज्या सालीं या जिल्ह्यांत वकिली करण्याकरितां आलों त्या वेळीं मुंबई इलाख्यांतील इतर जिल्ह्याप्रमाणें याहि जिल्ह्यांत फार मोठा दुष्काळ पडला होता. सरकारनें सुरू केलेल्या सडी फोडण्याच्या कामावर हजारों लोक सडी फोडण्यास आपापलीं गांवें सोडून गेले होते. गांवांत सुखी व सधन लोक राहिले होते. याच सुमारास या भिल्ल जातीच्या लोकांत चोऱ्या व दरोडे घालण्याची साथ एकाएकीं उदयास आली. वर उल्लेखिलेल्या डोंगराच्या दक्षिण बाजूस पूर्वपश्चिम वाहणारी एक नदी असून डोंगरपायथा व नदी या दरम्यानचा प्रदेश अत्यंत सुपीक आहे. या टापूंतील अनेक खेड्यांत राहणारे शेतकरी सुखी असून त्यांच्यापाशीं धनसंचयहि बऱ्या प्रकारचा असे. डोंगरांतील भिल्लांपैकीं धें-सव्वाशें लोकांच्या दहा पंधरा टोळ्या निर्माण होऊन त्यांनीं या प्रदेशांत असलेल्या खेड्यांतून दरोडे घालण्याचा उपक्रम सुरू केला.

टोळींतील दहापंधरा लोकांचें पुढारीपण एकदोन भिल्लांनीं स्वीकारावयाचें व रात्रीचे वेळीं खेडेगांवावर एकाएकीं हल्ला करावयाचा असा या लोकांचा परिपाठ सुरू झाला. हे लोक द्रव्य मिळविण्यासाठ लोकांवर अनन्वित जुलूम करीत व त्यांच्या या जुलमांतून सोडवणूक करून घेण्यासाठीं निरुपायास्तव जवळचें सर्व द्रव्य या दरवडेखोरास दाखवून देणें भाग पडे. याप्रमाणें ठिकठिकाणीं अनेक दरोडे पडल्यावर रयतेचें रक्षण करण्यास्तव पोलिस खात्याकडून बंदोबस्त करणें सरकारास प्राप्त झालें. या जिल्ह्यांत भिल्ल जातीच्या हत्यारी पोलिसांच्या तुकडया ठेवण्याचा प्रघात इंग्रजी राज्याच्या सुरुवातीपासूनचा आहे. दरवडयाचा बंदोबस्त करण्याचें काम सरकारनें या हत्यारी पोलिसांकडूनच करविलें. सरकारनें केलेल्या या उपाययोजनेमुळें दरवडयाच्या प्रसारास आळा बसला. चोऱ्या व दरोडे यांच्या उच्छेदनार्थ केलेल्या या उपाययोजनेंतून आठदहा मोठमोठे फौजदारी खटले उत्पन्न झाले यांपैकीं कांहीं खटल्यांची चौकशी या जिल्ह्याच्या सेशन जज्जाकडून व कांहींची चौकशी या जिल्ह्याचा पोलिटिकल एजंट या नात्यानें येथील कलेक्टरकडून केली गेली. या खटल्यांपैकीं दोन खटले फार महत्त्वाचे होते. एकांत पठाणासारखा उंच धिप्पाड, गोरा असा एक भिल्ल आरोपी होता. दरोडा घातल्यानंतर लुटलेला माल पळवून नेताना एका फौजदाराच्या हाताखालील पोलिसानें त्याच्यावर छापा घातला त्यांत एक फौजदार दरोडेखोराची गोळी लागून ठार झाला. या आरोपीनें त्याचेतर्फे खटला चालविण्याचें कामीं या जिल्ह्यांत वकिलीच्या धंद्यात नुकत्याच शिरलेल्या एका वकिलास वकिलपत्र दिलें. हा भिल्ल लो. टिळकांना राजा मानीत असे व या राजाच्या मर्जीतला हा वकील आहे, असें त्यास माहीत झाल्यावरून त्यानें त्यास वकिलपत्र दिलें होतें. खटला एका शांत स्वभावाच्या मुसलमान न्यायाधिशापुढें आठदहा दिवस चालला. फिर्यादीतर्फे अनेक साक्षीदारांच्या जबान्या, त्यांची उलटतपासणी मनमुरादपणें या वकिलानीं केली, यामुळें तोंडी पुरावा अविश्वसनीय आहे, असें न्यायाधिशाचें मत होऊन या आरोपीस निर्दोषी ठरवून सोडून दिलें. अशा या बंडखोर दरोडेखोरास सोडून दिल्यामुळें पोलिस अधिकारी या आरोपीवर करडी नजर ठेवूं लागले व त्यास थोडाफार जाचहि होऊं लागला. अखेर हा भिल्लानें हा जिल्हा सोडून देऊन दुसऱ्या एका लगतच्या संस्थानांत नोकरी धरली व तो आपला चरितार्थ चालवूं लागला. हा खटला झाल्यानंतर हा भिल्ल दरोडेखोरीपासून पूर्ण परावृत्त झाला. याप्रमाणें या आरोपीचा निकाल लागल्यावर दुसऱ्या एका पाचसहा भिल्लांच्या दरवडेखोर टोळीवर सरकारनें दरवडे, खून इत्यादि गुन्हे केल्याबद्दल खटला सुरू केला. या वेळीं पूर्वीचे मुसलमान जज्ज बदलून त्यांचे जागीं विश्वामित्रासारखे कोपिष्ट गुन्हेगारांचे दुष्मन असे एक न्यायाधीश येथें आले. त्यांच्या पुढें चालणाऱ्या या खटल्यांत भिल्ल आरोपींनीं वरील वकिलासच वकीलपत्र दिलें या खटल्यांतील आरोपींपैकीं दोन भिल्ल प्रमुख होते, त्यांपैकीं एकास सरकार असें म्हणण्याचा प्रघात पडला होता, दुसरा भिल्ल हा त्याचा दुय्यम मदतगार होता. या सरकारानें कामांत

पूर्वी चाललेल्या खटल्याप्रमाणें आरोपीतर्फेचे वकिलास फिर्यादीतर्फेच्या साक्षीदारास उलटतपासणी करण्याची मुभा मिळाली नाहीं. वकिलांनीं उलटतपासणी केल्यावर स्वतः न्यायाधीश साक्षीदार खरें बोलणारा आहे कीं खोटें बोलणारा आहे याची खातरी करून घेण्याकरतां सवाल करीत. याप्रमाणें खटल्याचें काम चालू असतां मुख्य आरोपीनें त्याच्या वकिलास असें सांगितलें कीं, काय वाटेल ती खटपट करून माझ्या या मदतगारास दोषमुक्त करा. याविषयींचें कारण सरकारीनें मुख्य आरोपीस वकिलानें विचारलें असतां हा मदतगार म्हणजे मुख्य आरोपीनें ठेविलेल्या एका मिस्त्रिणीपासून झालेला मुलगा होता व ठिकठिकाणीं घातलेल्या दरवड्यातील संपत्ति कोणकोणत्या स्थळीं गाडून ठेविली आहे, याची त्यास माहिती होती. या खटल्यातील न्यायाधिशानें सर्व आरोपींवर गुन्ह्याची शाबिती धरून मुख्य आरोपी व त्याचा साथीदार यांना फाशीची व इतरांना जन्मठेप काळ्यापाण्याची शिक्षा सुनावली

या जिल्ह्यात याप्रमाणें जे कित्येक चोरीचे व दरवड्याचे खटले झाले, त्याच्या तपासात पोलिसांना असें आढळून आलें कीं, या भिल्ल गुन्हेगारांना खेडेगांवांतील पाटील, सावकारी करणारे मारवाडी व्यापारी यांचा पाठिंबा असतो. यामुळें चोरी व दरोडे घालणें या गोष्टी त्यांना सहज करतां येतात. या जिल्ह्यांतील या जिल्ह्याचा मुख्य पोलिस अधिकारी फिरत असतां एका पंचवीस हजार लोकवस्तीच्या शहराच्या भागात मोठमोठीं घरें बांधलेलीं त्याला आढळलीं या भागांत कोणत्या जातीचे लोक राहतात याचा त्यानें तपास केला असतां तेथें सोनार जातीचे लोक राहतात, असें कळलें या लोकांना अशा प्रकारच्या इमारती बांधण्यास लागणारें द्रव्य कसें प्राप्त झालें याविषयीं त्याच्या मनात विचार उत्पन्न होऊन त्यानें याबद्दल सरकारीनें तपास केला. चोऱ्या करणाऱ्या भिल्ल लोकांकडून अल्प किंमतीस चोरीचा बहुमोल माल विकत घेण्याच्या धंद्यात जी द्रव्यप्राप्ति होते, त्या प्राप्तीमुळें हे लोक सधन झाले आहेत, असें त्या तपासात त्याला समजून आलं याप्रमाणें पोलिस अधिकाऱ्यांना दरोड्याच्या उच्छेदनार्थ सुरू केलेल्या मोहिमेंत तपासाअंतीं जी माहिती मिळाली, त्या माहितीतून गुन्हेगारांच्या उच्छेदनार्थ सरकारनें दुसरी एक मोहीम सुरू केली ती म्हणजे क्रि प्रो. कोडमधील चॅप्टर ॲक्टान्वयें चांगल्या वर्तणुकीचे चोरी, दरवडे, चोरीचा माल घेणारे व चोरी दरवडे करण्यास उत्तेजन देणार असे पोलिसतपासात जिल्ह्यात सर्व ठिकाणीं जे जे लोक आढळून आले, त्यांच्यावर वर नमूद केल्याप्रमाणें खटले भरण्याचें सत्र सरकारनें सुरू केलें त्या वेळीं सरकारच्या मर्जीतील एक डिस्ट्रिक्ट कलेक्टर, रावबहादुर पदवी घेऊन ज्याचा सरकारनें गौरव केला होता, अशा एका अधिकाऱ्याची वरील खटले चालविण्यासाठीं स्पेशल मॅजिस्ट्रेट म्हणून सरकारनें नेमणूक केली या मॅजिस्ट्रेटच्या हाताखालीं तीन कारकून देण्यात आले व गांवोगांवीं त्यानें जाऊन वरील खटल्यांची चौकशी त्या त्या गांवीं करून खटल्याचा निकाल करावा, असा उपक्रम सुरू झाला. या कामीं पोलिसांकडून सरकारतर्फेचा पुरावा जो

करण्यात येत असे, तो एकाच स्वरूपाचा असे. हा पुरावा म्हणजे चोऱ्या व दरवडे. या खटल्यात पूर्वी चौकशी होऊन शिक्षा झालेल्या आरोपीस कोर्टापुढें आणण्यांत येत असे; व त्या गावातील पोलिसाच्या बगलेतील एकदोन लोक साक्षीदार म्हणून पुढें आणून अमुक वेळीं या आरोपीस, भाकरी देताना ज्या इसमावर खटला चालू असे, त्याला पाहिलें व त्याच्याकडून माल विकत घेतला असें वदवावयाचें याप्रमाणें पुरावा झाला कीं लगेच एकदोन वर्षेपावेतों चांगल्या वर्तणुकीचा जामीन देण्याचा हुकूम मॅजिस्ट्रेट करीत असत. जामीन न दिल्यास त्या मुदतींत तुरुंगात राहावें असा हुकूम करीत. याप्रमाणें खटल्याचा निवाडा झाल्यावर याप्रमाणें शिक्षा सुनावलेल्या आरोपीनें त्याच्या गावांतील एखाद्या इसमास जामीन म्हणून हजर केलें, तर त्याच्या-वरहि चागल्या वर्तणुकीचा जामीन घेण्याचें काम सुरू करण्यात येत असे याप्रमाणें एकदोन उदाहरणें घडल्यावर अशा खटल्यात जामीन म्हणून हजर राहण्यास कोणी धजावला नाहीं. अशा पद्धतीनें एका वर्षाच्या आत या स्पेशल मॅजिस्ट्रेटकडून जिल्ह्यातील झाडून चोरीचा माल घेणारे सावकार, चोरास मदत करणारे पाटील व अन्य लोक यांचेकडून चागली वर्तणूक ठेवण्याकरिता जामिनकीच्या खटल्यांचें सुरू करण्यात आलेलें सत्र समाप्त झालें व जिल्ह्यातील गुन्हेगारीचा बराचसा नायनाट झाला.

कांहीं वर्षांमागें हिंदुस्थानातील बहुतेक सर्व रेल्वेवर नाना प्रकारच्या मालाची वाहतूक रेल्वेच्या मालगाड्यातून चालू असता रेल्वे नोकरांपैकीं स्टेशनावरील बहुतेक सर्व लोक मालाच्या चोऱ्या करीत. यामुळें मालाच्या मालकाचें फार नुकसान होऊं लागलें. या चोऱ्यांना इतका ऊत आला कीं, कोणताहि माल असो आणि तो कोणाचाहि असो, ज्या स्टेशनवरून माल रवाना होई तेथें केलेल्या वजनाचा माल मालकास कधींच मिळत नसे. हा प्रकार चालू असता आमच्या एका माहितीच्या स्टेशनमास्तरकडील एक प्रकार कानावर आला, तो असा कीं, स्टेशनमास्तरच्या महशीला देण्यात येणाऱ्या खुराकात खारका, खोबरें, बेदाणा इत्यादि पदार्थ असत. याशिवाय स्टेशनमास्तरचे गावात राहाणारे परिचित लोक यानाहि त्यांचेकडून य जिनसांचा लाभ थोडाफार होत असे. रेल्वेवरील वाहतुकींत घडणाऱ्या या अंदा-धुंदीची ओरड बरीच झाली. याच सुमारास रेल्वेकायदा व या कायद्याअन्वयें करण्यांत आलेल्या नियमाप्रमाणें रेल्वेकडून होणाऱ्या मालाच्या घटीबद्दल मालक ास रेल्वेकडून नुकसानभरपाईच्या दाव्याचें सत्र सुरू झालें. एका धंदेवाईक वकिलानें हिंदी, मराठी, गुजराथी या भाषात रेल्वेमार्गानें पाठविण्यांत येणाऱ्या मालाच्या संबंधाच्या नियमांची माषांतरें छापून प्रसिद्ध केलीं व याच्या लाखों प्रती अनेक ठिकाणच्या व्यापारी लोकांत वाटल्या. याशिवाय या वकिलानें साक्षात् घट आलेल्या मालाच्या नुकसानभरपाईचे दावे रेल्वे कंपन्यांविरुद्ध दाखल केले. हे दावे यशस्वी होऊन रेल्वे कंपन्यांकडून नुकसानभरपाई मिळते, अशी व्यापाऱ्यांची खातरी होतांच अशा दाव्यांना फार मोठा ऊत आला; तो इतका कीं, अशा प्रकारें रेल्वेवर

दाखल झालेल्या फिर्यादींत हजर होऊन रेल्वेकंपनीविरुद्ध तक्रारी दाखल करण्याकरितां अनेक वकील दरमहा १००।२०० रु पगार देऊन रेल्वे अधिकाऱ्यास नेमावे लागले. या सर्व दाव्याचा निकाल रेल्वेच्या विरुद्ध होऊन हजारों रुपये नुकसानभरपाई म्हणून मालाच्या मालकास देण्याचा प्रसंग रेल्वेकंपन्यावर ओढवला. याप्रमाणें रेल्वेकंपन्यावरील नुकसानभरपाईच्या दाव्याची मोहीम सुरू झाल्यानंतर रेल्वेच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांचें लक्ष या विषयाकडे गेलें. रेल्वेमार्गानें नेण्यात येणाऱ्या मालाच्या चोऱ्या, रेल्वे स्टेशनवर जो माल गुड्स् यार्डात ठेवण्यात येत असे, त्या ठिकाणाहून होत असत. याशिवाय स्टेशनमास्तर, गुड्स् क्लार्क, हमाल हेहि मालाची पोतीं फोडून त्यांतील माल काढून घेत असत. या पद्धतीनें होणाऱ्या चोऱ्यांच्या बाबतींत बंदोबस्त करण्याकरितां सैन्यांतील पेन्शनर शिपायांच्या गुड्स् यार्डची रखवाली करण्याकरितां नेमणुका केल्या व रात्रीं गुड्स् यार्डाचे आसपास अवेळीं १० यार्डाचे आंत फिरतांना दिसला तर त्यास बंदुकीची गोळी घालून ठार मारण्याचा अधिकार दिला. रेल्वे अधिकाऱ्यांनीं ही गोष्ट केल्यामुळें रेल्वेच्या गुड्स् यार्डमधील मालाची चोरी होण्याचें अजिबात बंद पडलें. याशिवाय रेल्वे अधिकाऱ्यांनीं दुसऱ्या एका मार्गाचें अवलंबन केलें होतें; तो मार्ग म्हणजे माल ताब्यात घेतांना मालाचें वजन करून तो कमी भरला, तर त्याची भरपूर किंमत स्टेशनवरील नोकराकडून भरून घेण्यास सुरवात केली. माल कमी आल्यामुळें तूट आलेल्या मालाच्या किंमतीची जबाबदारी रेल्वे नोकरावर येऊं लागल्यामुळें मालाची चोरी करणें रेल्वे नोकराना फार महाग पडूं लागलें. यामुळें रेल्वे नोकराकडून मालाच्या चोऱ्या होण्याचें बंद झालें. याप्रमाणें रेल्वे कंपन्यांनीं जी उपाययोजना केली, तिचा सुपरिणाम होऊन शेंकडों व्यापाऱ्यांचें होणारें अपरिमित नुकसान बंद पडलें. याप्रमाणें युक्त उपाययोजना अमलांत आल्यावर रेल्वेवरील अशा दाव्यांचें सत्र ओसरूं लागलें.

येथपावेतों नमूद केलेल्या गुन्हेगारीच्या उच्छेदनार्थ सरकारनें सुरू केलेल्या मोहिमांचें वर्णन केल्यावर सरकारनें आणिक एका सुरू केलेल्या मोहिमेचा उल्लेख करणें जरूर आहे. या जिल्ह्यांतील गुन्हेगारी नष्ट करण्याकरितां पोलिस अधिकाऱ्यांनीं एक नवीन शकल अशी काढली कीं, भिल्ल व तत्सम अन्य गुन्हेगार जातींपैकीं निरनिराळ्या ठिकाणीं चोऱ्या करणाऱ्या व दरोडे घालणाऱ्या ज्या लोकांना पूर्वी याबद्दल शिक्षा झालेल्या होत्या, असे सर्व लोक आपली एक टोळी बनवून चोऱ्या करतात व दरोडे घालतात, अशा स्वरूपाचे फौजदारी खटले सुरू करण्याचा घाट घालण्यात आला. जिल्हा न्यायाधीशापुढें अशा प्रकारचा खटला यशस्वी होण्यास्तव फिर्यादीतर्फे निरनिराळ्या आरोपींचा संबंध परस्पराशीं असल्याचें शाबीद करण्यासाठीं कांहीं साक्षीदाराचा अथवा आरोपींपैकीं माफी दिलेल्या साक्षीदाराच्या पुराव्याची आवश्यकता असते. या कल्पनेप्रमाणें या जिल्ह्यांत वीसपंचवीस आरोपींवर फौजदारी खटला भरण्यात येऊन या सर्व आरोपींवर गुन्हा शाबीत करण्यात येऊन त्यांना शिक्षा करण्यात आली. हा खटला यशस्वी झाल्यावर असाच एक

दुसरा खटला सुरू करण्याचा पोलिसांचा विचार चालू असता भिल्ल शर्तीपैकीं चारपांच गुन्हेगाराच्या बायकांवर जुलूम जबरदस्ती करून त्यांच्याकडून फौजदारी खटल्यास उपयोगी पडतील असे जबाब घेण्यात आले. या गोष्टीचा बराच गवगवा होऊन या जिल्ह्यांतील कांहीं वकील मंडळींनीं या बाबतींत विचारपूस करण्याचें ठरविलें. भिल्ल बायकांनीं पोलिसांपुढें दिलेले जबाब स्वखुषीनें दिलेले नसून मारहाण केल्यामुळें दिलेले आहेत असें निष्पन्न झाल्यावर या गोष्टीची बोंब वरिष्ठ पोलिस अधिकाऱ्याचे कानावर गेली. यानंतर पोलिसांनीं हा खटला भरण्याचा नाद सोडून दिला. वर नमूद केलेल्या गुन्हेगारीच्या उच्छेदनार्थ उदयास आलेल्या सरकारी मोहिमांचें दिग्दर्शन केल्यावर याच कालखंडात दिवाणी दाव्यासंबंधीं उदयास आलेल्या व १।२ वर्षांत अस्तंगत पावलेल्या एका घटनेचें प्रस्तुत स्थळीं दिग्दर्शन करणें जरूर आहे. ही घटना म्हणजे या जिल्ह्यांतील जिल्हा व तालुका कोर्टांत आलेला लवादनिवाड्याचा महापूर ही होय.

## लवादनिवाड्याचा महापूर

या जिल्ह्यांतील तालुक्याच्या व जिल्ह्याच्या ठिकाणच्या दिवाणी कोर्टांत सन १९३० सालानंतर लवादनिवाड्याचा एक महापूर येऊन गेला. त्याविषयींची माहिती मनोरंजक असल्यामुळें ह्या भागात दिली आहे.

दिवाणी कोर्टाचा सर्वसाधारण परिपाठ असा असे कीं, खाजगी रीतीनें वादी व प्रतिवादींनीं एखाद्या वादाचा पंच नेमून निवाडा करून घेतला व तो कोर्टांत दाखल करून त्याअन्वयें हुकुमनामा करून मिळावा, असा अर्ज केला तर तो कोर्टाकडून सहसा मान्य केला जात नसे. अशा प्रकारचे पंचाचे निवाडे पक्षकारांतील खरोखरच्या वादाचे नसून ह्या वादाविषयीं कोर्टांत दावा दाखल केला तर दाव्यास लागणारा कोर्ट फी स्टॅंप वांचविण्याचा हेतु वादी व प्रतिवादीचा असतो, असें दिवाणी कोर्टाचा न्यायाधीश गृहीत धरून चालत असे व अशा प्रकारच्या लवादनिवाड्यावरून हुकुमनामे दिवाणी कोर्टाकडून केले जात नसत. परंतु सन १९३० सालानंतर असा एक चमत्कार या जिल्ह्यांतील सर्व ठिकाणच्या दिवाणीकोर्टांत घडून आला कीं, लाखों रुपयांच्या देवघेवीच्या व्यवहाराचे पंचनिवाडे, सर्वत्र मान्य करणेंत येऊन त्याअन्वयें हुकुमनामे करण्यांत आले. हा प्रकार बरोबर एक वर्ष चालला होता. त्यानंतर अशा प्रकारचे पंचनिवाडे, दिवाणीकोर्टांत दाखल करून, त्यावरून हुकुमनामे करण्याचें बंद पडलें. हा चमत्कार कोणत्या कारणामुळें घडला असावा, याची वरिष्ठ दर्जाच्या सरकारी अधिकाऱ्याच्या कचेरींतील अंतस्थ माहिती बाहेर आलेली नाहीं. तथापि ह्या चमत्काराचे मुळाशीं कोणतें कारण असावें, यांविषयींचा आमचा समज आम्ही येथें नमूद करतो. मागें दर्शविलेल्या पंच निवाड्याच्या महापुरामुळें, सरकारचें लाखों रुपयांचें कोर्ट फी स्टॅंपाचें उत्पन्न, या जिल्ह्यांतील या महापुरामुळें बुडालें. ह्या जिल्ह्याशिवाय मुंबई इलाख्यांतील अन्य जिल्ह्यांतील तालुका व जिल्ह्याच्या

कोर्टांत अशाच प्रकारच्या लवादनिवाड्याचा महापूर आला होता की नाही हें आम्हास माहीत नाहीं. परंतु ही गोष्ट गृहीत धरली तर मुंबई सरकारचें या सालात कोर्ट फी स्टँपाचें दहावारा कोट रुपयांचें उत्पन्न बुडालें असावें, असा अंदाज आहे

हा लवादनिवाड्याचा महापूर येण्यापूर्वी ह्या जिल्ह्यांत दिवाणी दाव्याचे कामाची वाढ साल दरसाल वाढत्या प्रमाणांत होत होती. ह्या जिल्ह्याचे ठिकाणी दोन दोन अधिक फर्स्टक्लास 'सबजज्ज' व 'जॉईंट सबजज्ज' ह्यांच्या नेमणुका सरकारकडून होत असूनहि दिवाणी कोर्टांत दाखल होणाऱ्या दाव्याचें प्रमाण म्हणण्यासारखें हटलें नाहीं. अधिक न्यायाधिशांच्या नेमणुका करूनहि कोर्टाचें काम हटणें शक्य नाहीं, असें सरकारास आढळून आल्यावर, खाजगी रीतीनें करण्यांत आलेले लवादनिवाडे मान्य करून, त्याअन्वयें हुकुमनामे करण्याच्या धोरणात फरक करावा व वादी प्रतिवादी यांनी लवादनिवाडे करून घेतल्यास, ते मान्य करून, त्याअन्वयें हुकुमनामे करण्याचे बाबतींत दिवाणी कोर्टानें, बिलकूल अडथळा आणूं नये, असें मुंबई इलाख्यांतील निरनिराळ्या जिल्ह्याच्या न्यायाधिशांना वरिष्ठ सरकारी अधिकाऱ्यानें कळविलें असावें. या सरकारच्या धोरणास अनुसरून लवादनिवाड्याचा महापूर ह्या जिल्ह्यांत अवतरला असावा असा आमचा समज आहे. पगारी अधिकारी न्यायाधीश नेमावयाचा खर्च केव्हांहि सरकारास कोर्ट फी स्टँपच्या उत्पन्नाच्या मानानें, बराच करावा लागतो. ही गोष्ट लक्षात घेऊन, मुंबई सरकारनें लवादनिवाडे मान्य करून, त्याअन्वयें हुकुमनामे तयार करण्याचें धोरण स्वीकारलें असावें, असें दिसतें. ह्या लवादनिवाड्याचा चमत्कार, ज्या मार्गें नमूद केलेल्या साली घडून आला, त्या सालानंतर हा महापूर ओसरला व दिवाणी कोर्टांत लवादनिवाडे दाखल करून, हुकुमनामे मिळविण्याचें बंद पडलें. या महापुराचे वेळीं, वकिलाचे कारकुनांनीं चांगली कमाई केली. लवादनिवाड्याचे कामीं, निवाड्याच्या रकमेवर वकिलीची रक्कम वकिलास देऊं लागूं नये म्हणून वकिलाच्या कारकुनाना पक्षकारांनीं हातीं धरून ५।१० रुपये त्यास देऊन, मोठमोठ्या रकमेचे लवादनिवाडे करून घेतले लवादनिवाडा करण्याविषयींचा पक्षकाराचा करारनामा, कोर्टांत लवादनिवाडा दाखल करून घेण्याचा अर्ज (लवादनिवाडा) व तो निवाडा मान्य असल्याची रिणकोची कबुलीची कैफीयत, असे ठराविक साच्याचे मसुदे, वकिलाच्या कारकुनांनीं तयार करून घेऊन त्या साच्यात अनेक लवादनिवाडे बाहेर काढण्याची टंकसाळ सुरू केली. ह्या महापुराचे वेळीं, सकाळीं रिणकोनें धनकोस 'प्रॉमिसरी नोट' लिहून द्यावयाची व तत्काळ ह्या रकमेचा लवादनिवाडा वरील साच्यांतून बाहेर काढावयाचा अशीं शेंकडों उदाहरणें झालीं. लाचखाऊ न्यायाधिशांनीं ह्या पर्वणींत आपलें उखळ पांढरें करून घेतलें. या जिल्ह्यातील एका तालुका कोर्टाच्या न्यायाधिशानें, त्याच गावांतील एका बड्या सावकाराचे दीड दोन लाख रुपयाचे लवादनिवाडे करून देऊन, बरीच मोठी रक्कम त्या सावकाराकडून मिळविली. या लवादनिवाड्याचे महापुराचे वेळीं एका बड्या सावकारानें, त्याच्या

रजपूत रिणकोकडून एक लबाडीचा गहाणाचा लवादनिवाडा करून घेतला होता. ह्या लवादनिवाड्याचे बजावणींत ह्या रजपूत रिणकोची स्थावर मिळकत १२ वर्षांनंतर विक्रीस निघाली तेव्हां सावकाराची लबाडी त्याचे लक्षांत येऊन, त्यानें कनिष्ठ कोर्टाकडे मिळकतीची विक्री होऊं नये म्हणून तक्रार केली. कनिष्ठ कोर्टानें ती मान्य न केल्यामुळें, कनिष्ठ कोर्टाच्या ठरावावर, त्यानें अपील दाखल केलें. जिल्हान्यायाधिशापुढें, ह्या अपिलाची तक्रार वकिलामार्फत मांडली गेली, त्या वेळीं लवादनिवाड्यांतील लबाडी जिल्हा-न्यायाधिशाचे लक्षांत येऊन, लवाद-निवाड्यान्वयें हुकुमनामा करणाऱ्या तालुका न्यायाधिशाच्या वर्तनाविषयीं त्यास संशय आला व या संशयावरून, या न्यायाधिशानें, लवादनिवाड्यास मंजुरी देणाऱ्या तालुका न्यायाधिशाचे कारकीर्दींत किती लवादनिवाडे झाले, याचा तपास केला व ह्या तपासाअंतीं तालुका न्यायाधिशानें, फार मोठी रक्कम लांच खाऊन हा सर्व प्रकार केल्याविषयींची त्याची पक्की खात्री झाली. त्यानंतर जिल्हा न्यायाधिशानें, हें सर्व प्रकरण, मुंबईच्या हायकोर्टाच्या नजरेस आणलें. हायकोर्टानें लवादनिवाडा करणाऱ्या मुन्सफास लांच खाल्ल्याबद्दल फौजदारी खटला करून घेण्याची तयारी आहे का सेवानिवृत्त होण्यास तयार आहांत, अशी त्यास विचारणा केली. त्यावर सेवानिवृत्त होण्यास तयार आहे असें त्या न्यायाधिशानें हायकोर्टास कळवून, त्याचेवर येणारें अरिष्ट त्यानें टाळलें. न्यायदानाचे क्षेत्रांत हा जो लवादनिवाड्याचा महापूर चमत्कारिकपणें अवतरून कसा समाप्त झाला याची ही हकीकत मनोरंजक नाटक्या-सेरीज राहणार नाहीं.

आतां कांहीं महत्त्वाच्या दोन तीन खटल्यांचा उल्लेख यापुढें आम्हीं केला आहे. ज्या पहिल्या खटल्याची हकीकत आम्ही देणार आहों, त्या खटल्याचें नांव खोटा जमाखर्च करणाऱ्या व्यापाऱ्यावर ओढवलेली अनर्थपरंपरा असें आम्ही देतों. या जिल्ह्याच्या पूर्व भागांत एका तालुक्याचे गांवीं एक सावकारी करणारा मारवाडी व्यापारी होता. देवघेवीचा व्यापार वडिलोपार्जितपासूनचा बराच मोठा असून त्याचा जमीनजुमलाहि मोठा होता. न्यायानें व सरळपणानें रिणकोशीं वागून सावकारीचा धंदा करणारे फार क्वचित् आढळतात. कुळाकडून आलेला वसूल जमा न करितां तो परविणें, दीडदोन रुपये शेंकडा व्याज घेऊन रुपया दीडपटीपेक्षा अधिक व्याज आल्याचें जमाखर्चावरून दिसून न यावें म्हणून खोटा जमाखर्च करणें इत्यादि कल्पना द्रव्यसंपादनार्थ करणारे सावकार बरेच असतात. यापैकींच हा एक सावकार होता. एका मुसलमान शेतकऱ्यानें या सावकाराकडून कर्जाऊ रकमा घेऊन त्याचे पोटीं आपल्या कांहीं शेतजमिनी गहाण दिल्या. याशिवाय सावकारास प्रॉमिसरी नोटा त्याचेकडून काढलेल्या कर्जाबद्दल लिहून दिलेल्या होत्या. या जिल्ह्यास शेतकी ॲक्ट लागू होताच वरील रिणकोनें एका वकिलाच्या सल्ल्यानें सावकाराशीं केलेल्या सर्व देवघेवी व्यवहाराचा हिशेब घेण्यांत यावा असा दावा फर्स्ट क्लास सब-जज कोर्टांत दाखल केला. याप्रमाणें दावा दाखल करतांच सावकारानें

रिणकोंनें लिहून दिलेल्या प्रॉमिसरी नोटीवरून सर्व दावे कोर्टांत दाखल केले. रिणकोंचा दावा व सावकारानें दाखल केलेले सर्व दावे सावकार व रिणको यांच्या दरम्यान झालेल्या देवघेवीच्या व्यवहारापैकीं असल्यामुळें या सर्व दाव्यांची चौकशी एकत्र करण्याचें न्यायाधिशानें ठरविलें. या दाव्यांतील रिणको शेतकरी असल्यानें गहाणाच्या व हातावरील कर्जाचे जमाखर्च सावकारास कोर्टांत दाखल करणें प्राप्त होतें व त्याप्रमाणें सावकारानें हे सर्व जमाखर्च (असल) व त्याचे उतारे दाखल केले. शेतकी ॲक्टाप्रमाणें रिबेट घेतला असतां आपलें नुकसान होऊं नये म्हणून त्या सालीं देवघेवीचा व्यवहार सुरू झाला, त्या सालच्या जमाखर्चांत व्यवहार रोखीचा झाला आहे, हें दाखविण्याकरितां खोडाखोड केली व खोडाखोड असलेले हे असल जमाखर्च त्यानें कोर्टांत हजरहि केले. या सावकाराच्या मनांत हें पाप एतत डाचत असल्यामुळें दाव्याचा मरतालस्ता निकाल होऊं नये म्हणून त्या मुनसफापुढें हा दावा चालावयाचा होता, त्यांची बदली या शहरीं होण्यापूर्वी ते एका या जिल्ह्यांतीलच्या तालुक्याच्या गांवीं सेकंडक्लास सबजज्ज म्हणून काम करीत होते. तेथें असतांना त्या गांवच्या एका प्रतिष्ठित मारवाड्याशीं त्यांचा परिचय झाला होता. आमच्या पक्षकाराच्या [ वरील घनको मारवाड्याच्या ] मनांत त्यानें केलेलें पाप डाचत असल्यानें त्यानें सर्व दाव्यांत आम्हांस वकीलपत्र दिल्यावर ज्या फर्स्टक्लास सबजज्जाकडे दाव्याचें काम चालणार होतें, त्यांचेकडे कोणाचें वळण लागेल याची चौकशी केली. या चौकशींत वरील तालुक्याच्या मारवाडी सावकाराचें नांव कळताच त्याची भेट घेऊन कामाचा निकाल न्यायाधिशानें त्याच्या मतीनें करावा म्हणून त्या सावकारास सोन्याच्या दोन चिपा दिल्या. त्या सावकारानेंहि तें सोनें घेऊन दाव्याचे निकाल सदर घनकोतर्फे होतील अशी खटपट करण्याचें त्याला अभिवचन दिलें. याप्रमाणें मुनसफाशीं वळण असलेल्या इसमाचें समाधान करण्याची तजवीज केल्यावर या खटल्यांतील उभय पक्षकाराच्या वकिलांच्या हकारी होऊन दाव्याच्या अखेरनिकालावर हें काम ठेवण्यांत आलें. *त्यानंतर शेजारच्या तालुक्यांतील मारवाडी न्यायाधिशास भेटण्यासाठीं* पुण्यास आला, त्या वेळीं न्यायाधीश हे दाव्याचें निवाडापत्र लिहिण्यासाठीं या खटल्यातील कागदपत्र व जमाखर्च तपाशीत होते. तपासणींत न्यायाधिशाच्या नजरेस खोडाखोड केलेलें जमाखर्चाचें पान आढळलें. तेव्हां तो खोडाखोड केलेला जमाखर्च त्या सावकारास दाखवून त्याबाबतचें त्याचें म्हणणें विचारलें, तेव्हां हे जमाखर्च दाव्यातील घनकोचेच आहेत असें आढळून आल्यानें निरुपायास्तव जमाखर्चांत लबाडीनें खोडाखोड केलेली आहे असें न्यायाधिशाच्या मताप्रमाणेंच मध्यस्थाचें मत पडलें. निवाडा करणारे हे न्यायाधीश लाच न घेणारे असल्यानें दावा करणाऱ्या सावकाराची शिफारस करणें या मध्यस्थास अशक्य झालें. वास्तविक मध्यस्थाचा हेतु, नुसत्या आपल्या शिफारशीनें दाव्याचा निकाल वरील घनकोतर्फे करून घेऊन सदर सोनें स्वतःच गट्ट करावें, असा होता. परंतु हा त्याचा हेतु साध्य होणें

अशक्य झालें. दाव्यांतील सावकाराची लबाडी दृष्टोत्पत्तीस आल्यामुळें न्यायाधिशाचा संताप झाला व या सावकाराचें नुकसान करण्याच्या इराद्यानें या सर्व व्यवहाराचा शेतकी ॲक्टाप्रमाणें हिशेब घेतांना निरनिराळ्या गहाणखतावरून घेणें असलेल्या रकमाची गहाण जमिनीच्या उत्पन्नातून फेड झाल्यानंतर जी फाजील रक्कम सावकाराकडे सालोसाल जमा राहात गेली, त्या रकमेंतून, सतरा अठरा प्रॉमिसरी नोटींचें सावकारास रिणकोकडून घेणें असलेल्या रकमेच्या पोटीं वसूल लाविली व सावकाराचे सर्व दावे रद्द केले. अशा रीतीनें सावकाराच्या लबाडीची चीड घेऊन संतापाचे भरात न्यायाधिशानें कायद्याच्या विरुद्ध निवाडा केला. न्यायाधीश एवढेंच करून थांबला नाहीं, तर त्यानें, या सावकारानें लबाडीनें व अप्रामाणिकपणानें रिणकोचें नुकसान करण्याकरिता जमाखर्चात खोडाखोड केल्याबद्दल त्याचेवर फौजदारी खटला करण्याचा हुकूम केला. दिवाणी दाव्यांतील वरील निवाड्यावर मुंबई हायकोर्टांत सर्व अपिलें एका नामांकित वकिलामार्फत दाखल केलीं. हे वकील मुंबई हायकोर्टांतील प्रथम श्रेणींतील नामांकित कायदेपंडित होते. त्यांचेकडे हीं अपिलें सोंपवितेवेळीं ते आम्हास असें म्हणाले कीं, हीं अपिलें दाखल करून पक्षकारास काय फायदा होणार आहे ? अपिलें यशस्वी होणार नाहींत. अपिलाचा खर्च मात्र फुकट जाईल. यावर आम्हीं त्यांना सांगितलें कीं प्रस्तुत आपण हायकोर्टाचे सुट्टींत थंड हवेच्या ठिकाणीं वास्तव्य करण्यास आला आहात. आपलेपाशीं मुंबई हायकोर्टाचे लॉ-रिपोर्टस् नाहींत. यामुळें माझा निरुपाय आहे. नाहींतर येथेंच आपली या सर्व अपिलांत आपल्याला यश मिळेल अशी मीं खातरी करून दिली असती. तथापि अपिलें दाखल झाल्यानंतर हायकोर्टापुढें चौकशीस लागलीं, म्हणजे मी आपणास भेटून हे सर्व निवाडे आपणास दाखवून आपली खातरी करून देईन. याप्रमाणें एकदोन वर्षांनंतर हीं अपिलें अखेरचौकशीस नेमण्यात आल्यावर या नाणावलेल्या विद्वान् कायदेपंडिताची आम्हीं भेट घेतली. या सर्व अपिलांत पुराव्याच्या दृष्टीनें त्या वकिलास विशेष माहिती देण्यासारखें कांहींच नव्हतें. परंतु या अपिलांत एक महत्त्वाचा कायद्याचा मुद्दा मात्र होता. तारेगहाणखतांतील देवघेवीच्या व्यवहाराचा व हातावरील कर्जाच्या व्यवहाराचा हिशेब एकत्र ठिकाणीं करून तारेगहाणखताची फेड होऊन सावकाराकडे जमा असलेल्या उत्पन्नाची फाजील रक्कम हातावरील कर्जाच्या फेडीकरतां जमा धरतां येते कीं नाहीं हा तो कायद्याचा मुद्दा होय. या मुद्द्याबाबत मुंबई हायकोर्टाचे पूर्वी झालेले निवाडे या कायदेपंडितांना दाखवितांच सर्व अपिलांत यश मिळणार अशी त्यांची खात्री होऊन पूर्वी अपिलें दाखल करतांना आम्हीं त्यास जें सांगितलें होतें तें आमचें म्हणणें त्यांना पटलें. त्याच दिवशीं हीं सर्व अपिलें चौकशीस निघून उभयतां पक्षकारांच्या वकिलांच्या तक्रारी सुमारें अर्धा तास चालल्यावर कनिष्ठ कोर्टाचे सर्व निवाडे हायकोर्टानें फिरवून सावकाराचे रिणकोवर हुकुमनामे केले. आतां दुर्दैवाप्रमाणें या दाव्याची ही आनंदपर्यवसायी घटना जरी घडून आली तरी

दरम्यानचे काळांत या दाव्यांतून निघालेल्या एका फौजदारीसंबंधाची घटनेचा उल्लेख करणें प्रसंगप्राप्त आहे. फर्स्टक्लास म्याजिस्ट्रेटांनी सावकार वादीवर फौजदारी खटला केला जावा असा जो हुकूम केला होता, त्यावर जिल्हा सेशन जजसाहेबांकडे पक्षकाराच्या सांगण्यावरून आम्ही अपील दाखल केलें. ते वेळीं विचित्र स्वभावाचे व तुसड्या वृत्तीचे एक इंग्रज सेशनजज्ज होते. त्यांच्यापुढें अपील दाखल केल्यानंतर आमच्या पक्षकारानें त्यांच्याकडे कोणाचें वळण आहे, याचा तपास करण्यास सुरुवात केली व एका मारवाडी व्यापाऱ्यामार्फत त्यानें या सेशनजज्जाकडे शिफारस करण्याचें ठरविलें. या गृहस्थ व या कामगिरीबद्दल व या खटल्याचें बाबतीची माहिती त्यानें आम्हांस दिली नाहीं. अपिलाच्या चौकशीची जी तारीख नेमली होती, त्याच्या आदले दिवशीं येथील दिवाणी कोर्टांत एका पक्षकारातर्फें काम चालविण्यासाठीं मुंबईचे वरील नामांकित कायदेपंडित आमदाबादेंच आलेले होते म्हणून सावकारावरील अपिलाचे कामांत वकीलपत्र द्यावें असें आम्ही आमच्या पक्षकारास सुचविलें. पक्षकारास ही कल्पना पसंत पडून आम्ही उभयतां त्यांच्याकडे वकीलपत्र देण्यासाठीं गेलों व त्यांनीं त्यांना विनंति केली. त्यावर "छे, बाबा! He is a misanthrop" "या माणूसघाण्या न्यायाधिशापुढें हें अपील चालविण्याचें काम मी घेणार नाहीं" असे सदर वकीलसाहेबांचे शब्द ऐकताच आम्हांस थोडें आश्चर्यच वाटलें. तथापि आम्ही उभयतांनीं आग्रह करून आपण फी किती घेणार म्हणून विचारतां हो ना करतां ८०० रुपये दिल्यास काम चालवीन असें त्यांनीं सांगितलें. सुरुवातीस ज्या न्यायाधिशापुढें काम चालविणार नाहीं असें सांगितलें, त्याच न्यायाधिशापुढें ८०० रुपये मिळतांच या वकिलांनीं काम चालविण्याचें कबूल केलें. कोर्टापुढें अपिलाचें काम निघालें ते वेळीं न्यायाधिशाशीं वळण असलेला गृहस्थ कोर्टांत हजर राहिला तर चालेल कीं नाहीं, असें आमच्या पक्षकारानें विचारलें—असतां तो गृहस्थ कोर्टांत आल्यास आमची हरकत नसल्याचें सदर वकिलांनीं सांगितलें. या नामांकित कायदेपंडितांनीं या अपिलाचे कामांत जेमतेम अर्धा तास काम केलें परंतु त्यांचा कांहींहि उपयोग झाला नाहीं व रुकाराचा कनिष्ठ कोर्टाचा हुकूम सेशनजज्ज कायम करणार असें आम्हांस दिसून आलें. सेशनजज्ज घरीं गेल्यावर त्यांच्याकडे वळण लावण्यासाठीं आणलेला मारवाडी गृहस्थ जज्जाचे बंगल्यावर गेला. तेव्हां साहेबांच्या हुकुमावरून त्याला बंगल्यावरून हाकून देण्यांत आलें. या हकीकतीवरून या गृहस्थानें आमच्या पक्षकारास कशा रीतीनें बनविलें हें दिसून येतें. त्यानंतर रुकारान्वयें फौजदारी खटल्याची प्राथमिक चौकशी फर्स्टक्लास मॅजिस्ट्रेटपुढें होऊन खटला सेशनकमिट झाला व त्याची चौकशी त्या वेळीं येथें असलेल्या एका बंगाली ऑफि॰ सेशनजज्जानीं केली. खटल्यांत म्हणण्यासारखा पुरावा कांहींएक नव्हता तथापि पक्षकारानें मुंबईचे एक गोरे बॅरिस्टर व पुण्याचे फौजदारी खटले चालविण्यांत कुशल असलेले ब्राह्मण वकील खटल्याचें काम चालविण्याकरितां आणले. हे उभयतां कायदेपंडित रहदारी बंगल्यावर राहात होते. खटला समाप्त

होईपावेतोंचा चारपाच दिवसांचा काळ त्यानीं मौजेंत घालविला. या खटल्याचा असेरनिवाडा ॲडि. सेशनजज्जानें करून आरोपीस सात वर्षांची काळ्यापाण्याची शिक्षा दिली. या खटल्याच्या कामीं फिर्यादीतर्फे पुरावा म्हणून खोडाखोड केलेले जमाखर्च हजर करण्यात आले होते व ते आरोपीच्या दुकानचे आहेत असाबद्दल फिर्यादीतर्फे एका साक्षीदाराची जबानी घेण्यात आली होती. परंतु जमाखर्चांतील खोडाखोड कोणी केली याचा पुरावा फिर्यादीतर्फे कांहींच आला नव्हता. ही जमाखर्चांतील खोडाखोड आरोपीनेंच केली असली पाहिजे असें ॲडि. सेशन जज्जानें पुरावा नसता गृहीत धरून शिक्षा दिली होती. या निकालावर अपील करण्याचें काम आरोपीनें आमच्याकडेच सोंपविलें असल्यामुळें आम्ही मुंबईस जाण्यास निघालों तेव्हां आरोपीची स्टेशनवर पेढ्याच्या बेघात गाठ पडली. त्यावर डोळ्यांत पाणी आणून 'कसेंहि करून मला सोडवा' असें तो म्हणाला. त्यावर 'काळजी करूं नका, तुम्ही निश्चित सुटाल' असें आम्हीं त्याला सांगितलें. यानंतर थोड्याच दिवसांत मुंबई हायकोर्टाचे हिंदी न्यायाधीश सर लल्लुभाई आसाराम शहा व दुसरे एक गोरे न्यायाधीश यांचेकडे हें अपील अखेरचौकशीसाठीं निघालें. गोऱ्या न्यायाधिशाच्या मर्जीतला एक गोरा बॅरिस्टर आरोपीतर्फे काम चालविण्याकरितां नेमिला होता. सुमारें अर्धापाऊण तास बॅरिस्टरनें आपलें भाषण केल्यानंतर जमाखर्चांत खोडाखोड असली तरी ही कोणी केली याबाबत सेशनकोर्टांत कांहींच पुरावा झालेला नाहीं. आणि जर त्या सालीं जमाखर्चांत खोडाखोड झाली, त्या सालाच्या सुमारास आरोपीची अज्ञान अवस्था संपून कायद्याप्रमाणें नुक्ताच वयांत आला होता. हें गोष्ट लक्षात घेतां आरोपीनें लबाडीनें खोडाखोड केली हें निःसंशयपणें शाबीत झालें नाहीं. सबब संशयाचा फायदा देऊन आरोपीस दोषमुक्त करण्यांत येत आहे, असा निवाडा हायकोर्टाच्या न्यायाधिशानें दिला. आरोपी जरी अटकेंत होता तरी त्याच्या एका नातेवाईक व्यापाऱ्यानें लल्लुभाई आसाराम शहांशीं माझें वळण आहे व दहा हजार रुपये त्यास दिल्यास आरोपीची सुटका होईल, असें आरोपीच्या आइस सांगून कांहीं रक्कम तिच्याकडून अपील चालण्यापूर्वींच घेतली होती, असें अपिलाचा निकाल लागल्यानंतर आरोपीकडून आम्हांस कळलें. सर लल्लुभाई आसारामसारख्या निष्कलंक इभ्रतीच्या न्यायाधिशाबद्दल वरीलप्रमाणें संशय उत्पन्न होण्यासारखा प्रकार घडावा, ही गोष्ट विचित्रच समजली पाहिजे. याप्रमाणें या खटल्याच या पक्षकारास झालेल्या सजेचें संकटनिवारण झाल्यानंतर या घटनेंतून एका दिवाणी दाव्याचें पिलूं निर्माण झालें. फौजदारी खटल्याचें संकट गेल्यावर आमच्या पक्षकाराच्या हातातून गेलेल्या सोन्याच्या ज्या दोन चिपा त्या परत कशा मिळतील याची विवंचना त्यास लागली व या याबतींत त्यानें आमचा सल्ला विचारला.

लांच देण्याकरितां चिपा देण्यांत आल्या होत्या, परंतु त्यांचा विनियोग तशा रीतीनें केला गेला नाहीं, म्हणून त्या परत मिळण्याबद्दल दिवाणी दावा कायद्याप्रमाणें

चालणें शक्य नाहीं, ही गोष्ट दिसत होती. या कारणाकरितां असा दावा न करतां एक निराळीच युक्ति योजून चिपा घेणारास लेखी नोटीस देण्याचें आमच्या पक्षकारानें ठरविलें. ज्यास चिपा दिल्या तो गृहस्थ ज्या गांवीं राहात असे, तेथें मारवाडी बायकांच्या अंगावरील दागिने घडविणारा कुशल मारवाडी सोनार असल्या कारणानें त्याच्याकडून सोन्याचे दागिने घडवून आणण्याकरितां पक्षकारानें सोन्याच्या दोन चिपा बऱ्याच दिवसांपूर्वी दिल्या. परंतु अद्याप दागिने घडवून दिले नाहींत, सबब नोटीस पावताच आठ दिवसांच्या आंत सोन्याच्या चिपा परत द्याव्या, अशी लेखी नोटीस दिली. नोटीस खोटी व लबाडीची आहे, असें उत्तर आलें. त्यानंतर आमच्या पक्षकारानें चिपा घेणाऱ्या सावकारावर याबाबत सेकंड क्लास सब्जज्ज कोर्टांत दावा दाखल केला. दावा चालविणारे सेकंड क्लास सब्जज्ज यांनीं दाव्याचा निवाडा आमच्या पक्षकारातर्फे व्हावा म्हणून अगोदरच तजवीज करून ठेविली होती. याप्रमाणें अंतस्थ बंदोबस्त करून दाव्याचें काम चालविण्याचा वाहा देखावा उठावदार केला. त्या वेळेस ठाणें येथील फौजदारी काम चालविणाऱ्या एका नामांकित वकिलांचे जामात थोड्याच वर्षांत बरेच पुढें आले होते. त्यांचा व खटला चालविणाऱ्या सेकंड क्लास सब्जज्जाचा स्नेह होता व खटल्याचें काम चालविण्याकरितां त्यांना वकिलपत्र देण्यांत आलें. फिर्यादीचे विधानास अनुसरून पुरावा सर्व तोंडी होता; लेखी कांहींच नव्हता. अशा स्थितींत खटला यशस्वी होण्याकरितां बनावट साक्षीदार आमच्या पक्षकारातर्फे उभे करणें भाग पडलें. मुंबईचे वकील खटला चालविण्यास येणार असल्यामुळें आमचा या खटल्याशीं संबंध राहिला नाहीं. सोन्याच्या दोन चिपा आमच्या समक्ष दिल्या, असा आम्हीं पुरावा द्यावा अशी भीड आमच्या पक्षकारानें आम्हांस घातली. परंतु ही गोष्ट आम्हीं साफ नाकारली. वाटेल ते तोंडी साक्षीदार देऊन आपलें काम करून घ्या असें आम्ही त्यास सांगितलें. आमचा पक्षकार ज्या तालुक्याच्या ठिकाणचा राहाणारा होता, तेथल्या त्याच्या वकिलाची साक्ष त्यानें या दाव्याचे कामीं दिली. याशिवाय तेथील एक पेन्शनर पोलिस सब्-इन्स्पेक्टरहि या कामीं साक्षीदार म्हणून होता. तीनचार दिवस खटला चालून सोन्याच्या दोन चिपांच्या किंमतीचा हुकुमनामा आमच्या पक्षकारातर्फे कोर्टानें दिला. या कामीं ज्या वकिलाची साक्ष झाली, त्यानें आम्हांस याबाबत सल्ला विचारता, त्यानें साक्ष देऊं नये असें आम्हीं त्यास सांगितलें. कारण या बाबतींत आम्हांस विचित्र प्रकारचा अनुभव आला होता. साक्षीदार या नात्यानें कोर्टापुढें हजर होणाऱ्या वकिलाकडे पाहाण्याची निरनिराळ्या मुनसफांची दृष्टि निरनिराळ्या प्रकारची आढळून आली. कांहीं मुनसफ आमच्या पाहाण्यांत असे आले कीं, जे अशा साक्षीदारावर पूर्ण विश्वास ठेवीत. उलट वकील साक्षीदारावर कांहींतरी स्वार्थी हेतूनें खोटें सांगण्यास आला आहे, अशा समजुतीनें त्याच्या साक्षीवर बिलकूल विश्वास ठेवीत नसत. असा अनुभव असल्यानें सदर वकिलाला वरीलप्रमाणें सल्ला दिला. अखेर या वकिलानें दिलेल्या साक्षीचा पक्षकारास

कांहींहि उपयोग झाला नाहीं; कारण अपील कोर्टानें याची जबानी विश्वसनीय मानिली नाहीं. या ठरावावर जिल्हाकोर्टाकडे विरुद्ध पक्षकारानें अपील केलें. अपील मंजूर होऊन आमच्या पक्षकारास नोटिस लागल्यावर आमच्या पक्षकारातर्फे आम्हीं वकीलपत्र दाखल केलें. हें अपील बरेंच दिवस रेंगाळत पडलें असता अपिलेंट पक्षकार मयत झाला. पुढें त्याच्या वारसाचीं नावें रीतीप्रमाणें दाखल झालीं. त्यानंतर २००० रु. घेऊन आपसांत निवाडा करावा, असें वारसानें आमच्या पक्षकाराशीं बोलणें केलें. आमच्या पक्षकारानें याबाबत आमचा सल्ला विचारला. पहिल्या फळाची आशा म्हणून आम्हीं त्यास आपसांत निकाल करण्याचा सल्ला दिला. परंतु त्यानें मूर्खपणानें ही गोष्ट करण्याचें नाकारलें. अखेर हें अपील एका धूर्त व चाणाक्ष हिंदी न्यायाधिशापुढें चौकशीसाठीं नेमण्यांत आलें. जिल्हा जज्जानें कनिष्ठ कोर्टाचा ठराव वाचलेला होता. अपिलेंट वकिलाचें थोडेंफार भाषण झाल्यावर आमच्या पक्षकारानें या दोन चिपा खरोखर काय कारणासाठीं दिल्या, याची बरोबर कल्पना जिल्हा जज्जास झाली असल्यामुळें त्यांनीं कनिष्ठ कोर्टाचा निकाल रद्द करून आमच्या पक्षकाराचा दावा काढून टाकला. आता दर्शविल्या-प्रमाणें स्वार्थाकरिता खोटा जमाखर्च करणाऱ्या सावकारावर कशा प्रकारची अनर्थ-परंपरा ओढवली गेली, द्रव्याचा व्यय किती करावा लागला व शरीरयातना किती भोगाव्या लागल्या हें दिसून येईल. आमच्या पक्षकारावर केलेल्या हिशेबाचे दाव्याचे कामीं अस्सल जमाखर्च मारवाडी लिपींत असल्या कारणानें ते आम्हास न दाखविता पक्षकारानें आम्हांस त्याचे उतारे दाखविले होते व जमाखर्चात खोडाखोड केली आहे, ही गोष्ट त्यानें आमच्यापासून पूर्णपणें लपवून ठेविली होती. विरुद्ध बाजूच्या वकिलांनींहि अस्सल जमाखर्चाची तपासणी करण्याची खबरदारी घेतली नव्हती. जमाखर्चात खोडाखोड केली आहे, असें आमच्या पक्षकारानें आम्हास सांगितलें असतें, तर हे जमाखर्च कोर्टांत हजर करूं नयेत, असा सल्ला आम्हीं आमच्या पक्षकारास लगेच दिला असता. परंतु अशा प्रकारची सुबुद्धि त्यास न झाल्यानें त्याच्यावर वरील संकटपरंपरा ओढवली. जमाखर्चात खोडाखोड कोणीं केली अशी जी एक शंका आमच्या मनांत उद्भवली, तिचें निरसन करून घेण्यासाठीं आम्हीं आमच्या पक्षकारास विचारतां मला असें समजलें कीं, जमाखर्चात खोडाखोड करण्याविषयीं आमच्या पक्षकारानें त्याच्या मारवाडी ब्राह्मण गुमास्त्यास फार भीड घातली, परंतु त्यानें तसें करण्याचें नाकारलें. अखेर त्यानें त्या गुमास्त्याचे हातांत सोन्याचें एक कडें घालून त्याला ही गोष्ट करण्यास प्रवृत्त केलें. 'द्रव्येण सर्वे वशाः' या न्यायानें या गुमास्त्यानें हें लबाडीचें कृत्य केलें हें उघड आहे. वेपण्यातो ज्या खटल्याची हकीकत आम्हीं दिली आहे तो खटला ज्या न्यायाधिशापुढें चौकशीसाठीं निघून त्याचा निकाल करण्यांत आला त्या न्यायाधिशापुढें चाल-लेल्या दुसऱ्या एका खटल्यांत लांचखाऊ न्यायाधीश म्हणून त्यास दूषण लावण्याचा एक प्रसंग कशा रीतीनें आला याचें येथें थोडक्यांत आम्ही दिग्दर्शन करतों.

या न्यायाधिशापुढें चाललेल्या एका स्पेशल दाव्यांत या न्यायाधिशाकरितां म्हणून पक्षकाराकडून लांच घेण्याचा प्रयत्न, ज्याचा न्यायाधिशांशीं अर्थाअर्थी संबंध नाहीं, अशा एका माणसानें जो केला व जो अखेर फसला त्याची हकीकत वाचकांस मनोरंजक वाटल्यावाचून राहाणार नाहीं. सकाळीं स्नान झाल्यावर पूजेचें साहित्य घेऊन मंदिरांत पूजा करण्यासाठीं जाण्याचा या मुनसफाचा परिपाठ असे. ज्या देवळांत हे न्यायाधीश जात, तेथील दुरुस्तीचे कामावर देखरेख करणारा एक सुतार होता. न्यायाधीश पूजेस गेले म्हणजे देवळाच्या दुरुस्तीबाबतची विचार पूस या सुताराशीं करीत असत त्या वेळीं या न्यायाधिशापुढें चाललेल्या एका स्पेशल दाव्यांतील आमच्या एका पक्षकारानें पाहिलें होतें. दाव्याची चौकशी सुरू असतां तुझ्या तक्रारींत काहीं तथ्य नाहीं व दाव्याचा निकाल तुझ्याविरुद्ध होणार आहे, असें आम्हीं आमच्या पक्षकारास सांगितलें यानंतर न्यायाधिशाकडे वळण बाधण्याच्या खटपटीस तो लागला वरील सुतारामार्फत न्यायाधिशाकडे वळण लावल्यास दाव्याचा निकाल आपल्यातर्फे होईल अशी खात्री वाटून या पक्षकारानें त्या सुताराची गांठ घेतली. सुतारानें ५० गिनी मुनसफास द्याव्या लागतील, असें त्या पक्षकारास सांगितलें. पक्षकारास तें मान्य होऊन न्यायाधिशास ५० गिनी दिल्या, अशी आमच्या पक्षकाराची खात्री करून देण्याकरितां सुतारानें त्यास आपल्याबरोबर नेलें, व मुनसफाच्या घरापासून १५।२० पावलांच्या अंतरावर उभें राहून पक्षकारानें सुतारास ५० गिनी दिल्या त्यांची पुरचुंडी करून घेऊन सुतार मुनसफाच्या घरांत गेला त्या घरास दोन मजले असून दुसऱ्या मजल्यावर मुनसफाची बैठकीची जागा होती खालील भागांत शिपाई वगैरे बसत सुतारानें न्यायाधिशास भेटावयाचा बहाणा करून तेथील ओसरीवरील एका कोनाड्यात गिनीची पुरचुंडी ठेवून दिली व तेथून परत आमच्या पक्षकाराकडे येऊन त्यास आपल्या अंगाची झडती दिली यावरून सदर रकम सुतारानें न्यायाधिशास दिल्याची या आमच्या पक्षकाराची खात्री झाली व पक्षकार आपल्या ठिकाणीं निघून गेला यानंतर थोड्या वेळानें न्यायाधिशाची भेट घेण्याचा बहाणा करून सुतार त्या ओसरीवर गेला व कोनाड्यांतील ती गिनीची पुरचुंडी घेऊन गेला खटल्यांतील साक्षीदारांच्या जबान्या होऊन दोन्ही बाजूंच्या वकिलांच्या तक्रारी ऐकून चारआठ दिवसांनीं मुनसफानीं आपला ठराव जाहीर केला. दाव्याचा निकाल आमच्या पक्षकाराविरुद्ध झाला. याप्रमाणें निवाडा लागल्यावर दोनतीन दिवसांनीं आमच्या पक्षकारानें ही सर्व हकीकत आम्हांस सांगितली व वकिलांच्या एका कारकुनाच्या सांगीवरून मीं ही गोष्ट केली, असें तो म्हणाला या, नंतर ज्या वकिलांच्या कारकुनाचें नांव पक्षकारानें सांगितलें, त्यास बोलावून आणून पक्षकार सांगतो ही गोष्ट खरी असल्यास ज्या सुतारास पन्नास गिनी दिल्याचें आमचा पक्षकार म्हणतो, त्याच्याकडून गिन्या परत घेऊन त्या पक्षकारास देऊन टाकणें हा शहाणपणाचा मार्ग आहे, आणि असें जर न झालें तर हातांत बेड्या पडल्याशिवाय राहणार नाहींत असें आम्हीं त्यास सांगितलें त्यानंतर ही रकम मध्यस्थाकडून परत

आणून कारकुनाने ती सदर पक्षकारास दिली. ही रक्कम कारकून व सुतार यांनी मुनसफास लाच देण्याचा देखावा करून पक्षकाराकडून उपटली, यात दोघांचा हिशेब असा होता कीं, निकाल आमच्या पक्षकारातर्फे झाल्यास, न्यायाधिशास न कळता अनायासें द्रव्य आपल्या पदरात पडेल. कित्येक न्यायाधिशाच्या बाबतींत अशा प्रकारचे सटाटोप त्या न्यायाधिशांना माची वार्ताहि नसून, केले जात असून त्यांच्या नावास लाचखाऊ म्हणून विनाकारण डाग लागण्याचा संभव असतो.

## सटोड्या बापाचा भाग्यशाली मुलगा

आता आमच्या चार तपाच्या वकिलीच्या कालांतल्या आणखी एका दाव्याची मनोरंजक हकीकत देतों वकिलीचा धंदा करूं लागल्यापासून या जिल्ह्यात सट्टे-बाजीची साथ तीन वेळा उद्‌भवली. आमच्या वकिलीच्या धंद्याच्या प्रारंभीच्या काळापूर्वी नुकतीच एक साथ उद्‌भवून शमली गेली होती. आम्ही ज्या खटल्याची हकीकत देणार आहों, त्या खटल्याचा व्यवहार या साथींत उद्‌भवला होता. सट्टे-बाजीच्या साथींचें पर्यवसान अनेक लक्षाधीश सावकार भिक्षाधीश झाल्याचें बहुशः आढळतें. या शहराच्या बाजारपेठेंतील कित्येक धनाढ्य पेढ्या सट्टेबाजीमुळें लयास गेल्याचीं अनेक उदाहरणें आमच्या डोळ्यादेखत घडलेलीं आहेत. सट्टेबाजीची तिसरी साथ सन १९२० ते १९२५ मध्यें आली. या वेळीं या शहराच्या पेठेंतील एक नामांकित व्यापारी या सट्टयाच्या व्यवहाराचे अडत होते. अशल्या व्यवहारातील अडत्याकडे जमा होणाऱ्या बयाण्याची रक्कम दररोज ४००।५०० रु. असे. याप्रमाणें जमा झालेल्या दोन तीन लाख रुपयांपैकीं कांहीं रक्कम येथील एका शिक्षण-संस्थेस द्यावयाचें ठरवून जमाखर्चात सदर शिक्षणसंस्थेचें खातें ठेवण्यांत आलें व तिच्या खातीं ही रक्कम जमा होऊं लागली. याप्रमाणें संस्थेच्या खातीं सुमारें पंचवीस हजार रुपये जमा झाले. शेवटीं हा सर्व व्यवहार ढासळून जाऊन अड-त्यास या सट्टयाच्या व्यवहारात फार मोठी नुकसानी लागली ती इतकी कीं, त्याच्या मालकीच्या अनेक मिळकती त्यास सट्टयाच्या नुकसानभरपाईस्तव विकाव्या लागल्या. सट्टयाची अडत करणारा हा व्यापारी नामशेषच व्हावयाचा, परंतु उत्तर हिंदु-स्थानातल्या एका संस्थानातील कोट्याधीश व्यापाऱ्याचा व याचा संबंध असल्यामुळें व त्यास याच सावकाराची नुकसानीची फार मोठी रक्कम भरून द्यावयाची असल्या-मुळें त्याचे गुमास्ते याचा व्यापार चालू ठेवण्याकरिता अडत्याच्या दुकानावर बसूं लागले. याप्रमाणें वर्षदोन वर्षांत त्या सावकारानें आपली सर्व रक्कम वसूल करून घेतल्यानंतर बाकी राहिलेली मिळकत सदर अडत्याचे स्वाधीन करून दिली. त्या दिवसापासून हा व्यापारी कापशी खरेदीचा अडतीचा धंदा करीत असल्यामुळें सालाचें चारपाच हजार रुपये प्राप्ति त्यास होत असे. यामुळें नामशेष होण्याची आपत्ति या व्यापाऱ्यावर आली नाहीं. ज्या शिक्षणसंस्थेच्या मदतीस्तव या सट्टयाच्या व्यवहाराच्या अडतीचा धंदा करणाऱ्या व्यापाऱ्याकडे पंचवीस हजार रुपये रक्कम जमा झाली

होती, ती मृगजळासारखी विलीन पावली. वरील सट्टयाच्या सांथीचें जें वर्णन केलें आहे, त्या प्रत्येक सांथीचे वेळीं या व्यवहारासंबंधीं दिवाणी कोर्टात अनेक दावे दाखल होत व वकिलवर्गापैकीं अनेकांना या दाव्यांचीं कामें चालविण्यात द्रव्यप्राप्तीहि चांगली होत असे. जिल्हा कोर्टातील असल्या दाव्यांत फर्स्टक्लास सब्‌जजांनीं केलेल्या कित्येक निवाड्यांवर मुंबई हायकोर्टात अपिलें दाखल होऊन या कपाशीच्या व्यवहारासंबंधाचे मुंबई हायकोर्टाचे कित्येक निवाडे प्रसिद्ध झाले आहेत. येथपावेतों या जिल्ह्यांतील सट्टयाच्या सांथीची स्थूल माहिती दिल्यावर ज्या खटल्याची हकीकत देण्याचें आम्ही प्रारंभीं उल्लेखिलें आहे, तिकडे आम्ही वळतों.

इंग्रजी राज्य या जिल्ह्यांत स्थापन होण्याच्या प्रारंभींच्या काळांत पुण्याकडील एक सावकारीचा धंदा करणारी पेढी या शहरांत स्थायिक झाली. इंग्रजांच्या सैन्यांतील शिपायास पगार वाटण्याकरितां द्याव्या लागणाऱ्या रकमा या पेढींतून घेतल्या जात व अखेर या रकमाची भरपाई सरकारकडून पेढीला करण्यात येत असे. अशा या पेढीचा मालक मयत झाला ते वेळीं त्याचा एकुलता एक मुलगा त्याचा वारस होता. तो अज्ञान असल्यामुळें त्याच्या सर्व मिळकतीचा पालनकर्ता, या जिल्ह्याचा डिस्ट्रिक्ट कोर्टाचा नाझर, यास नेमण्यात आलें. तो एकवीस वर्षांचा झाल्यावर त्याची सरकारांतील सर्व इस्टेट त्याच्या ताब्यांत आली व तो आपल्या मिळकतीची व्यवस्था पाहूं लागला या गृहस्थास स्वतःच्या शहाणपणाची फार घमेंड असून आपल्याला सर्व गोष्टी समजतात, अशी त्याची समजूत होती थोड्याच दिवसांत अल्पप्रयासानें अमाप संपत्ति मिळावी या हेतूनें चांदी, आळशी, कपाशीच्या गांठी इत्यादि मालाच्या खरेदी–विक्रीचे सट्टेबाजीचे व्यवहार करण्यास त्यानें प्रारंभ केला. हे व्यवहार या शहरच्या एका मारवाडी व्यापाऱ्याच्या पेढीच्या अडतीत तो करीत असे. धुळ्याचा अडत्या हे व्यवहार मुंबईच्या व्यापाऱ्याच्या अडतींत करीत असे याप्रमाणें दोनतीन वर्षांच्या अवधींत या गृहस्थानें केलेल्या सट्टयाच्या व्यवहारांत तीसचाळीस हजार रुपये नुकसान आलें. हें सर्व नुकसान मुंबई अडत्यास धुळ्याच्या अडत्यानें भरून दिलें व ती रक्कम वसूल करण्याकरितां या व्यापाऱ्यावर धुळें फर्स्टक्लास सब्‌जज्ज कोर्टांत दावा केला व त्याची मिळकत निवाड्यापूर्वी जप्त केली. या शहरांतील पहिल्या श्रेणींतील नामांकित वकिलास वरील व्यापाऱ्यानें वकिलपत्र दिलें. आमचा व त्याचा परिचय असल्यामुळें त्यानें आम्हांसहि वकिलपत्र या दाव्यांत दिलें. या दाव्यांत आमच्या या पक्षकाराची मुख्य तक्रार अशी होती कीं, त्यानें केलेले सर्व व्यवहार सट्टयाच्या स्वरूपाचे असल्या कारणानें कायद्याप्रमाणें वादीची फिर्याद त्याच्यावर चालत नाहीं, सबब त्याचा दावा रद्द करण्यांत यावा. ज्या फर्स्ट क्लास सब्‌जजापुढें हा दावा चालला होता, त्याचा कल आमच्या पक्षकाराच्या विरुद्ध होता. लेखी व तोंडी पुरावा या दाव्यांत उभय पक्षकारांतर्फे दाखल होऊन खटल्याचा अखेरनिवाडा आमच्या पक्षकाराविरुद्ध झाला व आमच्या पक्षकारानें रु. २५००० वादीस द्यावे, असा न्यायाधिशानें हुकूम

केला. यानंतर आमच्या पक्षकारातर्फे मुंबई हायकोर्टात आम्हीं अपील दाखल केलें. हायकोर्टाच्या न्यायाधिशापुढें आमच्या पक्षकारातर्फे मुख्य व्यवहार सर्व सट्टयाच्या स्वरूपाचे असल्यामुळें कायद्याप्रमाणें नुकसानीची रक्कम आमच्या पक्षकाराकडून वसूल करतां येत नाहीं, अशी तक्रार करण्यात आली. उभयता वकिलांचीं तक्रारी भाषणें संपण्यापूर्वी कोर्टाची वेळ संपल्यामुळें दुसऱ्या दिवशीं कोर्टापुढे अपील चौकशीसाठीं निघावयाचें ठरलें. पहिल्या दिवशीं झालेल्या तक्रारी भाषणाच्या असेंदाव्याचे व्यवहार सट्टयाच्या स्वरूपाचे असून वादीचा दावा कायद्याप्रमाणें चालत नाहीं, असा निवाडा करण्याकडे उभयता न्यायाधिशाचा कल असल्याचें स्पष्ट दिसत होतें. परंतु पक्षकाराच्या दुर्दैवामुळें त्याला एक कुबुद्धि आठवली. उभयता न्यायाधिशापैकीं एका न्यायाधिशाचा बंगला मलबार हिलवर होता. आमचा पक्षकार दुसऱ्या दिवशीं सकाळीं फळें व मेवामिठाई बरोबर घेऊन न्यायाधिशाच्या बंगल्यावर गेला व न्यायाधिशाना देण्यासाठीं फळफळावळ वगैरे आणिलें आहे, असें त्यानें न्यायाधिशाच्या शिपायास सांगितलें. त्यावर न्यायाधिशाच्या हुकुमावरून शिपायानें पक्षकारास बंगल्याबाहेर हाकून लाविलें. त्याच दिवशीं कोर्टापुढें हें अपील निघालें असता आदले दिवशींचा रागरंग पालटून जाऊन न्यायाधिशानें अपिलाचा निवाडा तत्काल सांगण्यास सुरवात करून कनिष्ठ कोर्टाचा निकाल कायम केला व अपील खर्चासुद्धा रद्द केलें. आमच्या या पक्षकाराच्या मूर्खपणामुळें ओढवलेल्या या आपत्तीचे दुष्परिणाम फार वाईट झाले. या शहरात त्याच्या मालकीचीं अनेक घरें त्याच्या प्रतिपक्षानें निवाड्यापूर्वी जप्त करून ठेविलेलीं दरखास्त दाखल करून विक्रीस काढलीं. या सर्व मिळकती फार थोड्या किंमतीत विकल्या गेल्या. त्यावर मिळकतीची विक्री झाल्यानंतर जंगम मिळकतीची विक्री सुरू झाली. त्यांत आमच्या पक्षकाराच्या एका रिणकोकडे येणें असलेले रुपये १०,००० च्या प्रामिसरी नोटीची विक्री रु. १०० होत असल्याचें पाहून आम्हीं कोर्टाकडे तक्रार केली. त्यावर मिळकतीची विक्री करून दरखास्तीची सर्व रक्कम वसूल झाली असताहि जंगम मिळकतीची विक्री करणें अन्यायाचें व कायद्याविरुद्ध आहे, हें कोर्टाच्या नजरेस आणून देतांच जंगम मिळकतीच्या विक्रीचें काम कोर्टानें बंद केलें. दरखास्तीच्या बजावणीत विक्रीस काढण्यात आलेली घरें या शहरांतील निरनिराळ्या सावकारांनी कोर्टानें केलेल्या लिलावात विकत घेतलेलीं होतीं. या मिळकतीच्या विक्रीचे कोर्टाकडून काढण्यांत आलेल्या जाहीरनाम्यांत मुंबई हायकोर्टानें एका नवीन सरक्युलरान्वयें मंजूर केलेली एक शर्त अशी होती कीं, रिणको प्रतीवादीचा एकत्र कुटुंबांतील सहभागीदार भाऊ, मुलगा इत्यादींचा दाव्यांतील मिळकतींतील अविभक्त हिस्सा कोर्टामार्फत होणाऱ्या लिलावांत विक्रीस काढण्यांत यावा असें स्पष्टपणें दरखास्तीच्या विनंति कलमांत नमूद केलें नसलें तर एकत्र कुटुंबांतील्या इसमांचा हक्क–दावा–संबंध कोर्टमार्फत झालेल्या लिलावांत विकला गेला नाहीं, असें समजण्यांत येईल. आमच्या पक्षकाराच्या मिळकतीची विक्री होण्यापूर्वी त्याल

मुलगा झाला असून मिळकतीच्या विक्रीच्या वेळीं त्याचें वय दोन वर्षांचें होतें. मिळकत वडिलोपार्जित असल्यामुळें या अज्ञान मुलाची वडिलोपार्जित मिळकतीवर निम्मी मालकी होती. वरील हायकोर्ट सरक्युलरान्वयें दरखास्त देणारानें दरखास्त देतांना जप्त करण्यांत आलेल्या मिळकतींतील या अज्ञान मुलाचा अविभक्त हिस्सा विक्रींत कढण्यांत यावा, असें स्पष्टपणें मागणें वादीनें आपले दरखास्तींत केलेलें नव्हतें. मिळकतीची विक्री होऊन ज्या त्या खरेदीदारानें आपल्या खरेदी घेतलेल्या मिळकती ताब्यात घेतल्या व ते त्या मिळकतीचा उपभोग घेऊं लागले सन १९१५ च्या सुमारास बेळगाव येथील फर्स्ट क्लास सब्जजानें धनकोनें गहाणावरून केलेल्या एका फिर्यादींत गहाण मिळकतीची विक्री करून रकम वसूल करून मागितली होती. गहाणदार रिणकोस एकदोन मुलें होतीं. गहाण मिळकत वडिलोपार्जित असल्यामुळें सहभागीदार या नात्यानें त्या मिळकतीवर मुलाचा हक्क होता अशा स्थितींत गहाण मिळकतीची विक्री होऊन ती एका इसमानें खरेदी घेतली व मिळकतीचा ताबा घेतला. नंतर गहाणदार रिणकोच्या मुलानें मिळकतींतील त्याचा हिस्सा दरखास्तीचे कामीं हायकोर्टानें मंजूर केलेल्या सरक्युलरान्वयें विक्रीस काढला नसल्यानें तो हिस्सा मिळकत खरेदी घेणाराकडून परत मिळावा, असा दावा केला. या दाव्याचा निकाल हायकोर्टानें, या सरक्युलरान्वयें वादीविरुद्ध करून सहभागीदारांनीं त्यांचा हिस्सा पृथक् करून खरेदी घेणाराच्या ताब्यातून घ्यावा असा निवाडा केला. हा निवाडा आम्हीं वाचलेला असल्यामुळें आमच्या पक्षकाराच्या वरील कामांत त्याच्या मुलातर्फे दावा दाखल केल्यास विक्री करण्यांत आलेल्या सर्व मिळकतींतील निम्मा निम्मा हिस्सा त्यास नक्की परत मिळेल, अशी आमची खात्री झाली त्यानंतर आमच्या पक्षकाराच्या मालकीची व्यापारी पेठेंतील एक मोठी हवेली विक्रीस काढण्यांत आली होती. त्यांतील मुलाचा निम्मा हिस्सा परत मिळावा म्हणून मुलाच्या वतीनें दावा दाखल करण्याचा आग्रह आम्हीं आमच्या पक्षकारास केला. आमचे पक्षकार इंग्रजी शिकलेले असून ते जरा चौकस व अधिक शहाणे होते. वर नमूद केल्याप्रमाणें आम्ही पक्षकारास सांगितल्यावर मुंबईच्या व आणखी अन्य ठिकाणच्या कांहीं वकिलांचा, या बाबतींत त्यानें सल्ला विचारला. असें करण्यांत त्याचा हेतु हा कीं, आमच्या म्हणण्यास हायकोर्टाच्या निवाड्याचा कांहीं आधार आहे कीं कसें ? परंतु वरील सर्व वकिलांनीं तुमच्या मुलास विक्री झालेल्या मिळकतीपैकीं निम्मा हिस्सा मिळणार नाहीं, असें सांगितलें. यानंतर आमच्या पक्षकारानें या म्हणण्यास आधार काय असें खोदून खोदून विचारलें त्यावर आम्ही त्यास स्पष्ट सांगितलें कीं, आधार वगैरे कांहींएक लागणार नाहीं माझेवर विश्वास असल्यास बाजारपेठेंतील हवेलीच्या निम्म्या हिश्शाबद्दल प्रथम दावा करा व तो यशस्वी झाल्यास मागाहून सर्व दावे करा. याप्रमाणें दिलेला सल्ला त्यास मान्य होऊन तशा प्रकारचा दावा दाखल करण्यांत आला. या दाव्याचे कामीं सदर हवेली खरेदी घेणारा इसम धनाढ्य असल्यानें त्यानें आपल्यातर्फे दोनतीन नामा-

कित वकील दिले होते. हवेलीचा लिलाव ज्या दरखास्तीनें झाला, तींत काढण्यात आलेला जाहीरनामा व तदनुषंगिक इतर महत्त्वाचे कागदपत्र यांच्या सहीशिक्क्याच्या नकला फिर्यादीबरोबरच दाखल केल्या होत्या व पुराव्याचा देखावा करण्याच्या इरा-दानें जरूर नसताहि कांहीं साक्षीदारांना साक्षीसमन्सहि काढिलीं होतीं. बारा महिन्या-चा कालावधि गेल्यावर हा मुकदमा जुना झाल्यामुळें त्याच्या अखेरचौकशीची तारीख कोर्टात साचलेल्या कामाच्या निकालास्तव नेमलेल्या एका जादा न्यायाधिशा-पुढें नेमली गेली. त्या तारखेस फिर्याद वाचून "या फिर्यादींत काय व्हायचें आहे! मुलाला हिस्सा कसा मिळेल ?" असा अभिप्राय न्यायाधिशानें व्यक्त केला, परंतु न्यायाधिशास असलेल्या अन्य कामामुळें या मुकदम्याची अखेरचौकशी या न्याया-धिशानें केली नाहीं. पांचसहा महिन्यानंतर कर्नाटक प्रांतीय एका निस्पृह व प्रामा-णिक न्यायाधिशापुढें हा मुकदमा अखेरचौकशीस निघाला. प्रतिपक्षानें आपल्यातर्फे काम चालविण्यास मुंबई हायकोर्टाचे वकील आणले होते. उभयता पक्षकारांच्या वकिलांच्या तक्रारी ऐकून घेऊन न्यायाधिशानें या दाव्याचा निवाडा सटोड्या बापाच्या या भाग्यशाली मुलातर्फे केला व हवेलीचा निम्मा हिस्सा सरसनिरस वांटणी करून त्यानें आपल्या ताब्यात घ्यावा असा हुकूम केला. या ठरावावर नामदार हायकोर्टात अपील होऊन अपेलंटतर्फे ॲडव्होकेट के. भुलाभाई देसाई यांच्या तक्रारीवरून कोर्टानें कनिष्ठ कोर्टाचा हुकूम आम्ही कायम करतों, परंतु असें फर्मा-वितों कीं निवाड्याच्या तारखेपासून सहा महिन्यांच्या आंत आमच्या पक्षकाराच्या बापाच्या मिळकती लिलावांत खरेदी घेणारे जितके खरेदीदार असतील, त्यांनी जरूर ते पक्षकार सामील करून आमच्या पक्षकारावर एकत्र कुटुंबाच्या सर्व स्थावरजंगम मिळकतीच्या वांटणीचा सर्वसाधारण दावा दाखल करावा व त्या दाव्यांत विक्री न झालेल्या मिळकतीची किंमत आमच्या पक्षकाराच्या वांट्यास येणाऱ्या स्थावरजंगम मिळकतींच्या किंमतीइतकी असल्यास खरेदीदारानें घेतलेल्या मिळकती ज्यांच्या त्यांच्या ताब्यांत ठेवण्यांत याव्या. परंतु याप्रमाणें वाटणी करता न आल्यास कोर्टमार्फत झालेल्या प्रत्येक मिळकतीची सरसनिरस मानानें वांटणी करून त्यांतील निम्मा हिस्सा खरेदीदाराच्या ताब्यांतून काढून आमच्या पक्षकाराच्या ताब्यांत देण्यांत यावा. याप्रमाणें निवाडा झाल्यावर सहा महिन्यांच्या आंत सर्व खरेदीदारांनी एकत्र सामील होऊन आमच्या पक्षकारावर वांटणीचा दावा केला. या दाव्याच्या चौकशींत पुराव्याच्या अंतीं न्यायाधिशाच्या निदर्शनास असें आलें कीं, विक्री न झालेल्या मिळकतीची किंमत, विक्री झालेल्या किंमतीपेक्षां फारच कमी आहे. या गोष्टीचा विचार करून न्यायाधिशानें वांटणीचा दावा रद्द करून विक्री झालेल्या प्रत्येक मिळकतींतील निम्मा हिस्सा वादींच्या ताब्यांतून काढून प्रतिवादीच्या ताब्यांत देण्याचा हुकूम केला. दाव्याच्या कामीं उभयतां पक्षकारांचा पुरावा होऊन मुकदम्याच्या कामांतील तक्रारी ऐकण्याकरितां तारीख जेव्हां नेमली गेली, तेव्हां

आमच्या पक्षकाराच्या बापानें मला दूर प्रवास करावयाचा आहे, तरी तिकडे जाण्यास कांहीं हरकत आहे की काय असें विचारलें असतां हरकत नसल्याचें आम्ही त्यास सांगितलें. कारण हें कीं, हायकोर्टात अपील चालू असतां ज्याप्रमाणें या माणसानें न्यायाधिशास लांच देण्याचा प्रयत्न केल्यानें अपिलाचा नाश झाला, त्याची पुनरावृत्ति होऊं नये. वरीलप्रमाणें निवाडा झाल्यानंतर रीतीप्रमाणें दरखास्तीचीं कामें सुरू करून कोर्ट-मार्फत विक्री झालेल्या प्रत्येक स्थावर मिळकतीचा निम्मा हिस्सा, त्यांचे दरम्यानचें उत्पन्न, दाव्याचा खर्च याप्रमाणें सर्व प्रकारें लाभ आमच्या पक्षकारास झाला. वरीलप्रमाणें मुनसफाचा निवाडा जाहीर होताच आठदहा दिवसांनीं आमच्या पक्षकाराचा बाप दूर प्रांतीं वारल्याची वार्ता धुळ्यास आली व आमचा पक्षकार या पांचसहा लाख स्थावर मिळकतीचा मालक बनला. या पक्षकाराशीं कधीं कधीं या दाव्यासंबंधीं बोलण्याचा प्रसंग आला असतां माझ्या भाग्यामुळें ही मिळकत मला मिळाली, असें तो आग्रहानें म्हणतो व या त्याच्या बोलण्यांत बराच तथ्यांश आहे, असें आम्हांस वाटतें. याचें कारण असें कीं, नामदार हायकोर्टानें या दाव्यांत दर्शविल्याप्रमाणें मुद्दा ज्या ज्या अपिलांत उपस्थित झाला, त्या त्या अपिलांत हायकोर्टानें केलेल्या या निवाड्याचा आधार समजला न जातां या दाव्याच्या कामांत काढण्यांत आलेल्या लिलावाच्या जाहीरनाम्यांतील शर्तींप्रमाणें शर्त नमूद असूनहि हायकोर्टानें कोर्टमार्फत झालेल्या जाहीर लिलावांत रिणको प्रतिवादीच्या मुलाचा अविभक्त मिळकतींतील हक्कसंबंध खरेदीदारास प्राप्त होतो, असें ठरविलें आहे. ही गोष्ट लक्षांत घेतां आमच्या पक्षकाराच्या म्हणण्यांत तथ्य नाहीं असें कोण म्हणेल !

याप्रमाणें आमच्या कारकीर्दींतील या दोन महत्त्वाच्या खटल्यांची हकीकत निवेदन केल्यावर सन १८३७ सालीं मुंबई हायकोर्टाच्या अव्वल शाखेकडे दाखल झालेल्या एका विचित्र व मनोरंजक खटल्याची हकीकत प्रस्तुत स्थळीं नमूद करितों.

## शेतकरी लक्षाधिशाचा दावा

### रंकाचा राव–रावाचा रंक–फिरून रंकाचा राव

व्याजानें कर्जाऊ पैसे देण्याचा सावकारीचा धंदा करणारे लोक या जिल्ह्यांत कसे उदयास आले, याचें दिग्दर्शन मागें आम्हीं केलेंच आहे क्षत्रिय जातीचा एक सामान्य शेतकरी एका मोठ्या नदीच्या सन्निध असणाऱ्या खेड्यांत राहणारा आमचा पक्षकार होता. या खेडेगांवांत त्याच्या बापाची २०१२५ एकर उत्कृष्ट काळीची भारी जमीन होती. तरुणपणीं बाप वारल्यावर तो ती जमीन स्वतः घरीं खेडीत असे. जमीन उत्कृष्ट प्रकारची असल्यामुळें, व पाऊसहि भरपूर व वक्तेवर पडत असल्यामुळें, या जमिनींत त्याला साल दरसाल कपाशी, गहूं, तिळी, ज्वारी, बाजरी असें भरपूर पीक मिळत असे व त्याचा प्रपंच आटोपशीर असल्यामुळें व प्रपंच खर्च बेताचा असल्यामुळें साल दरसालच्या शेतीच्या उत्पन्नांतून बरीच मोठी रकम त्याचेपाशीं शिल्लक रहात असे.

या रकमेंतून दरमहा १॥–२ रु. व्याजाच्या दरानें तो त्याच्या खेड्यातील व आसपासच्या खेड्यातील शेतकऱ्यास कर्जाऊ रकमा देत असे. याशिवाय धान्य शेतकऱ्यांना देऊन, त्याचेकडून वाढीदेढीचे खावे रोखे करून घेत असे याशिवाय पावसाळ्याच्या प्रारंभास शेतकऱ्यास कर्जाऊ रक्कमा देऊन त्याचेकडून कपाशीचे जळप रोखे लिहून घेत असे. अशा प्रकारच्या साल दरसाल त्यानें केलेल्या व्यवहारात पुष्कळच नफा त्याला मिळाल्यामुळें २५ वर्षांचे काळात सामान्य शेतकऱ्याचा तो लक्षाधीश बनला. या लक्षाधीश झालेल्या शेतकऱ्याचा एक मुलगा फार हुशार आहे असें त्यास वाटून त्यानें जवळच्याच एका व्यापारी पेठेच्या गावात अडत दलालीचें दुकान सुरू केलें या दुकानास प्रथम लागणारें १५।२० हजार रु. चें भांडवल या मुलास त्यानें देऊन दुकानाचा सर्व कारभार त्याचेवर सोंपविला अडत दलालीच्या व्यवहाराची माहिती असणारा एक चलाख गुजराथी व्यापारी या दुकानात भागीदार म्हणून या मुलानें घेतला. या भागिदाराच्या चलाखीमुळें व मुंबईस त्याच्याच शातीच्या अडत दलाली करणाऱ्या व्यापाऱ्याची ओळख व दाट परिचय असल्यामुळें थोड्याच काळांत या दुकानात फार चांगली कमाई होते, असा भास या गुजराथी भागीदारानें उत्पन्न केला. अशा रीतीनें या भागीदारानें दुकानाच्या तरुण मालकाचा पूर्ण विश्वास संपादन करून घेतल्यावर या व्यवहारात कपाशीचे सट्टे करण्यास त्यानें प्रारंभ केला. गुजराथेंतील एका व्यापारी गावात याच अडत दलालीच्या दुकानाची एक शाखा काढली व तेथेंहि कपाशीच्या गाठीचे सट्टे, सौदे फार मोठ्या प्रमाणावर करण्यास प्रारंभ केला. दुकानाच्या तरुण मालकास 'व्यापारी अक्कल' बेताचीच होती. यामुळें त्या सर्व व्यवहाराचें अखेर पर्यवसान कसें होईल याची कल्पना त्यास आली नाहीं. गुजराथी भागीदार त्या प्रांताच्या गावातील दुकानाची व्यवस्था पाहण्याकरिता ३।४ महिने तिकडे राहण्यास गेला म्हणजे तो त्याची तरुण व सुस्वरूप स्त्री या जिल्ह्यातील गावातच ठेवीत असे. भागीदारीच्या नात्यामुळें, अडत दलालीच्या तरुण मालकाचें भागीदाराच्या कुटुंबाकडे येणेंजाणें सुरू झालें व हा तरुण मालक भागीदाराच्या स्त्रीच्या प्रेमपाशात गुरफटला गेला व दुकानाचे व्यवहारात नफा अगर नुकसान होत आहे याची चौकशी करण्याचें भान अथवा जरूरी त्यास भासली नाहीं. प्रथम बापानें दिलेलें १५।२० हजार रु. भांडवल दुकानात गुंतलें गेल्यानंतर अधिक भांडवलाची जसजशी जरूर लागली तसतसें ८० हजार रु पर्यंत भांडवल बापानें मुलाच्या या अडतदलालीच्या दुकानास दिलें. बापानेंहि जरी तो चाणाक्ष होता तथापि या दुकानाच्या व्यवहाराची खरी परिस्थिति काय आहे, याची चौकशी कधीं केली नाहीं. अखेर ८।१० वर्षांनंतर या दुकानास दीडदोन लाख रुपये कपाशीच्या गाठीच्या सट्ट्याच्या व्यवहारात नुकसान आलें. ही नुकसानीची रकम या जिल्ह्याच्या नजिकच्या एका जिल्ह्यांतील मारवाडी व्यापाऱ्याची अडत दुकानाकडे येणें निघाली व रकमेकरितां त्याचे तगादे सुरू झाले.

अडतदलालीचें दुकान बापाचे नांवानें सुरू होतें, यामुळें या रकमेची सर्व

जमावदारी आपावर घेउन पडली. दुकानांतील गुजराथी व्यापारी भागीदार हा कफल्लक असून, त्याचेपाशीं कांहींच इस्टेट नव्हती त्यानें या दुकानाच्या पैशाच्या व्यवहारात कोठेंच न अडकण्याची खबरदारी घेतली होती. अशा तऱ्हेनें अडत दलालीचे दुकानास ८० हजार रु. मांडवल रोख देऊन शिवाय दीडदोन लाख रुपयांच्या मारवाड्या-च्या कर्जाचा बोजा डोक्यावर पडला हें पाहून त्या शेतकरी लक्षाधिशाचें मन खिन्न झालें व या संकटांतुन आपला बचाव कसा करावयाचा याची त्यास रात्रंदिवस विवंचना लागली. या संकटांतून सुटण्याचा त्यास एकच मार्ग होता. तो म्हटला म्हणजे अडत दलालीच्या दुकानाच्या व्यवहाराशीं त्याचा कांहीं-एक संबंध नाहीं असें शाबीत करणें हा होता. परंतु त्यानें त्याच्या सावकारी व्यवहाराचे जे जमाखर्च कित्येक वर्षांपासून ठेवले होते त्यावरून या दुकानाच्या व्यवहाराच्या नफानुकसानीची जबाबदारी त्याचेवर नाहीं असें शाबीत करणें त्यास शक्य नव्हतें. अशा स्थितींत मारवाडी सावकारानें दोन लाख रुपये वसूल करण्या करितां या लक्षाधीश शेतकऱ्यावर मुंबई हायकोर्टाच्या ओरिजनल साईडकडे त्याचा धंदा व्यापाराचा दावून, फिर्याद दाखल केली. अशा या परिस्थितींत या मारवाडी व्यापाऱ्याशीं गनिमी पद्धतीनें युद्ध करण्याशिवाय मार्ग राहिला नाहीं या लक्षाधीश सावकारावर या दाव्याच्या समन्साची बजावणी झाल्यावर मुंबईच्या एका सॉलि-सिटरास त्यानें वकीलपत्र देऊन प्रतिवादीचा धंदा शेतीचा असल्यामुळें, मुंबई हायकोर्टास दावा चालविण्याचा अधिकार नाहीं, सबब तो रद्द करण्यात यावा अशी प्राथमिक तक्रार केली. दाव्याचें काम चारपाच वर्षें चाललें. या मुदतींत सॉलि-सिटरला चारपाच हजार रुपये द्यावे लागले सॉलिसिटरनें पैशाची मागणी केली की रकम भरावयाची अशा क्रम चालला होता. अखेर हायकोर्टांत शेतकरी लक्षाधिशाची जबानी झाली डोक्यास पांढरें पागोटें, अंगात खादीची बंडी असा त्या लक्षाधीश सावकाराचा वेष होता. मारवाडी सावकाराच्या त्यांच्या बॅरिस्टरानें—मोटारी किती आहेत? घोडे व घोड्यांच्या गाड्या किती आहेत? अशा प्रकारचे मुंबईच्या लक्षा-धीशाचें चित्र डोळ्यासमोर ठेवून, त्यानें उलटतपासणींत सवाल विचारले त्या सवालांस लक्षाधिश शेतकऱ्यानें नकाराचीं उत्तरें दिलीं व स्वतः नांगर हांकलतो व तीन हजार रु सरकारसाऱ्याची जमीन स्वतःच्या देखरेखीखालीं सालदार ठेवून खेडतों असें सांगितलें न्यायाधिशानें याप्रमाणें जबानी झाल्यावर लक्षाधीश शेत-कऱ्याचा धंदा व्यापाराचा नसून शेतीचा आहे, असें ठरवून, त्याचेवरील दावा चालविणेचा अधिकार मुंबई हायकोर्टास नाहीं असें ठरवून, मारवाडी सावकाराचा दावा रद्द केला त्यानंतर त्या सावकारानें हा लक्षाधिश शेतकरी ज्या जिल्ह्यात रहात होता त्या जिल्ह्यातील 'फर्स्टक्लास' सबजज्ज कोर्टांत दोन लाख रुपये वसूल करून मिळण्याबद्दल फिरून दावा दाखल केला. त्या दाव्याचे कामीं अनेक तक्रारी होऊन अखेर दीड लाख रुपये रकमेचा आपसात समजुतीचा हुकूमनामा झाला. 'फर्स्टक्लास' कोर्टांत दावा दाखल होण्यापूर्वीच लक्षाधीश सावकार मयत झाला

होता व त्याचा कॉलेजात शिकणारा मुलगा त्याच्या सावकारी दुकानाचा व्यवहार पाहूं लागला होता. आपसात समजुतीच्या हप्तेबंदीवरील रकम सन १९१४सालच्या युद्धानंतर आलेल्या मंदीमुळें रकम दिली गेली नाहीं. यामुळें मारवाडी व्यापाऱ्यानें हुकूमनाम्याची सर्व रकम वसूल करण्याकरितां दरखास्त दिली. प्रतिवादीचा धंदा शेतीचा असल्यामुळें, दरखास्तीचें काम 'कलेक्टरकडे' बजावण्याकरितां गेलें ८।१० वर्षे जमिनीच्या किंमतीचे पंचनामे फार भारी रकमेचे करण्याची कारवाई या मुलानें केल्यामुळें, जमिनीची विक्री मारवाडी सावकारास करता आली नाहीं. शेवटीं ह्या मारवाडी व्यापाऱ्यापैकीं हुकूमनाम्याच्या एका भागीदारानें निम्मी रकम सूट देऊन बाकी रकम रोख घ्यावयाची व निम्म्या जमिनीवरील जप्ती व विक्री करावयाची नाहीं, असें कबूल केलें. 'लँडमार्ट गेज बँकेकडून' हलक्या व्याजाच्या दरानें या जमिनी गहाण ठेवून, मारवाडी सावकाराची रोख रकम देऊन टाकली. ह्यानंतर दुसरें महायुद्ध सुरू झालें. जमिनींतील साल दरसालच्या शेतीच्या उत्पन्नाची किंमत चांगली येऊं लागली. त्याचप्रमाणें जमिनीच्या किंमती तिप्पट, चौपट वाढल्यामुळें, लक्षाधीश सावकाराच्या मुलानें, कांहीं जमिनींची विक्री करून आलेल्या रकमें-तून त्याचप्रमाणें शेतीच्या उत्पन्नाच्या रकमेंतून मारवाड्याच्या हुकूमनाम्याच्या सर्व रकमेची फेड केली. शेतकरी लक्षाधीश रंकाचा राव कसा झाला? त्यानंतर अदत-दलालीच्या व्यवहारात १०।१२ वर्षांचे काळांत रावाचा रंक कसा झाला व त्याच्या पश्चात् त्याचा मुलगा रंकाचा राव फिरून कसा झाला, याचीहि हकिकत कोणासहि मनोरंजक वाटल्याखेरीज राहणार नाहीं. शस्त्रास्त्राच्या सहाय्यानें करण्यात येणाऱ्या युद्धाप्रमाणेंच दिवाणी कोर्टांतील कायद्याच्या सहाय्यानें करण्यात येणारें युद्ध कसें यशस्वी व फलदायी होतें तें ह्या उदाहरणावरून दिसून येतें. राजकारणात कालाचें महत्त्व फार मोठें आहे असें शुक्रनीतींत एक वचन आहे ह्या वचनानुसार मुंबई हायकोर्टांत चालू करण्यात आलेल्या दाव्याचे कामीं, शेतकरी लक्षाधिशानें कायदेशीर तक्रार करण्यांत जो काळ घालविला व त्याचे पश्चात् त्याच्या मुलानें, दरखास्तीच्या बजावणीच्या कामीं गनिमीपद्धतीनें जे अडथळे उत्पन्न केले व त्यात जें कालहरण केलें, यामुळें दुसऱ्या महायुद्धाचे प्रारंभीं जी आर्थिक परिस्थिति निर्माण झाली त्यामुळें ह्या खटल्यातील मार्गे वर्णन केलेलीं स्थित्यंतरें घडून आलीं. तें स्पष्टपणें दिसून येतें.

## उपसंहार

या ग्रंथाच्या प्रतिपाद्य विषयाविषयीं बरीच विस्तृत माहिती मागील भागांत आम्ही दिली आहे. यापैकीं पहिलीं प्रकरणें निव्वळ पूर्व इतिहासाच्या कथनाच्या स्वरूपाची आहेत. इग्रजी राजवटींत असलेल्या गोष्टींचें वर्णन केल्यावर त्याचें मर्म कळांत येण्यास्तव इंग्रज राजवटीच्या पूर्वी कोणत्या गोष्टी अस्तित्वात होत्या याचें दिग्दर्शन करणे युक्त होतें या कारणास्तव या ग्रंथांत पूर्वकालीन न्यायदान देणाऱ्या

संस्था, न्यायाधिकारी, न्याय निवाडा करण्याची पद्धत यांचें दिग्दर्शन केल्यावर ब्रिटीश राजवटींतील या विषयांच्या स्वरूपाचें दिग्दर्शन केलें आहे. वकील, वकीलवर्ग, वकीलीचा धंदा ब्रिटीश राजवटींत उदयास आला. म्हणून ब्रिटिश राजवटीचे प्रारंभापासून तो आजतागायतचें या विषयांचें दिग्दर्शन केलें आहे. हा ग्रंथ समाप्त करण्यापूर्वी आतां दर्शविलेल्या या विषयासंबंधी हमीपच्या भविष्यकाळात कोणती परिस्थिति निर्माण होईल याचें द्योतक दिग्दर्शन या ग्रंथाचा उपसंहार म्हणून या भागांत आम्ही केलें आहे.

इंग्रजी राज्याची स्थापना झाल्यानंतर इंग्रजांनीं महाराष्ट्रांत ज्या न्यायदान संस्था स्थापन केल्या त्या संस्थांचें वर्णन व त्या संस्थांकडून गेल्या दीडशें वर्षांत होत असलेलें न्यायदानाचें कार्य या विषयांचें बरेंच विस्तृत विवेचन मी जें केलें आहे तें विवेचन वाचल्यानंतर वाचकाच्या मनांत स्वाभाविकपणें दोन प्रश्न उत्पन्न होतात. पहिला प्रश्न म्हटला म्हणजे इंग्रजी राजवटीपूर्वील मराठा राजवटींतील न्यायदानसंस्था व न्यायदानपद्धति ही इंग्रजांनीं स्थापन केलेल्या न्यायदानसंस्था व न्यायदानपद्धति लोकाना पसंत पडणारी व कमी खर्चाची होती कीं नसें हा होय. दुसरा प्रश्न म्हटला म्हणजे प्रस्तुतच्या पद्धतींत न्यायदान शक्य तितक्या अल्प काळांत व कमी खर्चांत केलें जातें कीं काय हा होय. पहिल्या प्रश्नाविषयीं प्रस्तुत स्थळीं चर्चा करणें अवश्य आहे. इंग्रजी सत्तेच्या प्रारंभींच्या काळांत इंग्रजांनीं या विषयासंबंधीं जी चौकशी व पूसतपास केला त्या तपासात मराठा राजवटींतील न्यायदानपद्धति व न्याय देणाऱ्या संस्था या महाराष्ट्रांतील लोकांना प्रिय असल्याचा अभिप्राय त्या काळच्या कित्येक इंग्रज अधिकाऱ्यांनीं दिला. तथापि मराठा राजवटींतील न्यायदानपद्धति व न्याय देणाऱ्या संस्था इंग्रज राज्यकर्त्यांनीं नष्ट करून त्या ठिकाणीं प्रस्तुतचीं न्यायालयें व न्यायदानपद्धति अमलांत आणली. इंग्रज राजवटीच्या प्रारंभींच्या काळात इंग्रजांनीं स्थापन केलेल्या कोर्टापेक्षा मराठा राजवटींतील न्यायदानपद्धति लोकाना प्रिय व पसंत असल्याचा अभिप्राय मागें दिलेल्या 'Notes on Maratha Institutions' ह्या हस्तलिखितांतील उताऱ्यावरून दिसून येतें. इ. स. १८८० सालात मुंबईचे गव्हर्नर सर रीचर्ड टेंपल ह्यानीं India In 1880 हा जो ग्रंथ केला आहे त्यात पंचायतीविषयीं खालील अभिप्राय व्यक्त केला आहे.

The ancient "Panchayat" which means an arbitration court consisting of five members, has for the most part vanished into the past from which it will but rarely emerge to revisit the land. Nothing would have pleased the Government better than to maintain, develop and dignify this institution, if the people would but acquiesce, but they will not. In the Punjab persistent efforts were put forth to naturalize this institution under the British arrangements and to induce the

suitors to resort to arbitration, but the people would not have it. Their reference for standing tribunals with judges appointed by the State, is remarkable. The law provides for suitors resorting to arbitration, and they do resort to it occasionally, but not often. In some places, such as Poona in the Deccan, an arbitration court sits regularly, and affords satisfaction to people. Elsewhere such an arrangement, whenever practicable, receives encouragement from the Government. But the substitution of arbitration for regular judicial trials would in most parts of the empire be unpopular and could not be attempted in the present temper of the people.

या अभिप्रायात पंचायतीसारख्या संस्थेचा विकास व उत्कर्ष करणें ह्यांत इंग्रज सरकारला मोठा आनंद वाटला असता असें नमूद केलें आहे. सर रीचर्ड टेंपल यांचा हा अभिप्राय सन अठराशें ऐंशी साली व्यक्त केलेला खरा मानला; तथापि ह्या आता अभिप्रायाची किंमत कांहींच राहिली नाहीं. कारण १०० वर्षांपूर्वी पंचायती नष्ट करण्यात येऊन त्याच्याऐवजीं ब्रिटिशांनी स्थापन केलेलीं न्यायालयें महाराष्ट्रांतील लोकाना अधिक प्रिय कशीं होतील याविषयीं शिस्तशीर प्रयत्न इंग्रज राज्यकर्त्यांनी केले होते. पंचायतीसारख्या कमी खर्चाच्या व महाराष्ट्रांतील लोकाना प्रिय असलेल्या संस्था व या संस्थाचें काम करण्याची महाराष्ट्रांतील लोकाची लायकी नष्ट केल्यानंतर या संस्थाचें महत्त्व व त्यांची उपयुक्तता यांचा महाराष्ट्रांतील लोकाना पूर्ण विसर पडला. ही गोष्ट लक्षात घेता पंचायतीसारख्या संस्थाचें पुनरुज्जीवन करून त्या महाराष्ट्रांतील अगर अन्य प्रांतांतील लोकांना प्रिय करणें अत्यंत दुर्घट झालें आहे. इंग्रजांनीं स्थापन केलेल्या न्यायदानसंस्था व न्यायदानपद्धति यांचा महाराष्ट्रांतील लोकांचे मनावर इतका विचित्र परिणाम झाला आहे कीं, क्षुल्लक व भिकार तंटेबखेड्यांचा निकाल करण्याकरितां कोर्टाची पायरी चढण्याखेरीज अन्य मार्ग लोकाना सुचेनासा झाला आहे. कोर्टाची पायरी चढण्यात अनेक गरीब लोकांना द्रव्य खर्च करावें लागतें. महाराष्ट्रांतील प्रजेची आर्थिक स्थिति म्हणण्यासारखी समाधानकारक नाहीं. ही गोष्ट विचारांत घेता तंट्याबखेड्यापायीं कोर्टाकडे धांव घेण्याकरता होणारा द्रव्याचा खर्च हा गरीब प्रजेवर एक मोठा बोजाच होऊन बसला आहे.

आता वर दर्शविलेल्या दुसऱ्या प्रश्नाची अल्प चर्चा प्रस्तुत स्थळी करणें अवश्य आहे. प्रस्तुतची न्यायालयें व त्यांची काम करण्याची पद्धत यांत प्रजेचा न्याय मिळविण्याकरितां होणारा द्रव्याचा व काळाचा व्यय वाजवीपेक्षा फाजील होतो व हिंदुस्थानांतील गरीब प्रजेस सहन न होण्यासारखा असा बोजा आहे असें किरयेकांचें मत आहे. तें मत निराधार असल्याचें कोणासहि म्हणता येण्यासारखें नाहीं. हिंदुस्थानावर राज्य करणाऱ्या अनेक इंग्रज अधिकाऱ्यांनी ही गोष्ट कबूल केली

आहे इ. स. १८८० सालांत सर रीचर्ड टेंपल ह्याच्या ज्या ग्रंथाचा वर उल्लेख केला आहे त्यांत सर रीचर्ड टेंपल ह्यांनी जो अभिप्राय व्यक्त केला आहे तो महत्त्वाचा असल्यामुळें आम्ही खालीं दिला आहे.

## India in 1880 (page 148)

There have been discussions whether civil justice as now administered can properly be deemed cheap and speedy It has sometimes been reprobated as costly and slow. Still on due allowances being made, it may be considered as not unduly expensive, nor for the most part tardy. The expensiveness is partly under the control of the state which does its best on behalf of economy by simplifying the procedure and keeping the stamp duties moderate. It is partly beyond the control of the state and is in the hands of the public, in so far as it consists in the remuneration of lawyers and advocates.

The profession of the law which formerly had an unfavourable repute has grown and is growing both in moral worth and in mental capacity. The Government cannot control or influence the emoluments of this profession which has its value in the market of intellectual labour. But the Government can provide that if the people do pay highly for legal advice, the advisers shall be persons of trained qualifications. This provision is effectually made by the tests to which men are subjected before admission to either branch of the legal profession The character and status of the Native Bar has also been mentioned in the previous chapter on mental and moral progress.

It is difficult to ascertain whether suits are on the average of long or short duration because in most provinces some few causes from special circumstances, sometimes preventable and at other times unavoidable, remain pending for an extraordinary length of time, a few such causes make the average swell so much that any conclusions which may be drawn from it become invalidated If such cases be excepted then the average duration of ordinary suits will in some provinces satisfactorily be short.

One reason of expense and delay in the final disposal of cases is the privilege of appeal which has been formerly much abused, which has in some respects been judiciously modified, but to which the Natives still cling pertinaciously. The importance of an appeal is not always to be measured by the value of the property in dispute, because a question of small pecuniary amount may involve a principle of consequence. After allowance has been made for this consideration, it will still be found that many trivial appeals, preferred from litigiousness, are occupying the time of highly paid and dignified tribunals. A considerable remedy has been applied by the establishments of Courts of small causes throughout the empire. These tribunals despite their name, bear causes of certain kinds for large amounts and with them the right of appeal is strictly limited. Additional limitations of appeal in other kinds of cases have been under the consideration of the legislature and if appealing is yet regarded as an evil by some European authorities, it arises from the disposition of the people and not from the policy of the Government Any attempt to suppress it or to impose limitations, essentially stricter than those which now exist would be very unpopular.

The popularity or unpopularity of the Courts in the interior of the country has been the theme of frequent controversy. That the Courts were formerly unpopular with many classes of the people may be admitted. They are still disliked by some classes, landlords and others who after making undue use of their landed security to run into debt, find themselves confronted with their creditors before the judge. They are yet condemned by many executive authorities who find themselves checked by judicial action and even by some non-official Europeans. There are some eminent persons who, notwithstanding all recent improvements, believe that those who thought to establish a system of civilised jurisprudence in

India have actually planted an upas tree Some natives also may share this opinion and the courts may be less esteemed in some provinces than in others Nevertheless, those who are cognizant of Native opinion as a whole throughout the empire doubtless perceive that the Courts are, despite their short *comings amongst the most* popular and most trusted institutions in the country In some provinces they are more esteemed than any other department or authority whatever and are regarded as the embodiment of what is best in British Rule.

The Europeans at the Presidency cities and at other great centres and the Natives also, regard the several High Courts with sincere respect and implicit confidence Indeed there is nothing in the Empire to which all classes, Europeans and Natives are more attached than these august tribunals, though even in them, practical defects are known to exist.

The Natives of India are, as a people, litigious many of *them seem to find in litigation under a settled rule that excitement* for which under an unsettled rule they would seek in contests of other kinds In reference to the probable wealth and resources of the country the number of suits is large and their aggregate value considerable

In the procedure the most marked defects during recent years have been the difficulty in obtaining a proper execution of decrees Often the interposition of delay and obstruction has been harassing and vexatious Sometimes property has been sold inconsiderately without proper precautions of realising its value, in satisfaction of decrees for comparatively *small amounts These defects will* be *fully* remedied if the provisions of the recently amended civil procedure are duly carried out

वरील अभिप्रायांत प्रस्तुतच्या न्यायदान पद्धतींत होणाऱ्या द्रव्याचा व काळाचा अपव्यय याची कारणमीमांसा केली आहे. कारणें कांहींहि असोत, परंतु प्रस्तुतची न्यायदानपद्धति कमी खर्चाची नाहीं व प्रत्येक बाब प्राप्त होण्यास फार विलंब लागतो, या दोन गोष्टी सर रीचर्ड यांनी कबूल केल्या आहेत. इमान नोकर

ाहीचें राज्य आतां अंतर्धान पावलें असून त्याचे ठिकाणीं हिंदी लोकांचें प्रांतिक स्वायत्ततेचें राज्य प्रस्थापित झालें आहे. तरी हिंदी प्रजेच्या हिताच्या दृष्टीनें वरील गोष्टी नष्ट करून अल्प खर्चांत व अल्प काळांत महाराष्ट्रांतील प्रजेस न्याय मिळ-वेण्याचे कामीं युक्त उपायाची योजना तत्काळ केल्यास महाराष्ट्रांतील प्रजेवरील पडणारा आर्थिक बोजा हलका केल्याचें श्रेय अस्तित्वांत आलेल्या नवीन हिंदी राज्यसत्तेस प्राप्त झाल्यावांचून राहणार नाहीं.

येथपावेतों इंग्रजांनीं स्थापन केलेल्या न्यायालयाचे बाबतींत आमचे विचार दर्शविल्यावर इंग्रजी न्यायपद्धतीबरोबर महाराष्ट्रांत उदयास आलेला वकील-वर्ग, वकिलीचा-धंदा याचे भवितव्याबद्दल आमचे विचार आम्ही येथें नमूद करतों.

## वकील, वकिलीचा धंदा, वकीलवर्ग व भविष्यकाळ

१३० वर्षांपूर्वी इ. स. १८१८ सालांत इंग्रजी राज्याची स्थापना महाराष्ट्रांत झाल्यावर प्रस्तुतचे दिवाणी फौजदारी कोर्टांचें जाळें मुंबई इलाख्यांत अस्तित्वांत आलें. या जाळ्याबरोबरच या जाळ्याचा कारभार योग्य प्रकारें चालावा म्हणून वकील, वकीलवर्ग व वकिलीचा धंदा उदयास आला. गेल्या सव्वाशें वर्षें या संस्था या देशांत दृढमूल झाल्या असून अस्तित्वांत आहेत. या संस्थेचे गुणदोष या संस्थांच्या ठिकाणीं कोणते आहेत याविषयींचें विस्तृत विवेचन पूर्वी करण्यांत आलेंच आहे. या संस्थांचा आर्थिक परिणाम महाराष्ट्रांतील प्रजेवर कोणत्या प्रकारचा झाला याचेंहि दिग्दर्शन मागें केलेंच आहे. आर्थिक दृष्ट्या यां संस्थांपासून महाराष्ट्रास म्हणण्यासारखा फायदा नसला तथापि प्रस्तुतच्या परिस्थितींत या संस्था बंद करणें अशक्य आहे. इंग्रजपूर्वकालीन या संस्था जरी नसल्या तथापि जगांतील प्रागतिक राष्ट्रांच्या व्यवहाराकडे लक्ष दिलें असता या संस्था अस्तित्वांत राहण्यावांचून गत्यंतर नाहीं. इंग्रज पूर्वकालीन महाराष्ट्राची राजकीय, सामाजिक, धार्मिक व आर्थिक जी परिस्थिति होती तींत फार मोठी क्रांति झाली आहे. ब्रिटिश रियासतींत वेळोवेळीं अनेक कायदे अमलांत आले. या कायद्या-प्रमाणें राष्ट्रांतील व्यवहाराचें नियंत्रण, प्रस्तुतचीं दिवाणी व फौजदारी कोर्टें, वकील, वकिलीचा धंदा व वकीलवर्ग यांच्यावाचून करणें अशक्य झालें आहे. ही गोष्ट विचारांत घेतां वकील, वकिलीचा धंदा व वकीलवर्ग ह्या संस्था भविष्यकाळांत अस्तित्वांत राहतील, याविषयीं शंका बाळगण्याचें कारण नाहीं. इंग्रजी राज्याची स्थापना महाराष्ट्रांत झाल्यावर इ. स. १८१८ सालापासून वकील, वकिलीचा धंदा, व वकीलवर्ग या संस्थांना विशेष महत्त्व प्राप्त झालें. हें या संस्थांचें महत्त्व महात्मा गांधीप्रणित असहकाराची चळवळ मुंबई इलाख्यांत सुरू होईपावेतों कायम होतें. परंतु त्यानंतर या संस्थांच्या महत्त्वास ओहोटी लागली. राजकारणाच्या क्षेत्रांत वकिलांना जें प्राधान्य प्राप्त झालें होतें तें असहकारी चळवळीमुळें नष्ट झालें. त्याचप्रमाणें वकिलीच्या धंद्यांतील प्राप्तीसहि असहकाराच्या चळवळीमुळें ओहोटी

लागली. गुन्हा केल्यानें फौजदारी कोर्टात शिक्षा होणें ही गोष्ट दूषणास्पद व कमीपणाची आहे अशी जी सामान्यपणें महाराष्ट्रांतील सर्व लोकांची मनोरचना होती ती बदलून जाऊन तुरुंगांत जाणें व तुरुंगांतील शिक्षा भोगणें ही गोष्ट अभिमानास्पद आहे असें लोकांस वाटू लागलें. यामुळें गुन्हा केल्यावर वकील लावून स्वतःचा बचाव करण्याची आवश्यकता लोकांस वाटेनाशी झाली. असहकार व कायदेभंग या चळवळीमुळें देशांतील ज्या अनेक लोकांवर खटले झाले त्या खटल्यांत गुन्ह्याची कबुली देऊन तुरुंगांत जावयाचें असें सर्वसाधारण धोरण असल्यामुळें हे गुन्हे करणारास त्याच्या बचावासाठीं वकील लावण्याची आवश्यकता राहिली नाहीं. असल्या प्रकारचे गुन्हे करणाराच्या बाबतींत गुन्हेगारांनीं जें धोरण स्वीकारलें होतें त्यांत काहींच गैर नव्हतें. परंतु अन्य प्रकारच्या गुन्हे करणारावर असहकार व कायदेभंग करणारे गुन्हेगारांनीं स्वीकारलेल्या धोरणाचा अनिष्ट परिणाम झाल्याखेरीज राहिला नाहीं. याच सुमारास कर्जदार कुळाकडून कर्जाची वसुली सावकारानें करण्या बाबत नवीन कायदे अस्तित्वांत आले. देशांतील शेतकरी कर्जदारास ऋणमुक्त करणाऱ्या धोरणास अनुसरून जो कायदा मुंबई इलाख्यात विधिमंडळानें मंजूर करून अमलांत आणला त्या कायद्यांत या व्यवहाराची चौकशी न्यायाधिशापुढें होत असतां पक्षकारातर्फे वकिलांनीं हजर राहण्याची मोकळीक ठेवली नसल्यामुळें दिवाणी कोर्टाचें कामहि फारच कमी झालें याचा परिणाम वकिलाच्या आर्थिक परिस्थितीवर फारच गंभीर स्वरूपाचा झाला. अर्धें अधिक आयुष्य वकिलीच्या धंद्यात ज्यांचें गेलें त्यांना संसारप्रपंचास लागणारें द्रव्य मिळण्याची पंचाईत पडूं लागली. अशाच स्थितींत वकिलीचा धंदा सोडून देऊन उपजीविकेकरतां अन्य व्यवसाय कोणता करावा हा प्रश्न ठिकठिकाणच्या वकिलापुढें उभा राहिला. प्रस्तुतची आतां वर्णन केलेली परिस्थिति लक्षांत घेतां हा धंदा करणाऱ्या लोकांस भविष्यकाळांत पूर्वीप्रमाणें फार मोठा आर्थिक लाभ होण्याचा संभव कमी झाला आहे.

आतां वर्णिलेल्याप्रमाणें प्रस्तुतची जरी वकिलीच्या धंद्याची परिस्थिति असली तथापि नानाप्रकारचे नूतन कायदे तयार करण्याची प्रांतिक सरकारची जी टकसाळ सुरू आहे, तिची गति लक्षांत घेतां महाराष्ट्रांत अनेक प्रकारच्या नूतन धंद्यांचें पेव फुटलें आहे. जमिनीचे मालक व कुळें, सावकार व ऋणको, नवरा व बायको यांच्या संबंधाची काडीमोड (डायव्होर्स) इत्यादि बाबतींत जे नूतन कायदे अस्तित्वांत आले आहेत त्यांच्या योगानें गांवोगांवीं अनेक तंटे उपस्थित होऊन कोर्टांत दाखल होऊं लागले आहेत. घटस्फोटाचा कायदा लोकप्रिय झाल्याचें दिसतें. प्रत्येक जिल्हा कोर्टांत घटस्फोटाच्या खटल्यांच्या सरबत्ती सारखी वाढ होत आहे. मुंबईच्या प्रांतिक विधिमंडळानें या बाबतींत जो कायदा केला आहे त्या कायद्यांत स्त्रीसंबंध रद्द करण्याचे बाबतींत ऋणमुक्ततारखी कोणतीच आडकाठी ठेवलेली नाहीं. बाहुल चुटकीसरसा काडीमोडीचा हुकूम नवराबायकोपैकीं कोणाहि न्यायाधिशाकडून मिळवितां येतो अशा प्रकारच्या या नूतन खटल्यांत वकील करणें अगत्याचें वाटतें.

यामुळें येथपावेतों वर्णन केलेल्या कारणामुळें आर्थिक दृष्ट्या या धंद्यांत पडणाऱ्या नूतन वकिलास भविष्यकाळांत अगदींच निराश होण्याचें कारण नाहीं. राजकारणाच्या दृष्टीनें विचार केला असतां वकिलीचा धंदा करणारांचें जें पूर्वीच्या काळांतलें महत्त्व नष्ट झालें आहे तें त्यांना समीपच्या भविष्यकाळांत लाभणें दुर्घट आहे. प्रांतिक विधिमंडळाच्या निवडणुकीसी प्रस्तुतची जी घटना आहे तिचें स्वरूप अशा प्रकारचें आहे कीं, वकिलीचा धंदा करणाऱ्या विधिमंडळांत निवडून येणाऱ्या उमेदवारास यशःप्राप्ति होणें हें सर्वस्वीं त्याच्या जातीवर अवलंबून आहे. मतदानाचा हक्क विशिष्ट बहुसंख्य जातीच्या लोकांस प्राप्त झाल्यामुळें त्याच जातीच्या उमेदवारास यशस्वीपणें निवडून येण्याची आशा असते. प्रस्तुत उमेदवार ब्राह्मणावाचून अन्य जातीचा अडाणी असला तरी तो यशस्वी रीतीनें निवडून येतो. याच जातीचा उमेदवार शिकलेला व विश्वविद्यालयीन पदवीधर असला तर तो यशस्वी रीतीनें निवडला जाईल अशी खात्री बाळगण्यास हरकत नाहीं. येथपावेतों केलेलें विवेचन लक्षांत घेतां उच्च प्रतीच्या शिक्षणाचा प्रसार महाराष्ट्रांतील ब्राह्मणांवाचून अन्य जातीच्या लोकांत जसजसा होत जाईल तसतसें राजकारणाच्या क्षेत्रांत वकिलीचा धंदा करणारांचें महत्त्व वाढत जाऊन अखेर त्यांना राजकारणाच्या क्षेत्रांत महत्त्वाचें स्थान प्राप्त झाल्याखेरीज राहणार नाहीं.

---

# परिशिष्ट

## मुसलमानी, मराठी व इंग्रजी राजवटींतील न्यायदानासंबंधाच्या कांहीं विशिष्ट शब्दांच्या व्याख्या व अर्थ.

**धर्म**—श्रुतिस्मृतिवर्णीत चातुर्वर्णीय समाजांतील आचार, व्यवहार, प्रायश्चित्त, राजधर्म, स्त्रिपुरुषधर्म, शाकुनगम्य, दत्तकत्व इत्यादीविषयींच्या विधिनिषेधरूपी आज्ञा.

**धर्मसभा**—कोणत्याहि दोन पक्षांतील वादाचा निवाडा करण्याकरितां भरविण्यात आलेली सभा

**धर्मांत निवाडा करणें**—धर्माच्या विधिनिषेधरूपी आज्ञांस अनुसरून निवाडा करणें

**धर्म चौथरा**—वादाचा निवाडा करण्याकरितां पुरावा देणाऱ्या साक्षीदारास ज्या शिळेवर उभा करावयाचा ती शिळा अशा प्रकारच्या शिळा देवी, सडका इत्यादि देवालयांच्या प्राकारांत बसविलेल्या आढळतात

**राजसभा**—राजा, अष्टप्रधान, परगण्याचे देशमुख देशपांडे वतनदार (देशक), परगण्यांतील गांवाचे पाटील, गांवाचे बलुतेदार, गांवांत राहणारे वाणी उदमी (वकाल), हे ज्या सभेस उपस्थित असतात ती सभा.

**शेटे महाजन सभा**—व्यापारी पेठेंतील दोन व्यापाऱ्यांच्या वादाचा निवाडा करणारी पेठेंतील शेटे, महाजन व व्यापारी यांची सभा (प्रत्येक व्यापारी पेठेंत व्यापारी यांतील प्रमुख गृहस्थास शेटे म्हणत व तो पेठेतील शेटेपणाचे वतनाचा मालक असे)

**ब्राह्मण सभा**—पैठण, कोल्हापूर, वाई, नाशिक, कऱ्हाड, पुणतांबें इत्यादि क्षेत्रांतील वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मणांची कोणत्याहि व्यवहाराचा निर्णय करणारी सभा.

**गोत सभा**—परगण्याच्या गावांतील पाटील, कुळकर्णी, ज्योतिषी, सुतार, लोहार, चांभार, गुरव, महार, कुंभार त्याचप्रमाणें वाणी व उदमी (वकाल) यांचा गावांत राहणाऱ्या दोन लोकांतील वादाचा निवाडा करण्याकरितां भरविण्यात आलेली सभा.

**देशक सभा**—परगण्याचे देशमुख देशपांडे वतनदार व परगण्याचे गावांतील पाटील व वाणी उदमी (वकाल) यांची सभा

**गोत महजर अथवा गोत निवाडा**—गोत सभेनें वादाचा जो निवाडा केला असेल त्यासंबंधाचा लेख.

**देशक महजर**—देशक सभेनें केलेल्या निवाड्याचा लेख.

न्यायाधीश—वादाचा निवाडा करण्याकरितां राजानें नेमलेला अधिकारी. या अधिकाऱ्यानें केलेल्या निवाड्याच्या लेखावर राजमुद्रा करण्यांत येत असे.

न्यायमंत्री—अष्टप्रधानांपैकीं वादाचा निवाडा करणाऱ्या सर्व संस्थांपेक्षा श्रेष्ठ अधिकारी.

पंडितराव प्रधान—आचार, प्रायश्चित्त इत्यादींचा धर्मांप्रमाणें विचार करणारा मंत्री.

मजलीस—मुसलमान राजवटींत कोणत्याहि वादाचा निवाडा करण्याकरितां भरविण्यांत आलेल्या सभेस मजलीस असें म्हणत.

सभासद—मुसलमान राजवटींत वादाच्या निवाड्याकरितां जी मजलीस (सभा) भरविण्यांत येत असे त्या सभेंतील भाग घेणारा.

महजर—मुसलमान राजवटींतील मजालिशीनें केलेल्या निवाड्याच्या लेखास महजर असें म्हणत.

काजी—मुसलमान राजवटींत परगण्याचे गावीं वादाचा निवाडा करण्याकरितां नेमण्यांत आलेला अधिकारी. दिवाणी व फौजदारी खटल्याचा निवाडा करण्याचा अधिकार काजीस देण्यांत आलेला होता.

अदालत—दिवाणी स्वरूपाच्या वादाचा निवाडा करण्याकरितां मुसलमानी राजवटींत नेमण्यांत आलेल्या न्यायाधिशाची कचेरी.

फौजदार—परगण्याचे गांवीं गुन्ह्याची चौकशी करण्याकरितां नेमण्यांत आलेला मुसलमानी राजवटींतील अधिकारी.

हरकी—वादाचा निवाडा ज्याच्याविरुद्ध झाला असेल त्यास प्रतिपक्षाकडून न्यायाधिशानें केलेल्या हुकुमान्वयें घ्यावयाची रक्कम.

गुन्हेगारी—वादांत जो हरला असेल त्यास न्यायाधिशानें दंडाचे रूपानें जी रक्कम देण्याचा हुकूम केला असेल ती रक्कम.

सदर दिवाणी अदालत—मुंबई शहरांत इंग्रज राजवटींत वादाचा निवाडा करण्याकरितां नेमण्यांत आलेल्या एक अथवा अनेक न्यायाधिशाची कचेरी.

हायकोर्ट—ईस्ट इंडिया कंपनीकडून हिंदुस्थानावरील राजकीय सत्ता इंग्लंडच्या राजा व हिंदुस्थानच्या बादशहा यांचे हातांत गेल्यावर सदर दिवाणी अदालतीस हायकोर्ट असें नामाभिधान देण्यांत आलें.

जज्ज—ब्रिटिश राजवटींत न्याय करण्याकरितां सरकारनें नेमलेला अधिकारी.

ओरिजिनल साईड—मुंबई हायकोर्टाची मुंबई शहरांत उपस्थित झालेल्या दिवाणी दाव्यांचा सरकारनें नेमलेल्या न्यायाधिशाकडून निकाल करणारी शाखा.

अपेलेट साईड—मुंबई शहर व इलाखा यांतील न्यायाधिशानीं दिवाणी

अथवा फौजदारी कामांत केलेल्या निवाड्यावर अपिलाचे निकाल करणाऱ्या सरकारनें नेमलेल्या न्यायाधिशाची शाखा.

फर्स्ट क्लास सबजज्—कोणत्याहि लहान अगर कितीहि मोठ्या रकमेच्या वादाचा निवाडा करणारा सरकारनें नेमलेला न्यायाधीश. याच अधिकाऱ्यास अलीकडे सिव्हिल जज् सिनियर डिव्हिजन असें नाव देण्यांत आलें आहे.

सेकंड क्लास सबजज्—कोणत्याहि लहान रकमेपासून ५००० पावेतोंच्या मिळकतीच्या वादाचा निवाडा करणारा न्यायाधीश.

डिस्ट्रिक्ट जज्—जिल्हा कोर्टाचा न्यायाधीश.

सेशन जज्—कोणताहि फौजदारी खटला चालविणारा न्यायाधीश.

आसिस्टंट जज् व आसि० सेशन जज्—जिल्हा न्यायाधिशाचा दुय्यम दर्जाचा न्यायाधीश.

मॅजिस्ट्रेट—फौजदारी खटल्याचा निवाडा करणारा सरकारनें नेमलेला अधिकारी फर्स्ट, सेकंड आणि थर्ड क्लास अशा तीन प्रकारचे मॅजिस्ट्रेट असतात.

कोर्ट—फौजदारी अगर दिवाणी दाव्याची चौकशी करून निकाल करणाऱ्या न्यायाधिशाची कचेरी

कायदा—इंग्रजी राजवटींत गव्हर्नर व त्याच्या कौन्सिलनें मंजूर केलेल्या विधिनिषेधरूपी आज्ञा. या कायद्याचे दोन प्रकार आहेत. एक दिवाणी व दुसरा फौजदारी कायदा.

सॉलिसिटर—मुंबई हायकोर्टांत खटल्याची पूर्वतयारी करणारे कायदेपंडित.

व्यवहार—दोन व्यक्तींत मनुष्याचें शरीर, मिळकत ( स्थावर जंगम ) आणि अब्रू याविषयीं उत्पन्न होणारा वाद

व्यवहारनिर्णय—दोन व्यक्तींतील वादाचा उभयतांच्या तक्रारी व पुरावा घेऊन निवाडा करणें.

अग्रवादी—व्यवहारविषयक वादाचा निवाडा करावा अशी फिर्याद करणारा प्रस्तुत त्यास वादी म्हणतात.

पश्चिमवादी—अग्रवादीनें ज्याच्याबद्दल फिर्याद केली असेल तो. प्रस्तुत त्यास प्रतिवादी म्हणतात.

प्राड्विवाक—न्यायाधीश किंवा राजानें नेमलेला न्यायाधिकारी

जजमेंट—ब्रिटिश रियासतींत न्यायाधिशानें केलेल्या वादाच्या निकालाचा लेख.

हुकुमनामा—न्यायाधिशानें दाव्यात केलेल्या निवाड्यानुसार तयार करण्यात आलेला हुकुमाचा लेख. या लेखात वादी, प्रतिवादी यांना दाव्यासंबंधीं झालेला खर्च व तो वादी, प्रतिवादींपैकीं कोणी कोणाकडून वसूल करावयाचा याविषयींचा न्यायाधिशानें केलेला हुकूम.

वकील—न्यायसभेंत वादी, प्रतिवादीतर्फे हजर राहून, त्यांच्या तक्रारी कोर्टांत दाखल करून, वादासंबंधीं पुरावा लेखी व तोंडी घेण्याचा अधिकार वादी प्रतिवादी ज्याला देतात तो कायदेपंडित.

अॅडव्होकेट—मुंबई हायकोर्टांत वादाच्या निवाड्याचे कामीं वादी प्रतिवादीनें नेमलेला कायदेपंडित.

बॅरिस्टर—इंग्लंड देशांतील कायद्याचें शिक्षण देणाऱ्या संस्थांच्या परीक्षेंत उत्तीर्ण झालेला कायदेपंडित.

प्रीव्हि कौन्सिल—इंग्लंड देशातील ब्रिटिश साम्राज्यांतर्गत सर्व न्यायाधिशांपेक्षा व सर्व न्याय देणाऱ्या संस्थांपेक्षा सर्वांत श्रेष्ठ न्यायालय. प्रस्तुत भारत स्वतंत्र झाल्यानें सर्वश्रेष्ठ न्यायाधिकारी सुप्रीम कोर्ट.

---